# निवेदन

गेली अनेक वर्षे लताबाईंची गाणी आम्ही ऐकत होतो. पार्श्वगायिका म्हणून त्यांचे नाव गाजताना पाहात होतो. कीर्तीचे आणि प्रसिद्धीचे झगझगीत वलय जिच्या भोवती अहोरात्र फिरत आहे अशी एक अत्यंत नामवंत व्यक्ती म्हणून त्यांना आम्ही दुरून ओळखत होतो. पुढे त्यांच्या प्रत्यक्ष परिचयाचा योग आला. त्यांच्या सहवासात काही काळ घालवण्याची संधी मिळाली. स्नेहाचे एक वेगळे नाते त्यांच्याशी प्रस्थापित झाले. आणि मग असे जाणवू लागले की बाह्यतः दिसणाऱ्या प्रसिद्धीच्या झगमगाटामागे, प्रचंड कीर्तीमागे आणि डोळे दिपवणाऱ्या वैभवामागे वेगळ्याच लताबाई उभ्या आहेत. त्या साध्या आहेत. अनौपचारिक आहेत. त्यांना उत्तम विनोदबुद्धी आहे, त्याबरोबरच दुसऱ्याचे मन जाणून घेणारी सूक्ष्म संवेदनशीलताही त्यांच्या ठिकाणी आहे. कलावंत म्हणून तर त्या थोर आहेतच. पण कन्या, बहीण, मैत्रीण, व्यावसायिक व्यक्ती आणि समाजाचा एक घटक अशा इतर कितीतरी नात्यांमध्ये त्यांचे मोठेपण सतत प्रकटते आहे. हे जेव्हा ध्यानी आले तेव्हा तीव्रतेने वाटले की पार्श्वगायन हा लताबाईंच्या व्यक्तित्वाचा एक पैलू. त्यांचे इतरही अनेक पैलू आहेत. मानवी तसेच मनोज्ञ. त्यांचीही इतरांना ओळख करून दिली पाहिजे.

योगायोगाने लताबाईंच्या कलाजीवनाचा रौप्यमहोत्सव याच वर्षी साजरा होणार होता. या शुभप्रसंगी लताबाईंवरील लेखांचे एक संकलन प्रसिद्ध करण्याचा विचार आम्ही केला आणि अनेकांना लेख पाठविण्याची विनंती केली. सर्वांनीच सहजतेने व विपुलतेने लेखनसाह्य केले. त्यातही लताबाईंच्या मोठेपणाचा आणि त्यांच्याबद्दल सर्वांच्या मनात वसत असलेल्या प्रेमादराचा आम्हाला प्रत्यय आला.

राष्ट्रपती डॉ० राधाकृष्णन, गृहमंत्री श्री. यशवंतराव चव्हाण आणि महाराष्ट्र राज्याचे मुख्य मंत्री श्री. वसंतराव नाईक यांनी ग्रंथासाठी संदेश धाडले. साहित्यिकापासून तो राजकारणी लोकापर्यंत आणि चित्रपटव्यावसायिकापासून तो शास्त्रीय गायकवादकांपर्यंत सर्वांनी आमच्या विनंतीला मान देऊन आमच्याकडे लेख पाठवले. गायनाच्या व चित्रपटाच्या क्षेत्रातील थोर व्यक्तींचे अभिप्राय व

आशीर्वादही. 'लता'ला साजेसे म्हणून 'सप्तस्वरा'ची योजना केली ती कल्पना श्री. पु. ल. देशपांडे यांची. आणि ती मूर्त करण्यास श्री. सुरेश गजेंद्रगडकरांचे सहकार्य मिळाले या सर्वांच्या आम्ही अत्यंत आभारी आहोत.

लेखकांव्यतिरिक्त आमच्यावर असलेले इतर स्नेही मंडळींचे ऋणही फार मोठे आहे. मंगेशकर कुटुंबियांनी आम्हाला अनेक दुर्मिळ छायाचित्रे मिळवून दिली तशीच लताबाईंनी मिळवलेल्या शेकडो पारितोषिकांपैकी काही निवडक पारितोषिके रेखाचित्रासाठी त्यांनी उपलब्ध करून दिली. श्रीमती उषा मंगेशकर यांना विनंती करण्याचा अवकाश, त्यांनी मा. दीनानाथ आणि लताबाई यांची दोन सुरेख रंगीत चित्रे खास या ग्रंथासाठी काढून दिली. श्री. हृदयनाथ मंगेशकर यांनीही आम्हाला वेळोवेळी असेच बहुमोल साह्य केले आहे. प्रसिद्ध संगीतमर्मज्ञ श्री. वा. ह. देशपांडे यांनी 'घरंदाज गायकी' या आपल्या पुस्तकातील खासाहेब अमान अली खां भेंडीबाजारवाले यांचा ब्लॉक वापरण्याची आणि 'मौज प्रकाशन'ने मा. दीनानाथांचा ब्लॉक व खांसाहेब बडे गुलाम अली खां यांचे छायाचित्र वापरण्याची परवानगी दिली. श्री. वसंत भालेकर यांनी अनेक चित्रपटव्यावसायिकांना भेटून आम्हाला लेख मिळवून दिले. सौ. पद्मा सहस्रबुद्धे यांच्यावर सोपवलेली ग्रंथाच्या मुखपृष्ठाची व अंतर्गत सजावटीची जबाबदारी त्यांनी तत्परतेने, हौसेने व कल्पकतेने पार पाडली. मौजेचे श्री. विष्णुपंत भागवत यांच्या मार्गदर्शनाचा व स्नेहाचा लाभ तर या कामी सतत होत राहिला. त्याचप्रमाणे श्री. प्रभाकर भागवत यांनी पुस्तक उत्तम रीतीने छापले जावे म्हणून अपार परिश्रम घेतले. श्री श्री. पु. भागवत, श्री. राम पटवर्धन, श्री. जयवंत दळवी, श्री. ल. मो. प्रभुणे, श्री मनोहर वैद्य, श्री राम मोहाडीकर, श्री. बाबूभाई जव्हेरी या स्नेहीमंडळींचे साह्यही फार मोठ्या प्रमाणात झाले. श्री बी. बी नेरॉय यांनी ब्लॉक्स उत्तम व वेळेवर करून दिले. त्याचप्रमाणे 'मौज छापखान्या'तील श्री. शांताराम तारी व त्यांचे सहकारी यांनी 'मौज'च्या लौकिकाला साजेशी पुस्तकाची छपाई केली. या सर्वांचे ऋण शब्दांनी फिटण्याजोगे नाही. आम्ही त्याबद्दल कृतज्ञ आहोत.

निवेदन

ग्रंथासाठी आलेल्या लेखांमधील हिंदी आणि इंग्रजी लेख आम्ही अनुवादित केले. पृष्ठमर्यादेमुळे काही लेखांचा अपरिहार्यपणे संक्षेप करावा लागला व मजकुराची पुनरावृत्ती होऊ नये म्हणून पण शक्यतो लेखाचा मूळ गाभा कायम ठेवून आम्ही हे संपादकीय संस्कार केले. यासाठी लेखकांची आधी संमती घेणे आवश्यक होते. तथापि वेळेअभावी ते करता आले नाही. लेखांच्या सौंदर्याला धक्का पोचू नये अशी काळजी आम्ही घेतलेली आहेच. तरीही काही उणीवा राहिल्या असल्यास लेखकांनी क्षमा करावी.

राष्ट्रपति भवन, नई दिल्ली-4
RASHTRAPATI BHAVAN,
NEW DELHI 4

February 25, 1967.

On the occasion of the celebration of her Silver Jubilee in the film world, I send my best wishes and congratulation to Kumari Lata Mangeshkar, whose versatility has made her one of the most popular singers of our time.

S. Radhakrishnan

(S. Radhakrishnan)



HOME MINISTER
INDIA

नवी दिल्ली

दिनांक-१५ मार्च १९६७

कु. लता मंगेशकर हे अद्भुततेचा स्पर्श झालेले भारतीय संगीत सृष्टीचे लेणे आहे. त्यांची गीतें ऐकण्याची संधि मला अनेक वेळा मिळाली. शब्द आणि भावना यांना ओळणाऱ्या त्यांच्या मधुर स्वरांतून संगीताची नवी सृष्टी उभी राहते व त्या स्वरांनी रसिकांची हृदयें हेलावतात. गीतांतील भावनांचा उत्कट अनुभव येतो. १९६३ सालच्या प्रजासत्ताकदिनानिमित्त दिल्लीस झालेल्या कार्यक्रमाच्यावेळी सीमेवरून परत न आलेल्या सैनिकांच्या स्मृतिचे 'ये मेरे वतन के लोगों' हे प्रसिद्ध गीत त्यांनी गाइलें तेव्हां स्व. पं. नेहरूंचे डोळे पाणावलेले मी पाहिले आहेत. ते अश्रु लताबाईंच्या स्वरांतील भिजलेल्या भावनांचे होते. तसेंच लताबाईंनी १९६० साली महाराष्ट्र राज्याच्या जन्मक्षणी आळविलेल्या ज्ञानेश्वरांच्या पसायदानाच्या ओव्यांची आठवण आजहि मला रोमांचित करते.

येत्या एप्रिलमध्ये कु. लता मंगेशकर यांच्या पार्श्वगायनाच्या कारकीर्दीची पंचवीस वर्षे पूर्ण होत आहेत. यानिमित्त मी त्यांचे अभिनंदन करतो.

माझ्या शुभेच्छा

सचिवालय मुंबई ३२

दि.२० मार्च १९६७.

केवळ महाराष्ट्रासच नव्हे तर अखिल भारतास ज्यांच्या कलागुणाविषयी अभिमान वाटावा अशा जागतिक कीर्ती पावलेल्या सुप्रसिद्ध पार्श्वगायिका श्रीमती लता मंगेशकर यांनी चित्रपट व्यवसायात पदार्पण केल्याला येत्या एप्रिल महिन्यात पंचवीस वर्षे पूर्ण होत आहेत याबद्दल अत्यंत आनंद वाटतो

महाराष्ट्र ही जशी साधुसंतांची, विद्वानांची, त्यागी समाजसेवकांची गुणिजनांची व शूर वीरांची भूमी आहे, तशीच ती थोर कलावंतांची व रसिकांचीही भूमी आहे अशा या थोर महाराष्ट्र भूमीस पंचवीस वर्षांपूर्वी एका अत्यंत मधुर आवाजाच्या स्वरलतेचा शोध लागला ही स्वरलता म्हणजे श्रीमती लता मंगेशकर या होत श्रीमती लता मंगेशकर यांनी आपल्या गोड गळ्याने अक्षरशः लाखो रसिकांना वेड लावले. संगीत कलेचा थोर वारसा लताबाईंना आपले वडील कै. मा. दीनानाथ यांचेकडून मिळाला. कलेच्या सेवेसाठी सर्व कुटुंबाने आपले आयुष्य वाहिल्याची उदाहरणे अगदी विरळा. श्रीमती लता मंगेशकर यांच्या सर्व कुटुंबियांनी गायन कलेच्या क्षेत्रात अत्यंत मानाचे स्थान प्राप्त करून घेतले आहे ही गोष्ट या कुटुंबास खरोखर भूषणावह अशी आहे

आपल्या कलेच्या द्वारे रसिकांचे मनोरंजन करण्याचे कार्य तर लताबाईंनी केलेच, परंतु अनेक सत्कार्यासाठी आपल्या कलेच्या द्वारे त्यांनी सहाय्यही केले आहे.

अखिल भारतात ख्यातनाम झालेल्या या थोर महाराष्ट्र कन्येने संगीत क्षेत्रात केलेल्या महान सेवेचा गौरव करण्यात येत असून त्या प्रसंगी `लता` हा गौरवग्रंथ प्रसिद्ध होणार आहे हे यथोचितच होय येत्या २४ एप्रिल रोजी कै. मा. दीनानाथ यांच्या पंचविसाव्या पुण्यतिथीच्या वेळी हा गौरवग्रंथ प्रकाशित करण्याचे योजिण्यात नियोजकांनी खचितच औचित्य साधले आहे. महाराष्ट्राच्या या थोर सुकन्येस उत्तम आरोग्य व उदंड आयुष्य लाभो अशी शुभेच्छा व्यक्त करून 'लता' गौरवग्रंथाचे प्रकाशनास मी माझे शुभाशीर्वाद पाठवीत आहे.

( वसंतराव नाईक )



# मास्टर दीनानाथ

गोमंतकातील मंगशाची पूजा करणाऱ्या सेवकऱ्यांपैकी अभिषेकी नावाच्या एका ब्राम्हण घराण्यात दिनांक २९ डिसेंबर १९०० या शुभ दिवशी मास्टर दीनानाथाचा जन्म झाला गोरेपण, उभट चेहरा, तेजस्वी डोळे, तरतरीत नाक, रेखीव जिवणी असे त्यांचे रूप होते देवाल्यात सहज कानावर पडणारे मंत्र आपल्या तीक्ष्ण स्मरण शक्तीमुळे ते लहान वयात अचूक म्हणत असत गायन, नर्तन, वादन ऐकत राहण्याचा, पाहण्याचा आणि ऐकलेले–पाहिलेले जसेच्या तसे प्रकट करून दाखविण्याचा त्यांना छंद होता

कै मास्करबुवा बखले यांचे गुरुबंधू बाबा माशेलकर यांच्याकडे दीनानाथाच्या संगीतशिक्षणाला प्रारंभ झाला

दीनानाथ बारातेरा वर्षांचे असतानाच गोमंतकात महाराष्ट्रातील किर्लोस्कर नाटक मंडळी आली दशभक्तानी, विद्वानाशी आणि बालगंधर्व, गणपतराव बोडस, गोविंदराव टेंबे यांच्यासारख्या श्रेष्ठ नटवर्याशी संबंधित असलेल्या या नाटकमंडळीत गोमंतकाच्या मुक्कामातच काही फाटफूट झाली तेव्हा नाटक मंडळीचे व्यवस्थापक शंकरराव मुजुमदार याना गुणी मुलाची आवश्यकता वाटू लागली शोध घेत असताना छोट्या दीनानाथाची कीर्ती त्यांच्या कानावर आली महिना तीस रुपयांवर, दीनानाथ आपल्या आईसह या मंडळीत येऊन दाखल झाले

पुढे बालगंधर्वांनी दीनानाथाबद्दल म्हटले, "हा मुलगा माझ्या हाती लागता तर मराठी ते मुंबई अशा दरवाजांचा गालिचा अंथरून, त्यावरून वाजतगाजत मी याला माझ्या मंडळीत आणले असते !"

किर्लोस्कर नाटक मंडळीत चिंतोबा गुरव, कृष्णाजी अनंत कोल्हापुरे अशा गुणीजनांच्या सगतीत नाट्यगुणाचे पाठ दीनानाथांनी घेतले त्यांच्या अनुकूलतेमुळे प्रथम दीनानाथांकडे स्त्रीभूमिका सोपविल्या गेल्या 'सुभद्रा'मधील चेननती, 'शारदे'तील वल्लरी अशा छोट्या संगीतप्रधान भूमिका, आणि 'कॅमेम फूल', 'ताजे वफा' या उर्दूमिश्रित हिंदी नाटकातून विनोदी भूमिकाही त्यांनी घेतल्या या निमित्ताने नव्या शैलीचे गाणे आणि नृत्य त्यांना शिकता आले लवकरच 'पुण्यप्रभावा'तील वृंदावन,

किंकिणी आणि वसुधरा यांच्या भूमिका अनुक्रमे चिंतामणराव कोल्हटकर, दीनानाथ, कोल्हापुरे या त्रिकुटाने गाजवल्या. किंकिणीच्या भूमिकेतील दीनानाथाचा अभिनय आणि गाणे यांनी रंगभूमीवर एक नवे पर्व सुरु केले.

१९२० मध्ये अकोला येथे 'भावबंधन'चा प्रथम प्रयोग झाला. या पहिल्या प्रयोगात दीनानाथ —लतिका, कोल्हटकर—घनश्याम, कोल्हापुरे—मालती, दिनकर देरे—महेश्वर उर्फ कामण्णा अशा भूमिका होत्या. चौघांनीही जीव ओतून कामे केली. विदर्भात अमाप यश मिळून 'बलवंत'च्या 'भावबंधना'ने मुंबईपुण्याकडेही नाव केले.

खाडिलकरांकडून काही अटींवर 'एकच प्याला' करण्याची परवानगी घेऊन दीनानाथांनी बालगंधर्वांपेक्षा वेगळी अशी सिंधूची भूमिका करून दाखविली.

मिरजेचे सुप्रसिद्ध इतिहाससंशोधक वासुदेवशास्त्री खरे यांच्याबद्दल दीनानाथांना फार आदर होता. त्यांच्याकडून रजपूत इतिहासावरील 'उग्रमंगल' हे नाटक त्यांनी लिहून घेतले. दीनानाथ त्यांतील राणी पद्मावतीची भूमिका करीत. नायिका पद्मावती नर्तिकेच्या वेषात शत्रूच्या शिबिरात जाऊन त्याच्या मुलाला मोहित करून आणते असा प्रसंग नाटकात आहे. त्यासाठी दीनानाथांनी पंडित सुखदेव यांच्याकडून कथ्थक नृत्याचे पाठ घेतले. आपल्या सर्वसंग्राहक स्वभावानुसार घराणेदार ठुमऱ्याही त्यांनी त्यांच्याकडून शिकून घेतल्या. या नाटकातील उत्तम दृश्ये व भरजरी पोशाख यासाठी दीनानाथांनी अमाप पैसा खर्च केला. नृत्य, गायन, अभिनय आणि जन्मजात लाभलेले रूप यामुळे 'उग्रमंगल' मधील पद्मावती हा दीनानाथाचा यशाच्या कळस ठरला.

या नाटक मंडळीतील तरुण कलाकारांनी महाराष्ट्रीय प्रेक्षकांचे मन जिंकले असतानाच नाटकातील कंपनीचे व्यवस्थापकाशी काही मतभेद निर्माण झाल्याने १९१७ साली दीनानाथांनी आपल्या काही सहकाऱ्यांसह कंपनी सोडली. ग. ना. उर्फ तात्यासाहेब परांजपे या नावाचे किर्लोस्कर मंडळीचे एक हितचिंतक होते. त्यांनी किर्लोस्कर मंडळीतून बाहेर पडलेल्या या कलाकारांना 'बलवंत संगीत मंडळी' ही नवी नाटक मंडळी काढण्यास साह्य केले. 'बलवंत' या नावाने अण्णासाहेब किर्लोस्कर व लोकमान्य टिळक या दोघा पूजनीयांचे स्मरण एकत्रच होणार होते. अठरा सालच्या जानेवारीमध्ये शाकुंतलाच्या तालमींनी मंडळीच्या कामाला प्रारंभ झाला. दीनानाथाकडे शकुंतलेची भूमिका आली. त्यांच्या जोडीला चिंतामणराव कोल्हटकर, कोल्हापुरे, नेवरेकर, बाळकोबा गोखले, शंकरराव आणि गणपतराव मोहिते, परशराम सामंत असा संच होता. लवकरच दिनकरराव टेरे उर्फ कामण्णा आणि दामुअण्णा मालवणकर ही विनोदी जोडगोळी मंडळीला येऊन मिळाली.

तात्यासाहेब केळकरांच्या 'वीरविडंबना'त दीनानाथ 'उत्तरा' आणि दिनकर कामण्णा 'उत्तर' ही जोडगोळी विलक्षण गाजली. गंभीर आणि अल्लड अशा दोन्ही प्रकारच्या भूमिका एकाच वेळी दीनानाथ करू लागले.

यानंतर 'बलवन्त'मध्ये काही अंतर्गत मतभेद झाले आणि दीनानाथ, कोल्हापुरे व कोल्हटकर हे तिघे नव कंपनीचे मालक झाले. रुपयात सात आणे मालकी दीनानाथांची, पाच आणे कोल्हापुरे यांची आणि तीन आणे चिंतामणराव कोल्हटकरांची असा करार झाला. बलवंतच्या या गुणी मंडळींवर कै. गडकऱ्यांचे फार प्रेम होते. गडकऱ्यांनी त्यांच्यासाठी 'भावबंधन' लिहायला घेऊन अगदी मृत्युशय्येवर असताना ते पूर्ण केले आणि 'बलवंत'ला ते कायमचे हक्काने देऊन टाकले. गडकऱ्यांच्या मृत्यूनंतर मार्च १९२२ मध्ये 'बलवंत' इंदूरला गेली असताना भावबंधनचा प्रयोग श्रीमंत तुकोजीराव होळकर यांनी पाहिला. आणि खास आग्रहाने गडकऱ्यांचे अपूर्ण 'राजसंन्यास' रंगभूमीवर आणण्यास सांगितले. त्या नाटकासाठी लागणारा भरजरी वस्त्रे राजसरकारानीच दिली. तीन महिन्यांचा सर्व मंडळींचा शिधा आणि नक्त एक हजार रुपयेही पाठवून दिले. या नाटकातील दीनानाथांची 'शिवांगी' सरकार आणि सामान्य नागरिक सर्वांनाच आवडली. नाटक मंडळी महाराष्ट्रात परतली ती 'राजसंन्यास'ला प्रेक्षकांचे मुजरे घेतच. मुंबईत सतत तीन महिने या नाटकाचे प्रयोग चालले.

याच वर्षी पश्चिम खानदेशातील थाळनेर गावच्या श्री. हरिदास रामदास नामक सावकाराच्या नर्मदा नावाच्या मधल्या मुलीशी दीनानाथांचा विवाह इंदूर येथे मोठ्या थाटामाटाने झाला. श्रीमंत होळकरांच्याबरोबरच दीनानाथांवर प्रेम करणाऱ्या इंदूरनिवासी सामान्य रसिकांनीही नूतन परिणीत दांपत्यावर बहुमोल आहेरांचा नुसता वर्षाव केला. दीनानाथांनी पत्नीचे नाव श्रीमती असे ठेवले.

याच सुमारास श्री जगद्गुरु शंकराचार्य कुर्तकोटी यांनी मंडळीच्या अमरावतीच्या मुक्कामात 'उग्रमंगल' पाहिले आणि 'संगीतरत्न' अशी पदवी दीनानाथांना दिली. अशा रीतीने राजसत्ता, धर्मसत्ता आणि सामान्य जन सर्वांकडूनच दीनानाथांच्या कलेचे चीज होत चालले.

अपार वैभव आणि कीर्ती मिळवून दीनानाथ मंगशाच्या दर्शनासाठी गोमंतकात गेले. तेथे दीनानाथांचे स्वागत मोठ्या थाटाने आणि आपुलकीने झाले.

बेळगावला मंडळीचा मुक्काम असताना गडकऱ्यांचे 'वेड्यांचा बाजार' हे प्रहसन 'बलवंत'ने बसवले. प्रहसनात दिनकर कामण्णा बाळाभाऊंची आणि दीनानाथ वेणूची भूमिका करून हास्याची धमाल उडवून देत. मग अण्णासाहेब किर्लोस्करांचे रामराज्यवियोग 'बलवंत'साठी कोल्हटकरांकडून पूर्ण करून घेऊन दीनानाथांनी ते रंगभूमीवर आणले. त्यात रामाची शांत आणि संयत भूमिका करून आपण पुरुषाची भूमिकाही यथायोग्य करू शकतो हे दीनानाथांनी दाखवून दिले. १९२४ मध्ये विदर्भाचा दौरा चालू असताना 'चौदावे रत्न किंवा नाटिका' या ठसठशीत हास्यरसप्रधान नाटकाच्या तालमी दीनानाथांनी सुरू केल्या होत्या. या नाटकातील कोल्हटकरांची प्रतापरावाची, दीनानाथांची नाटिकेची, कामण्णांची राणोजीची आणि मालवणकरांची रणधीराची या भूमिका विलक्षण गाजल्या. नाटक सर्व दृष्टीने अत्यंत यशस्वी ठरले.

दीनानाथांनी अद्यापपर्यंत कोणा गायनाचार्यांचा गंडा बांधलेला नव्हता. व्यवसायाच्या दृष्टीने त्यांना तशी फारशी आवश्यकताही नव्हती. परंतु गायनाचार्य वझेबुवांचे शिष्यत्व पत्करावे असे त्यांच्या मनाने घेतले. ते म्हणाले, माझ्या गानविद्येवर वझेबुवांनी आपल्या शिष्यत्वाची मुद्रा उठविली पाहिजे. या विद्येचे मूळ यांनी संस्कारात रुजले आहे ते उखडून या विद्येवर पुन्हा हिंदुत्वाचे संस्कार करीन म्हणून मी वझेबुवांना गुरू करून घेणार आहे. त्यांनी जेव्हा नम्रपणे शिष्यत्वाबद्दल वझेबुवांकडे विचारणा केली तेव्हा चकित होऊन बुवा म्हणाले, "तू माझा गंडा बांधून घेणार म्हणजे करणार तरी काय?" शेवटी दीनानाथांच्या आग्रहामुळे बेळगावला गंडा बांधण्याचा समारंभ

मोठ्या थाटाने झाला. थोड्याच दिवसात बुवांच्या ध्यानात आले की आपल्या जवळच्या शेदीडशे चिजा या बुद्धिमान शिष्याने अगोदरच हस्तगत केलेल्या आहेत.

१९२७ मध्ये वीर वामनराव जोशांचे 'रणदुंदुभी' 'बलवंत'ने स्वीकारले. भरजरी पोशाख व दृश्ये यांच्यासह मुंबईच्या रसिक प्रेक्षकांसमोर प्रथम ते सादर केले गेले. 'रणदुंदुभी' मधील तेजस्विनीची भूमिका आणि 'परवशता पाश दैवे' 'दिव्य स्वातंत्र्य रवि' ही पदे विलक्षण गाजली. मराठी रंगभूमीवरील हा भरभराटीचा कालखंड होता. मिठाच्या सत्याग्रहाचे वेध देशाला लागलेले होते. शेवटी या पदांवर बंदी घातली गेली.

याच सुमारास दीनानाथांची सुलक्षणी पत्नी प्रसूतिरोगाने मृत्यू पावली. त्यांची ललिता नावाची लहानगी कन्या व वडील गणेशभटही त्याच वर्षी दिवंगत झाले. दीनानाथांचे वय यावेळी फक्त सत्तावीस वर्षांचे होते. रीतीप्रमाणे एका वर्षाच्या आत पुनर्विवाह करावयाचा होता तेव्हा प्रथम पत्नीचीच धाकटी बहीण शुद्धमती हीस वधू नेमस्त करून अगदी साध्या पद्धतीने थाळनेर मुक्कामी दुसरा विवाह उरकण्यात आला. दुसऱ्या पत्नीचे नावही त्यांनी श्रीमती असेच ठेवले.

वयानुसार आता दीनानाथांची शरीरयष्टी पुरुषभूमिकेला अनुकूल झाली होती. मानापमानातील धैर्यधराची भूमिका त्यांना विशेष आवडलेली होती. तेव्हा ती वेगळ्या पद्धतीने त्यांनी रंगमंचावर आणण्याचे ठरविले. पोशाखातील आणि पदांच्या चालींतील बदल सनातनी प्रेक्षकांना रुचला नाही. पण नाटकाचे लेखक कै. काकासाहेब खाडिलकर म्हणाले, "माझे हे नाटक कालमानानुरूप आहे असा जो मला मुळापासून एक आत्मविश्वास होता तो दीनानाथांच्या या रिफस्पतरित भूमिकेनेही मळावलाच !"

यानंतर १९३१ मध्ये 'बलवंत'ने स्वातंत्र्यवीर सावरकरांचे 'सन्यस्त खड्ग' रंगभूमीवर आणले. नाटकातील भाषा आणि संदेश दोन्हीही अत्यंत जळजळीत होती. 'शुक्रतारचि जगी या' हे यातील पद लोकप्रिय झाले पण नाटक फारसे लाभदायक मात्र झाले नाही.

१९३२ मध्ये सिमला येथील असेंब्लीच्या अधिवेशनाच्या वेळी आबासाहेब मुजुमदारांच्या आग्रहाने अनेक देशी-परदेशी पाहुण्यांपुढे दीनानाथांचे गाणे झाले. व्हाइसरॉयकडून पंचवीस तोळे वजनाचे सुवर्णकमळ या कार्यक्रमाबद्दल मानधन म्हणून दीनानाथांना मिळाले. या उच्चपदस्थांच्या बैठकीत पारतंत्र्याने दाटलेल्या हिंदवासात 'परवशता पाश दैवे' हे गीत दीनानाथांनी म्हटले.

एक दिवस वॉरंट चुकविण्यासाठी भरल्या ताटावरून उठून दीनानाथांना नाहीसेही व्हावे लागले. दोघे स्नेही जामीन राहिल्यानंतर रीतसर खटला सुरू झाला. या काळात कायदेशीर पळवाट शोधून आणि सगळा भार कोल्हटकरांच्यावर टाकून दीनानाथांना सर्व जबाबदारीतून सुटणे शक्य होते. पण दीनानाथांनी ते नाकारले. या सर्व प्रकरणात चित्रपट कंपनीची वाट लागली आणि फिरून 'बलवंत संगीत मंडळी' सुरू करावी असा विचार सुरू झाला. दीनानाथांना कुटुंबाच्या उपजीविकेची फारशी चिंता नव्हती. केवळ गाण्याच्या बैठकीवर ते पोटापुरते मिळवू शकले असते—परंतु 'बलवंत'चे सगळेच घटक त्यांचे आत्मीय होते. त्यांचा विचार करून १९३८ मध्ये दीनानाथांनी पुन्हा नाटक मंडळी सुरू केली. यावेळी विशेष पुढाकार घेतला परशराम सामंत यांनी. नटसंचाची जमवाजमव वगैरे सर्व धावपळ त्यांनीच केली. कोल्हटकरांनी स्वतः होऊन मालकी सोडून दिली आणि केवळ नट म्हणून मंडळीत ते राहिले. मालक म्हणून सर्व जबाबदारी दीनानाथांच्यावर आली. आणि टाकलेले प्रत्येक नवे पाऊल आर्थिक दृष्ट्या त्यांना खोलातच घेऊन गले. आर्थिक ओढाताणीच्या या दिवसात मित्रमंडळींच्या संबंधानाही विचित्र स्वरूप येऊ लागले. मालक चिंतामणराव कोल्हटकर मालकी आणि तिच्याबरोबर येणारी जबाबदारी सोडून देऊन पगारदार नट म्हणून काही दिवस कंपनीत राहिले. आणि नंतर कंपनी सोडून गेले. पण दीनानाथांना आपल्या कलेचा विलक्षण विश्वास होता. ते म्हणाले, "अरे, चिंता कशाला? माझा गळा आहे ना?"

दीनानाथांची गृहस्थिती नाटक कंपनीच्या परिस्थितीबरोबरच आंदोलत होती. सत्तावीस साली विवाहबद्ध झालेल्या दीनानाथांचा एकोणीसशे बत्तीसपर्यंतचा कालखंड पुष्कळच सुखासमाधानात गेला होता. पण त्यानंतर परिस्थितीची झळ सर्व कुटुंबाला लागत होती. दीनानाथांना एकंदर पाच अपत्ये झाली. चार मुली आणि एक मुलगा. लता, मीना, आशा, उषा आणि हृदयनाथ. सवात मोठ्या लतेच्या गळ्यात देवदत्त गंधार होता. त्या गंधाराच्या रूपाने जणू नादब्रह्मानेच तिला आपला आशीर्वाद दिलेला होता. तिला बरोबर घेऊन मध्ये दीनानाथांनी गाण्याचा एक जलसा केला. 'शूरा मी वंदिले' हे पद या लहानग्या गायिकेने ज्या तयारीने गाइले त्याला जाणकारांनी आश्चर्यमुग्ध होऊन माना डोलवल्या. दीनानाथांचा आत्मविश्वास वाढला. मग त्यांनी वि. ना. कोठीवाले यांच्याकडून 'गुरुकुल' या नावाचे लहान मुलांच्या भूमिका असलेले नाटक लिहून घेतले. त्यात लता श्रीकृष्णाची आणि मीना सुदाम्याची भूमिका करीत. पण हे प्रयत्न केवळ पूरकच होते, त्यावर कंपनीचा खर्च चालणे शक्य नव्हते.

अशाही परिस्थितीत अखेरची धडपड म्हणून दीनानाथ कंपनीसह महाराष्ट्रात प्रयोग करीत हिंडत होते. मुंबई, सिन्नर, नादगाव, धुळे असा प्रवास चालला होता. कंपनीतील किंमती वस्तू काही ठिकाणी गहाण पडत होत्या, विकल्या जात होत्या आणि काही बरोबर घेऊन कंपनीतील माणसेही निघून जात होती. अखेर धुळ्याला असताना कंपनीचा उरलासुरला कारभार गुंडाळून टाकून दीनानाथांनी जन्मभर जडवून घेतलेल्या व्यासाची इतिश्री करून टाकली

दीनानाथांनी पुण्यात स्थायिक व्हायचे ठरवले. आता त्यांचे कुटुंब, ते स्वतः, पत्नी आणि पाच लहान अपत्ये एवढेच राहिले होते. शुक्रवारपेठेतील ७०० $\frac{1}{2}$ हे दुमजली घर विकत घेऊन ते तेथे राहू लागले. दीनानाथांनी फार पूर्वीच ज्योतिषशास्त्राचा उत्तम अभ्यास केलेला होता संगीत शास्त्रावर एक प्रबंध लिहायला घेतला होता. परंतु त्या कशातच त्यांचे मन आता रमत नव्हते. नाटकातील संवाद मनाशी म्हणत ते बसायचे, गेल्या दिवसांचा सतत विचार करायचे. हा एवढाच त्यांना छंद उरलेला होता. अतिविचाराने त्यांचा ब्लडप्रेशरचा विकार अधिकच वाढत गेला.

एका हितचिंतकाने या पितापुत्रींच्या गाण्याचे काही जलसे करवले. लोकांनी एकदा 'मानापमाना'त दीनानाथांना आग्रहपूर्वक धैर्यधरही व्हायला लावले परंतु नाटकाची घडी पहिल्यासारखी जुळेना.

अखेरच्या दिवसात दीनानाथ परत एकदा मंगेशीला गेले. तिथे त्याचे लोकांनी चांगले आतिथ्य केले. परंतु दीनानाथच आता मनाने इतके विरक्त झाले होते की त्यांनी आपल्याजवळील होते नव्हते ते सर्व वाटून टाकून भगवी वस्त्रे परिधान केली. रोगाने पोखरलेले शरीर वागवीत उदास, हताश वृत्तीने दीनानाथ परत पुण्याला आले.

त्यानंतर प्रकृती बिघडतच गेली. तेवीस एप्रिल एकोणीसशे बेचाळीसच्या रात्री त्यांना रक्ताच्या उलट्या होऊ लागल्या. ते बेशुद्ध झाले. काही हितचिंतकांनी औषधोपचारासाठी त्यांना ससूनमध्ये नेले परंतु थोड्याच वेळात तेथे त्यांचे प्राणोत्क्रमण झाले.

ते मोहक डोळे आणि तो अद्भुत स्वर अनंतात विलीन झाला. अभिनयाने आणि गायनाने रंगलेल्या धुंद रात्रींच्या आठवणी फक्त मागे उरल्या.

दीनानाथ आजारी असताना लहानग्या लतेला जवळ घेऊन म्हणाले होते, "तो कोपऱ्यातला माझा तंबोरा, ही.. दराची ठेवलेली चिजांची वही आणि श्री मंगेशाची कृपा यावेगळे तुला देण्यासारखे माझ्याजवळ काही नाही."

वडलांनी दिलेला हा अद्भुत वारसा लताने श्रद्धेने सांभाळला, जोपासला आणि वाढवला. छोट्या लताचा आकाशवाणीवर झालेला एक कार्यक्रम ऐकताना अंथरुणाशेजारी बसलेल्या आपल्या पत्नीला डबडबलेल्या डोळ्यांनी आणि गहिवरल्या आवाजाने दीनानाथ म्हणाले होते "अग, माझा आवाज मी आज ऐकतो आहे."

त्या दीनानाथांना स्मर—ही लता.





# लता

लता ही मा दीनानाथांची सर्वांत थोरली मुलगी. तिच्या जन्माच्या वेळी तिच्या मातुश्री माई इंदूरला आपल्या बहिणीकडे होत्या तेथे दि. २८ सप्टेंबर १९२९ रोजी शनिवारी रात्री साडेदहाच्या सुमारास लताचा जन्म झाला जन्मपत्रिकेनुसार 'ह' हे अक्षर आले होते. म्हणून 'हेमा' हे तिचे नाव ठेवले होते दीनानाथांनी आपल्या आवडीचे म्हणून 'हृदया' असे तिचे नामकरण केले. शिवाय लताच्या पहिल्या मातुश्रींना म्हणजे माईंच्याच थोरल्या बहिणीला एक मुलगी झाली होती. ती नवव्या महिन्यातच निधन पावली. तिचे नाव लतिका ठेवलेले होते तिची स्मृती म्हणून या नवजात बालिकेचे नावही 'लता' ठेवले.

पहिली मुलगी म्हणून बालपणी लताचे खूपच कोडकौतुक झाले भरपूर जावळ असलेली ही मुलगी गुबगुबीत, हसतमुख, खेळकर अशी होती वडील तिचे फार लाड करीत आईचा मार क्वचित लताने खाल्ला असेल पण दीनानाथ मात्र चुकूनही कधी तिला मारीत नसत त्यांना तिच्यावाचून मुळीच चैन पडत नसे.

लताच्या जन्माचे वेळी दीनानाथ हे मराठी रंगभूमीवरचे एक अत्यंत गुणी नायक नट म्हणून सर्वत्र मान्यता पावले होते महाराष्ट्रातल्या एका अत्यंत गाजलेल्या नाटक मंडळीचे—'बलवंत संगीत मंडळी'चे—ते मालक होते कंपनी जोरात चालत होती यावेळी दीनानाथांचा नेहमी रहिवास सांगली येथे असे तेथे हे कुटुंब दहा वर्षे राहात होते दीनानाथांनी स्वत बांधलेले खूप मोठे चाळवजा घर तिथे होते पहिल्या मजल्यावरच्या तेरा खोल्या मंगेशकरांनी स्वत कडे राखून ठेवल्या होत्या हे घर ज्या रस्त्याला होते तो रस्ता 'दीनानाथ रस्ता' म्हणून ओळखला जाई आजही तो त्याच नावाने ओळखला जातो या काळी मंगेशकरांचे घर चांगले संपन्न होते घरांत सैपाकीण, गडी, चाकर नोकर असा थाट असे. रोज साठसत्तर माणसे पंक्तीला बसत. लता व धाकट्या दोघी बहिणी मीना आणि आशा या भावंडांचे सांगलीचे जीवन स्वास्थ्यपूर्ण, निश्चिंत, निर्वेध असे गेले

लताचा आवाज बालपणापासूनच अत्यंत पातळ, धारदार, लवचिक असा होता आणि गाण्याकडे

तिचा नैसर्गिक कल होता. ती अवघ्या अकरा महिन्याची असताना एके दिवशी दीनानाथ सारंगी वाजवत होते. सारंगीचे सूर ऐकता ऐकता लताने नकळत आपला आवाज त्या सुरात अलगत मिसळून दिला. त्याबरोबर दीनानाथ चटकन उद्गारले, "ही मुलगी गाणार!" वडील दीनानाथ हेच गायनकलेतले लताचे पहिले गुरु. त्यांचे गाणे ऐकून आणि ते आपल्या शिष्याना जी तालीम देत तिच्याकडे अवधान देऊन लताने आपल्या विद्येला प्रारंभ केला. एकदा ती आपल्या धाकट्या बहिणीला—आशाला—खेळवीत असता जवळच दीनानाथांचा एक शिष्य 'पूरिया धनाश्री' हा राग आळवत बसला होता. गाताना तो चुकला. तेव्हा लताने लगेच त्याची चूक त्याला सांगितली, इतकेच नव्हे तर कसे गावयास हवे होते हे तिने स्वतः त्याला गाऊन दाखवले. दीनानाथांनी जेव्हा हे ऐकले तेव्हा या मुलीला आता पद्धतशीर गाणे शिकवले पाहिजे असे त्यांना तीव्रतेने वाटले आणि ते लताला म्हणाले,

"उद्यापासून सकाळी उठून तंबोरा घेऊन तू गाणे सुरू कर. मी स्वतः तुला गाणे शिकवीन."

दुसऱ्या दिवशी सकाळी साडेपाच वाजताच दीनानाथांनी लताला उठवले आणि तिच्या हाती तंबोरा देऊन तिला गावयास बसवले. त्या पहाटे त्यांनी तिला सदारंगाची 'पूरिया धनाश्री'तली चीज दिली. लता रोज तास अर्धा तास त्यांच्यापुढे गात बसे. संध्याकाळीही साडेसहा सात वाजता दीनानाथ तिला गाणे म्हणण्यास बसवीत. यावेळी लताचे वय पाच सात वर्षांचे असेल. यानंतर तिला गाण्याचा एकच नाद लागला. वडलांच्याकडून अनेक राग व चिजा तिने मिळविल्या.

मंगेशकरांकडे सांगलीला विठ्ठल नावाचा एक नोकर होता. त्याने लताच्या हाती प्रथम पाटी-पेन्सिल देऊन ग म भ न ही अक्षरे तिला गिरवायला लावली. सांगलीला लता शाळेला जाई. पण तिला शाळेची तशी गोडी कधी लागली नाही. तिच्या डोक्यात सतत गाणे भरलेले असे. लताची बुद्धी जात्या तल्लख होती. तिचे निरीक्षण सूक्ष्म असे. तीव्र संवेदनाशीलता आणि जबरदस्त स्मरण-शक्ती हे तिचे गुणही फार बालवयापासून प्रकट होऊ लागले होते. उत्तम ग्रहणशक्तीमुळे जे गाणे ऐकावे ते ती लगेच आत्मसात करून टाकी. गाण्याची नादिष्ट असलेली ही मुलगी एरव्हीच्या जीवनात आग्रही, जिद्दीची, काहीशी बंडखोर अशी होती. उघड्या डोळ्यांनी ती जग बघत होती आणि अनेक संस्कार घेत मोठी होत होती.

सांगलीचे सुखाचे जीवन फार काळ टिकले नाही. लता चारपाच वर्षांची झाली न झाली तोच काही मित्रमंडळींच्या व सहकाऱ्यांच्या सल्ल्याने दीनानाथांनी 'बलवंत संगीत मंडळी' बंद करून 'बलवंत पिक्चर्स कॉर्पोरेशन' नावाची चित्रपटसंस्था काढली. पण हा व्यवहार आर्थिकदृष्ट्या त्यांना लाभदायक ठरला नाही. तेव्हा त्यांनी नाटकमंडळीचे पुनरुज्जीवन केले. हे अडतीस एकुणचाळीस साल होते. दीनानाथांनी पुन्हा कंपनीतर्फे नाटके बसविण्यास सुरुवात केली. पण पूर्वीची घडी एकदा मोडली ती मोडलीच. मनमाड मुक्कामी कंपनीने 'सौभद्र' नाटक जाहीर केले होते. त्यावेळी नारदाची भूमिका करणारा नट आजारी पडला. ऐन वेळी नारद कोणाला करावे असा प्रश्न उभा राहिला. लता म्हणाली "मी होते नारद!" आणि ती आत्मविश्वासाने रंगभूमीवर नारदाच्या भूमिकेत उभी राहिली. 'राधाधरमधुमिलिंद' आणि 'पावना वामना' ही पदे तिने अशा गोड आर्जवीपणाने गाऊन दाखवली की प्रेक्षक अगदी थक्क होऊन गेले. दीनानाथांनी आधी गाणी गाऊन 'वन्समोअर' मिळवले होते. पण लताने त्यांच्यानंतर काम करून त्यांच्यासमोर प्रेक्षकांचे 'वन्समोअर' घेऊन दाखवले.

यानंतर लता वडलांबरोबर नाटकांतून छोट्या छोट्या भूमिका करू लागली. 'पुण्यप्रभाव'तील युवराजाचे काम ती करी. युवराजाच्या शेवटच्या पदाला ती कधीही 'वन्समोअर' घेतल्यावाचून राहिली नाही. 'भावबंधन' मधले 'लाडकी असेचि पोर' हे एक तिचे असेच फेवरेट गाणे होते. 'गुरुकिल्ली' नाटकात 'तान्या'ची भूमिका ती उत्तम रीतीने करी. त्याच्या तोंडची 'चमिल्स ब्याड

पारख' ही लावणी ती रंगवून म्हणे. वस्तुत या वेळी तिचे वय इतके लहान होते की रंगमंचावर ती फार छोटी दिसे. पण आपल्या धीटपणाने, आत्मविश्वासाने आणि अत्यंत मधुर सुरेल आवाजाने ती प्रेक्षकांना मंत्रमुग्ध करून टाकी

याच सुमाराला सोलापूरकरांनी दीनानाथांच्या गाण्याचा जाहीर जलसा करण्याचे ठरवले. त्यावेळी लतानेही त्या जलशात भाग घ्यायचा हट्ट धरला. दीनानाथांनीही लाडक्या लेकीची हौस पुरवायचे ठरवले. 'पितापुत्रीचा जलसा' अशी या जलशाची जाहिरात केली गेली या जलशात लताने 'खंबावती' तली एक चीज गाइली आणि मग नाटकातली दोन पदे गाऊन दाखवली छोटी लता यावेळी प्रेक्षकांची मने अशी जिंकून गेली की त्यांनी तिचे गाणे पुन्हा झाले पाहिजे असा आग्रह धरला. पण गाऊन थकलेली लता केव्हाच गाढ झोपी गेली होती!

लताची कला एकीकडे अशी आकाराला येत होती आणि दुसरीकडे दीनानाथांचे जीवन नाना काळज्यांनी, अडचणींनी ग्रासले जात होते चित्रपटाचा व्यवहार अगोदरच आतबट्ट्याचा होता. आर्थिक विवंचना वाढत होत्या. आणि मुळाच्या वेळी साथ देणारे सोबती आता तोंड चुकवू लागले होते दीनानाथांसारख्या मनस्वी कलावंताच्या वृत्तीवर या सर्व घटनांचा परिणाम होणे अपरिहार्य होते. ते विपण्ण, उदास होऊ लागले. शेवटी कंपनी बंद करून सर्व मंडळी पुण्यास आली पुण्याला बुधवार पेठेत रेवडीवाल्याच्या बोळात दीनानाथांनी जागा घेतली लताला ते गाणे शिकवीतच होते त्यांचा सर्व भरवसा आता तिच्यावर होता कलाविषयक आकांक्षा तिच्या ठायी केंद्रित झाल्या होत्या. लताचे वय अजून लहानच होते पण जन्मजात शहाणपणामुळे आणि संवेदनाशील वृत्तीमुळे आपली परिस्थिती, वडलांचे मन ती जाणू शके.

१९४१ साली पुण्यात 'खजांची' चित्रपट लागला होता गुलाम हैदर यांनी या चित्रपटाला दिलेले पंजाबी ढंगाचे संगीत सर्वांना मोहून टाकीत होते या स्पर्धेत नाव दाखल करण्याचे लताने ठरवले. दीनानाथांना ती गोष्ट मान्य नव्हती कारण या स्पर्धेत लता जर पहिली आली नाही तर ते मोठ्या मानहानीचे होईल असे त्यांना वाटत होते. लताला मात्र आपल्या यशाची खात्री होती योगायोगाने दीनानाथ याच वेळी परगावी कार्यक्रमासाठी गेले. आणि लताने स्पर्धेत भाग घेतला. त्यात तिने पहिले पारितोषिक मिळवले तिला एक दिलरुबा बक्षीस मिळाला लताला अतिशय आनंद झाला, त्या बालिश आनंदाच्या भरात घरी ती दुसऱ्या कुणालाही आपल्या दिलरुब्याला हात लावू देईना दीनानाथांनी हे जेव्हा पाहिले तेव्हा त्यांनी रागारागाने दिलरुब्याचा 'बो' दूर भिरकावला. त्याची तार तुटली. लताला दुःख झाले. तेव्हा दीनानाथ तिला म्हणाले, "लता, आपल्याला मिळालेल्या यशाने माणसाने कधीही हुरळून जाऊ नये कलावंत नम्र असावा" वडलांचा हा उपदेश लताने सदैव अंतःकरणावर कोरून ठेवला

मा दीनानाथांच्या जीवनाच्या अखेरचा काळ मोठ्या हताश मनःस्थितीत गेला ति २४ एप्रिल १९४२ रोजी पुणे येथे त्यांचे अकस्मात निधन झाले लताचे वय यावेळी होते बारा तेरा वर्षांचे. दुःखीकष्टी विधवा आई आणि छोटी अजाण भावंडे यांची सर्व जबाबदारी, संसाराचा भार या लहानग्या मुलीवर येऊन पडला. देवदत्त गोड गळा, वडलांकडून संपादन केलेली गायनकला आणि अत्यंत स्वाभिमानी तशीच जिद्दीची मनोवृत्ती एवढेच काय ते लताचे भांडवल होते. त्यावर तिचा सारा भार होता न डगमगता ती ताठ उभी राहिली आणि डोळ्यांतले पाणी पुसून तिने पुढची वाट आक्रमण्याचा निर्धार केला

यापूर्वीच पार्श्वगायनाच्या क्षेत्रात तिचे पाऊल पडले होते. दीनानाथ असतानाच वसंतराव जोगळेकर यांच्या 'किती हसाल' या चित्रपटात काम करण्याची लताला संधी मिळाली होती. या चित्रपटासाठी 'नाचू या गडे खेळू सारी। मनी हौस भारी' हे आपले पहिले गाणे तिने

ध्वनिमुद्रित केले. या ध्वनिमुद्रणाला जाताना लता वडलांच्या पाया पडून त्यांचा आशीर्वाद घेऊन गेली होती. पुढे हा चित्रपट निघालाच नाही. यानंतर दीनानाथांच्या कंपनीतले एक नट श्रीपाद जोशी यांनी दीनानाथांना गळ घातली की त्यांनी लताचे गाणे विनायकांना एकदा तरी ऐकवावे. मा. विनायक यावेळी कोल्हापूरहून पुण्याला आले होते. 'हंस' मधून फुटून ते 'नवयुग कन्सर्न'मध्ये नुकतेच आले होते. दीनानाथांना ही कल्पना मुळात पसंत नसतानाही श्रीपाद जोशांनी लताचे गाणे विनायकांना ऐकवलेच. तिचे गाणे ऐकून विनायक भारावून गेले. त्यांच्या डोळ्यात पाणी आले. त्यानंतर एका महिन्याच्या आतच दीनानाथ निधन पावले. मग लताने विनायकांच्या कंपनीत नोकरी धरली. 'पहिली मंगळागौर' चित्र सुरू झाले. लताला त्यात एक छोटी भूमिका मिळाली. हे चित्र चालू असताच विनायक कंपनीतून बाहेर पडून कोल्हापूरला निघून गेले. लताने हे काम पुरे केले आणि मग ती आपल्या आई भावंडासह कोल्हापूरला आली. विनायकांनी आपली 'प्रफुल्ल' ही नवी कंपनी स्थापन केली होती. तीत लता काम करू लागली. कोल्हापूरला ती नाबूराव पटराच्या धगल्यासेजारी मिस्त्रींच्या घरात भाड्याने जागा घेऊन राहत असे.

'प्रफुल्ल' कंपनीतला त्यांचा काळ चांगला गेला. तेथे अनेक स्नेही मंडळी तिला लाभली. सर्व मंडळी छोट्या लतावर लोभ करीत. लता त्या वातावरणात रमली. तिचा पोषाख अगदी साधा असे. कधी कधी शर्ट पायजमा घालून सायकल पिटाळीत ती स्टूडिओत जाई येई. तिच्या कलागुणांचा 'प्रफुल्ल'मध्ये विकास होऊ लागला. तेथे ती कथ्थक नृत्य शिकली. तिला 'टॅप डान्स' शिकवण्यासाठी पीटर नावाचा एक शिक्षकही ठेवलेला होता. विनायकरावांनी तिच्याकडे जातीने लक्ष देऊन अभिनयातले अनेक सूक्ष्म बारकावे तिला समजावून दिले. 'प्रफुल्ल'मध्ये असताना लताने काही चित्रपटांतून भूमिका केल्या. पण या वेळीही चित्रपटात भूमिका करण्यात तिला फारशी गोडी वाटत नसे. आपण शास्त्रीय गायिका व्हावे हीच तिची आकांक्षा होती.

या काळी लताच्या घरी दारिद्र्य होते. माई दुःखी. भावंडे छोटी. बाळच्या पायाचे दुखणे. नाना अडचणींना लता तोंड देत होती. पण या परिस्थितीतही तिची जिद्द कायम होती. तिच्या मुखावरचे हसू कधी मावळले नाही की कोणापुढे तिने कधी हात पसरले नाही. आपला स्वाभिमान तिने सतत जपला आणि कुटुंबाच्या सर्व जबाबदाऱ्या जिवापाड श्रम करून पार पाडल्या.

'आपकी सेवामे' या चित्रासाठी लताने प्रथम हिंदी गीताचे रेकॉर्डिंग केले. या गाण्याचे संगीत दत्ता डावजेकर यानी दिले होते.

१९४७ साली मा. विनायकाचे अकस्मात निधन झाले. लतावर व तिच्या कुटुंबीयावर हा मोठाच आघात होता. लताला पुन्हा एकदार नोकरीसाठी वणवणण्याची पाळी आली. पण आता तिला हळूहळू पार्श्वगायनाची कामे मिळू लागली होती. या काळात अनेकानी तिला साह्य केले, स्नेहभावाने सूचना केल्या. योगायोगाने याच वेळी गुलाम हैदर याचा व लताचा परिचय झाला आणि त्यानी आपल्या 'मजबूर' चित्रात तिला गाणे दिले. या गाण्याने लताचा विशेष बोलबाला झाला. नतर एका पाठोपाठ एक निवीवरी नामवत संगीत दिग्दर्शकानी लताला गाणी द्यायला सुरवात केली. तिला भराभर कामे मिळू लागली. खेमचद प्रकाश, अनिल विश्वास, श्यामसुदर, नौशाद याच्याकडे लताने खूप गाणी गाइली. या वेळी लताला अतोनात कष्टही करावे लागले. मालाड, अंधेरी, गोरेगाव अशा दूरदूरच्या ठिकाणी तिला लोकल गाडीने प्रवास करून रेकॉर्डिंगला जावे लागे. खूप पायपिटी करावी लागे. वेळी दिवस दिवस नुसत्या चहावर ती राही. दिवसातून चार चार सहा सहा गाणी ती रेकॉर्ड करी. नित्येकदा सर्व काम आटोपून घरी परत यायला तिला पहाटेचे तीन चार वाजत. १९४८ साली तिने आपली पहिली 'हिलमन' गाडी घेतली. आणि मग तिची धावपळ जराशी कमी झाली.

लताने गाणी गाइलेले 'मजबूर' चित्र रौप्य महोत्सवी ठरले. त्याच वेळी 'अदाज' चित्र प्रकाशित झाले. ते ज्युबिली साजरी करून गले. 'बडी बेहेन' चित्रपटातली लताची गाणी अतोनात लोकप्रिय झाली. आणि 'बरसात' चित्रपटाने तर सुवर्णमहोत्सव साजरा केला. 'लता' हे नाव एकदम विलक्षण प्रसिद्ध झाले. सर्वत्र तिच्या रेकॉर्डस वाजू लागल्या. तिचे सूर वातावरणात भरून राहिले. लताच्या धडपडीचे सार्थक झाले होते. कष्टाचा काळ सपला होता. यशाची नवी तेजस्वी परपरा सुरु झाली होती.

ती यशाची कमान सतत चढती राहिली आहे. एकदा मिळवले ते स्थान लताने कायम टिकवले इतकेच नव्हे तर वर्षानुवर्षे ते तिने अधिकाधिक उचावत नेले. उत्कर्षाची एकाहून एक मोठी शिखरे ती आक्रमीत राहिली. आज या व्यवसायातली ती सर्वश्रेष्ठ पार्श्वगायिका होऊन बसली आहे. त्याची सर्वच भावडे उत्तम गातात. आशाने तर मोठेच नाव मिळवले आहे.

चित्रपटसृष्टीतल्या लताच्या अत्यत यशस्वी अशा कारकीर्दीचा रौप्यमहोत्सव आज १९६७ मध्ये साजरा होत आहे.

गेल्या पचवीस वर्षांची ही अखड कलासाधना चालू असताना लताने आपले व्यक्तित्व कसोशीने जपले. साभाळले. उपजत शहाणपणाने तिने जीवनाचा मार्ग आखला आणि काही मूल्ये, काही निष्ठा मनाशी बाळगून ती पुढे पाऊले टाकीत राहिली. कुटुबप्रमुख म्हणून तिने आपली जबाबदारी उत्कृष्टपणे पार पाडली. लाभलेले नाव अधिकाधिक उज्ज्वल केले. मिळालेल्या वैभवाचा सयमाने स्वीकार करून अडल्यानडल्याना सतत साह्याचा हात पुढे केला. महत्त्वाच्या सामाजिक व राष्ट्रीय कार्याना उदार देणग्या दिल्या. अनेक विद्यार्थ्यांचा शिक्षणखर्च बोलबाला न करता केला. कलेवरील अव्यभिचारी निष्ठा, श्रद्धाळू अत:करण, जीवनावरील प्रेम, तीव्र बुद्धिमत्ता, सवेदनाशील हृदय आणि कोणत्याही प्रसगी सतत साथ देणारा उत्कृष्ट विनोदबुद्धी ही लताच्या व्यक्तित्वाची काही वैशिष्ट्ये आहेत.

तथाकथित शालेय वा उच्च शिक्षणाचा लाभ लताला झालेला नाही. पण भोगलेले कष्ट, सूक्ष्म अवलोकन, वाचन, मनन, चिंतन याच्या साह्याने ती उणीव लताने भरून काढली आहे आणि एक अभिजात, सुसंस्कृत व शालीन असे व्यक्तिमत्त्व तिने सपादन केले आहे. तिच्या धागण्याबोलण्यापासून तो तिने हौसेने जमवलेल्या छोट्यामोठ्या सुदर कलावस्तूपर्यंत सर्वत्र तिच्या अभिरुचिसपन्नतेचा

ठसा उमटलेला दिसून येतो. तीव्र ग्रहणशक्ती आणि भाषाबोलींची वैशिष्ट्ये आत्मसात करण्याकडे जात्याच असलेला कल यामुळे अनेक भाषांवर लताने आश्चर्यकारक प्रभुत्व संपादन केले आहे. ती अतिशय संभाषणचतुर आहे, आणि स्नेहीमंडळीत नसल्यावर गप्पांमध्ये ती चांगला रंग भरते. इतरांच्या हुबेहूब नकला करण्यातही ती प्रवीण आहे.

लताला माणसांचे अगत्य आहे. तिच्या मित्रमैत्रिणींचा परिवार विस्तृत आणि विविध असून तो दूरवर पसरलेला आहे. कामाच्या अफाट व्यापातूनही ती त्यांना भेटण्यासाठी व पत्रे लिहिण्यासाठी वेळ काढते. परिचितांचे, मित्रमैत्रिणींचे वाढदिवस ध्यानी ठेवून त्यांना ती आठवणीने शुभेच्छा, भेटीच्या वस्तू धाडते. आपला देश तिने मोठ्या आत्मीयतेने व रसिकतेने पाहिलेला आहे. लता स्वतः उत्तम गायिका आहेच. पण गाण्याची ती मोठी शौकिनही आहे. बीथोव्हन, शॉपाँ, बाख, मोझार्ट इत्यादी संगीतकार; फैरूझ, उमे कुल्सुम, अब्दुल वहाब या अरबी गायकगायिका, पाश्चात्य देशांतले नामांकित गायक यांच्या उत्तमोत्तम ध्वनिमुद्रिका तिने साक्षेपाने गोळा केल्या आहेत. आपल्या वडलांचे गाणे तर ती मोठे मानतेच पण बडे गुलामअली खाँ, अमीर खाँ, नजाकत अली सलामत अली, भीमसेन जोशी, द. वि. पलुस्कर हे तिचे आणखी काही आवडते गायक आहेत. फोटोग्राफीची कला लताला उत्तम अवगत आहे, आणि पेंटिंगचाही एके काळी तिला फार नाद होता.

लताचे वाचन विस्तृत व चौफेर आहे. उर्दू शेर तिने साक्षेपाने वाचले आहेत. व त्या काव्याचे तिचे जबरदस्त पाठांतर आहे. शरच्चंद्र चट्टोपाध्याय यांचे साहित्य तिला फार आवडते. त्यांच्या अनेक कादंबऱ्यांची तिने पारायणे केली आहेत. गडकरी, खांडेकर, बालकवी, कुसुमाग्रज, हे असे काही तिचे आवडते लेखक–कवि आहेत. ज्ञानेश्वर, रामदास हे संतकवीही तिने वाचलेले आहेत. शिरडीसाई, रामकृष्ण परमहंस, स्वामी विवेकानंद, स्वातंत्र्यवीर सावरकर यांच्याविषयी तिच्या मनात परमभक्ती आहे. देव, देश, धर्म, परंपरा यांच्या बद्दलच्या सुजाण अभिमानातून आलेली निष्ठेची भावना तिच्याजवळ आहे.

## वि. स. खांडेकर

# लता? छे, कल्पलता

फलज्योतिषावर माझा विश्वास नाही. पण दोन तपे उलटून गेली तरी एक भविष्य माझ्या मनात घर करून राहिले आहे. मी ते ऐकले ऐन मध्यरात्री. सांगलीच्या सदासुख नाट्यगृहात. 'मानापमान' नाटकाच्या प्रयोगाच्या वेळी, दोन अंकांच्या मध्यंतरात. ते भविष्य वर्तवणारे होते मास्टर दीनानाथ. ऐकणारे होतो आम्ही दोघे—दिग्दर्शक विनायक आणि मी.

हा योग घडून आला तो असा. हंस पिक्चर्सचा कथालेखक म्हणून एकोणीसशे अडतीस साली मी कोल्हापूरला आलो. आलो कसला? विनायकांनी मला करवीर क्षेत्री ओढून आणले. त्यानंतरच्या वर्षं दीड वर्षांतली गोष्ट. एके दिवशी अचानक विनायक मला म्हणाले, "आज रात्री सांगलीला जायचंय आपल्याला. दीनानाथांनी बोलावलंय. ते कंपनी पुन्हा सुरू करताहेत. आज 'मानापमान' आहे त्यांचे."

त्या दिवशी रात्री नाटक सुरू होण्याच्या सुमारास आम्ही दोघांनी सदासुख नाट्यगृहात प्रवेश केला. अर्धेअधिक नाट्यगृह रिकामे होते. ते पाहून माझे मन चरकले. मराठी रंगभूमीचा तो अगदी ओहोटीचा काळ होता. भरतीची पूर्वचिन्हे कुठेच दिसत नव्हती. त्यामुळे 'बलवंत नाटक मंडळी'चे पुनरुज्जीवन होत असूनही नाट्यगृहात उत्साहाचे वारे कुठेच जाणवत नव्हते. अशा स्थितीतही दीनानाथांनी त्या रात्री धैर्यधराची पदे—विशेषतः 'शूरा मी वंदिले' हे पद—आपले सारे कौशल्य पणाला लावून कशी म्हटली हे अद्यापि माझ्या स्मरणात आहे. दोन अंक झाल्यावर विनायक आणि मी चहा घेण्याकरता आत गेलो. दीनानाथांशी गप्पागोष्टी करू लागलो. सभापण चक्कन भविष्य कथनाकडे वळले. एक तर विनायकांचा फलज्योतिषावर फार विश्वास होता. शिवाय दीनानाथ भविष्य अतिशय चांगले जाणतात हे त्यांना ठाऊक होते. त्यामुळे असेल किंवा प्रतिकूल परिस्थितीत कंपनीचा पुनर्जन्म होत असल्यामुळे असेल, हा विषय बोलण्यात निघाला. आणि दीनानाथांची मुद्रा एकदम प्रफुल्लित झाली. आपले पुढले ग्रह फार उच्चीचे आहेत, मागे आपण जसा ऐश्वर्याचा काळ पाहिला तसा, किंबहुना त्याहूनही अधिक उज्ज्वल असा कीर्तीचा आणि

वैभवाचा काळ आपल्याला पुढे लाभणार आहे हे त्यांनी इतक्या आत्मविश्वासाने सांगितले की त्या भविष्याबद्दल शंका व्यक्त करण्याचा धीर माझ्या पाखंडी मनाला झाला नाही. मी मुकाट्याने ऐकत राहिलो. चित्रपट संगीताच्या क्षेत्रातले गेल्या दीड तपातले लताबाईंचे कर्तृत्व पाहिले म्हणजे मनात येते, दीनानाथ जो उज्ज्वल भविष्यकाळ पाहत होते तो अक्षरशः सत्यसृष्टीत उतरायचा होता. त्या भविष्यात फक्त एक चूक होती. त्यांच्या वाट्यातीत ते घडायचे नव्हते. त्यांची थोरली लाडकी लेक ते भविष्य खरे करून दाखविणार होती.

अल्लड लताला मी पहिल्यांदा पाहिले, ते पुण्यात. 'सरकारी पाहुणे' या बोलपटाच्या सेटवर. त्यावेळी नवयुग चित्रपट कंपनी कोल्हापूरहून पुण्याला गेली होती. चिं. वि. जोश्यांच्या 'स्टेट गेस्ट' या कथेवरून 'सरकारी पाहुणे' या बोलपटाची पटकथा व संवाद मी लिहिले होते. चित्रित करावयाच्या पुढल्या भागात विनायकांना कुठे काही बदल हवे असतील तर पहावे म्हणून मी स्टुडिओत गेलो होतो. बोलता बोलता विनायक दोन नवीन मुलींशी माझी ओळख करून देत म्हणाले, "ही बेबी आचरेकर. ही लता, दीनानाथांची मुलगी. या दोघींनाही आपल्या पुढल्या चित्रात काम हवीत हं! लताचा आवाज फार गोड आहे, तो ऐकल्याशिवाय त्याची गोडी कळायची नाही तुम्हाला!"

पुढे लौकरच विनायकांनी 'प्रफुल्ल पिक्चर्स' ही स्वतःची संस्था कोल्हापुरात स्थापन केली. साहजिकच विनायकांशी ऋणानुबंध असलेली सर्व मंडळी कोल्हापुराला आली. त्यात मंगेशकर कुटुंबही होते. प्रफुल्ल पिक्चर्सचे पहिले चित्र 'माझं बाळ' मी लिहिले. त्या चित्रात लताला शोभेल अशी भूमिका देणे कठीण होते. ते होते कुमारी मातेच्या समस्येवर आधारलेले चित्र. त्याची ठेवण मूलत:च गंभीर होती. अशा कथेत मोडतोडीला किंवा तडजोडीला फारशी जागा नव्हती. शिवाय मला हुकमेहुकूम काही लिहिता येत नाही. मनात फुललेल्या कथानकात फाजील पात्रे घालून पुन्हा त्याला सदिश स्वरूप देणे मग जमण्याजोगे नव्हते. पण विनायकांना दहाबारा वर्षांच्या लताचा गोड आवाज या चित्राच्या द्वारे लोकांना ऐकवायचा होता. त्यासाठी कुठेतरी गाण्याची एक जागा शोधून काढणे प्राप्त होते. पण मोठ्या शहरात राहायची जागा मिळवणे जितके कठीण, तितकेच गंभीर बोलपटात रसपरिपोषक अशी गाण्याची जागा शोधून काढणे अवघड!

विनायकांना लहान मुलाचा खोडकर स्वभाव चित्रित करण्याची व अशा एखाद्या प्रसंगाच्या साहाय्याने बालस्वभावाला शोभेल असे गाणे घालण्याची हौस होती. अशा गाण्याचा नाट्यात्मक उपयोग करून घेण्याचे त्यांचे चातुर्य मला परिचित होते. माझ्या 'देवता' चित्रपटात नायिकेच्या घरचे गरीबीचे वातावरण चित्रित करीत असताना तिचा धाकटा भाऊ प्रभाकर आणि धाकटी बहीण प्रेमा यांच्या तोंडी 'तुझ्या गळा माझ्या गळा' हे ताम्यांचे गीत घालून त्यांनी मोठी रंगत आणली होती. 'माझं बाळ' मध्ये असेच काहीतरी हवे होते त्यांना. पण तशी जागा पुढे सापडेना. कविवर्य तांबेही माझ्या मदतीला येईनात. शेवटी अण्णांच्या आश्रमातल्या एका खोडकर मुलीचे काम त्यांनी लताला दिले. ती मुलगी अण्णांच्या खोलीतल्या नाना प्रकारच्या वस्तूंशी खेळत आणि मोठ्या माणसांच्या नकला करीत गाणे म्हणते अशी कल्पना त्यांनी सुचवली. कसेबसे ते गाणे मी केले. 'नाही मी एकटी' असा काही तरी त्या गाण्याचा प्रारंभ असावा!

दीनानाथाची आठवण करून दिली. पुढे प्रफुल्ल पिक्चर्सच्या 'गजाभाऊ' 'सुभद्रा' वगैरे चित्रपटात लताला लहानसहान कामे दिली गेली. पण मुळात अतिशय गोड असलेल्या आणि संगीताची उपजत जाण असल्यामुळे अनुरागपूर्ण वाटणाऱ्या तिच्या आवाजाचा उपयोग प्रफुल्ल पिक्चर्स पुरेसा करून घेऊ शकले नाही. त्यासाठी अल्लड वयाच्या एखाद्या मुलीभोवती संगीताला पोषक असे कथानक गुंफणे आवश्यक होते. तशी कथाकल्पना माझ्यापाशी नव्हती. त्यामुळे याविषयी विनायकांचे व माझे अनेकदा बोलणे होऊनही त्यातून काही निष्पन्न झाले नाही.

मात्र या काळात लताचे गाणे वाढावे म्हणून विनायकांनी जसे प्रयत्न केले तसे पोरवय असूनही आत प्रेरणेने आपली कला समृद्ध करण्याकडे तिने लक्ष वळवले. या कामी तिला सर्वांत अधिक उपयोग झाला असावा तो नूरजहान या नटीचा. 'बडी मा' या प्रफुल्ल पिक्चर्सच्या चित्रपटाची ती नायिका होती. तिचा आवाज जेवढा गोड तेवढाच मोकळा. गाण्यात विलक्षण सहजता. त्यामुळे तिचे गाणे सैगलप्रमाणे मनाची चटकन पकड घेई. अर्थांत रसमयता प्राप्त करून देणारी तिची उच्चारपद्धती आणि स्वरसाधना अनुकरणीय होती. 'बडी मा' चे शूटिंग सुमारे वर्षभर चालू होते. या काळात नूरजहानच्या रूपाने कलेच्या आणि कीर्तीच्या शिखराकडे जाणारी पाऊलवाट लताला प्रथम दिसली.

प्रफुल्ल पिक्चर्सचा संसार अवघी दोन अडीच वर्षे कोल्हापुरात होता. त्या अवधीत विनायक अनेकदा माझ्याकडे येत. कधी कथेच्या चर्चेकरता, कधी मनमोकळेपणाने गप्पागोष्टी करण्याकरता. क्वचित लताही त्यांच्याबरोबर असे. आमची बैठक रंगली म्हणजे ती दोन दोन तीन तीन तास चाले. 'माझं बाळ' च्या वेळची अशी एक आठवण माझ्या मनात अजून जागृत आहे. सुमारे दहा वाजता विनायक माझ्याकडे आले. तिसऱ्या मजल्यावरच्या हॉलमधल्या खोलीत आमची चर्चा सुरू झाली. लता थोडा वेळ स्वस्थ बसून ती ऐकत होती. पण घटकाभरात ती या घरगुती सत्पदीला कंटाळली. ती उठली. इकडे तिकडे पडलेली माझी पुस्तके तिने चाळून पाहिली. त्यात मुग्ध वयाला आकृष्ट करील असे एकही पुस्तक नव्हते. मग मन रमविण्याकरता काही तरी गुणगुणत ती खोलीत इकडे तिकडे फिरू लागली. तिच्या गुणगुणण्यातल्या गोडव्याने माझे लक्ष वेधून घेतले. एखादे फुलपाखरू एका फुलावर बसते न बसते तोच चटकन जसे अगदी दूरच्या फुलावर उडून जाते तसे अगदी भिन्न भिन्न प्रकारचे सूर ती सहज आळवीत होती.

पुढे कानी मुंबईला गेली. कथेच्या निमित्ताने अधूनमधून मला मुंबईला खेप टाकावी लागे. एखाद्या वेळी मी विनायकांकडे जेवायला राहत असे. लता तिथे दिसे. क्वचित पडली असे. गाण्यामध्ये तिची चांगली प्रगती होत आहे असे विनायक म्हणत. पण माझे गाण्याचे ज्ञान अकारापासून विकारापर्यंत असल्यामुळे त्याचा पडताळा घेण्याचा मी कधीच प्रयत्न केला नाही.

एकोणीसशे सत्तेचाळीस साली विनायक अगदी अकाली दिवंगत झाले. मराठी चित्रपटसृष्टीवर तो एक जबरदस्त आघात होता. पण त्यापेक्षाही त्यांच्या कुटुंबावर झालेला तो वज्राघात होता. मंगेशकर मंडळींनाही तो तितक्याच तीव्रतेने जाणवला असावा! विनायकरावांसारख्या कलावंत पण अव्यवहारी दिग्दर्शकाचा जो काही पुराअपुरा आधार या कुटुंबाला होता तो अचानक कोसळून पडला. मुंबईसारख्या अफाट शहरात आई आणि चार भावंडे एवढा प्रपंच चालविण्याची जबाबदारी थोरली मुलगी म्हणून पधराशोळा वर्षांच्या लतावर येऊन पडली. गाण्याखेरीज चरितार्थाचे दुसरे काही साधन हाती नव्हते. अशा स्थितीत पार्श्वगीतगायनाचे काम मिळवणे, ध्वनिमुद्रणाकरता बसणे अगर आगगाडीने वेळी अवेळी स्टुडिओत जाणे, रात्री अपरात्री बरोबर सोबतीला कोणी नसणे आणि हे सारे चित्रपटाच्या मायानगरीत एका पधराशोळा वर्षांच्या मुलीने करणे हे मोठे दिव्य होते. पण लता निग्रही वृत्तीने त्या दिव्याला सामोरी गेली. जिचे मुग्धत्व अजून पुरते संपलेले नव्हते अशी ही मुलगी मनाने प्रौढ झाली. आई व भावंडे यांना सांभाळण्याची जबाबदारी तिने जिद्दीने पार पाडली.

त्या आरंभीच्या काळात लताबाईंना जे कडूगोड अनुभव आले ते त्या शब्दबद्ध करतील तर चित्रपटसृष्टीच्या दुरून साजऱ्या दिसणाऱ्या डोंगरावर किती काटे आणि खाचखळगे असतात याची बाहेरच्या जगाला कल्पना येईल. मुंबईसारखे मवाली शहर, स्टूडिओ स्टेशनापासून मैल दीड मैल लांब, ध्वनिमुद्रण संपायला रात्रीचे अकरा वाजून गेलेले. अशा वेळी जीव मुठीत धरून स्टेशन गाठायला त्या जात असताना अशोककुमारांनी दिलेल्या 'लिफ्ट'चे बोलता बोलता एकदा लताबाईंनी कृतज्ञतेने स्मरण केले होते. त्याची ती ओझरती आठवण फार फार बोलकी होती.

मात्र पार्श्वगायिका म्हणून चित्रपटसंगीताच्या क्षेत्रात लताबाईंनी पाऊल टाकताच त्यांच्या अगदी आगळ्या अशा कंठमाधुर्याने आणि कोणत्याही प्रकारचे गाणे त्याला शोभेल अशा ढंगाने म्हणण्याच्या शैलीमुळे संगीतप्रेमी लोक तात्काळ त्यांच्याकडे आकृष्ट झाले. कानन, सुरैया, शमशाद बेगम, नूरजहान वगैरे अनेक गायिका त्यापूर्वी आपापल्या परीने लोकप्रिय होत्या. पण लताबाईंचा या क्षेत्रात उदय होईपर्यंत ते चांदण्यांनी भरलेले आकाश होते. त्यात चंद्रकोर उगवलेली नव्हती. 'बरसात', 'महल' वगैरे चित्रपटांतील लताबाईंची गीते ऐकणारांना कलेकलेने वाढणाऱ्या त्या चंद्रकोराचे दर्शन झाले. लताबाईंच्या यशाचे 'She came, she sang and she conquered' असे वर्णन केले तर त्यात अतिशयोक्ती नाही. या क्षेत्रात पदार्पण करण्याबरोबर मिळालेल्या विजयाची परंपरा त्यांनी वर्षानुवर्षे अखंड चालविली आहे. बुधवारी 'बिनाका' लागल्यावर केवळ शाळाकॉलेजातील मुलेच नव्हेत, तर मोठी माणसे सुद्धा आजचे 'टॉप' गाणे कुणाचे असेल याची मोठ्या उत्सुकतेने चर्चा करतात—अंदाज बांधतात, आणि अपेक्षेप्रमाणे ते बहुधा त्यांच्या लाडक्या लताचेच असते.

कोणत्याही कलेच्या क्षेत्रात दीर्घकाळ शिखरावर राहणे कठीण असते. शिवाय शिखर ही जागाच अशी आहे की उंचीमुळे तिथून खाली पाहणाऱ्याचे डोळे फिरतात. त्यांना तोल जाण्याचा भ्रम निर्माण होतो. पण लताबाईंच्या ठिकाणी आवाजाची दैवी देणगी, विवेकशील मनोवृत्ती आणि कला ही उग्र तपश्चर्येवाचून प्रसन्न होणारी देवता नाही याची रोमरोमात भिनलेली जाणीव यांचा त्रिवेणीसंगम झाला आहे. त्यामुळे शिखरावर दीर्घ काळ उभ्या असूनही खरे शिखर अजून दूर आहे या भावनेने त्यांची कलासाधना चाललेली असते.

त्यांच्या या साधनेसंबंधाने काही लिहिण्याचा अधिकार मला नाही. मात्र राहून राहून माझ्या मनात एक गोष्ट येते ती ही. सॉमरसेट मॉमच्या 'ए रायटर्स नोटबुक' या पुस्तकातील साहित्यविषयक टिपणांप्रमाणे आपल्या स्वरसाधनेविषयी लताबाई अशी काही टिपणे करतील तर ती जेवढी मनोरंजक तेवढीच उद्बोधक होतील. मला मात्र नेहमीच वाटत आले आहे की लताबाईंची स्वरसाधना चालते ती एकनाथांनी वर्णन केलेल्या दत्ताच्या साधनेसारखी—'जो जो ज्याचा घेतला गुण । तो तो गुरु म्या केला जाण । गुरूसी आले अपारपण । जग संपूर्ण गुरु दिसे ।'

यामुळेच क्षियांच्या वेषभूषेपेक्षाही अधिक वेगाने जिथल्या आवडीनिवडी बदलतात अशा चित्रपटसंगीताच्या प्रांतात त्यांच्या अग्रपूजेच्या स्थानाला कधी ढळ पोचला नाही. चाळीचा जिना चढताना कसरत करणाऱ्या सर्कसगुंडांना असो अथवा 'ॐ तत्सवितुर्वरेण्य' असा गायत्री मंत्र जपत उगवत्या सूर्यनारायणाला अर्घ्यदान करणाऱ्या भाविकाचा असो, त्याला धक्का लागू नये ही दक्षता घेऊन लताबाई ते गाणे आपल्या खास वैशिष्ट्यांनी नटवतात. मधमाशीप्रमाणे टिपलेल्या अगणित स्वरसौंदर्यांपैकी कोणते कुठे योजावे याची जाण त्यांच्याइतकी चित्रपटांतील अन्य गायकांना क्वचितच असेल. 'घनश्याम सुंदरा श्रीधरा' 'ओ सजना बरखा बहार आयी' 'नैना बरसे रिमझिम रिमझिम' 'कहीं दीप जले कहीं दिल' 'ऐ मेरे वतनके लोगो' 'कैसे दिन बीते' 'जाने कैसे सपनोंमें खो गई अँखियाँ' अशी त्यांनी दहावीस निवडक गाणी ऐकली तरी त्यांच्या प्रतिभेच्या नवनव्या उन्मेषांची आणि परिश्रमाच्या पराकाष्ठेची साक्ष पटेल. या गुणविशेषामुळेच त्यांच्या कितीतरी गाण्यांना अबोलीचा रंग आणि बकुळीचा गंध लाभला आहे.

चित्रपटातले गाणे असते अवघे तीन मिनिटांचे. त्याचे वरवरचे अनुकरण करणे नितेसे अवघड नसते. त्यामुळे गोड गळा असलेल्या अनेक मुलींच्या आईबापांना आपली कन्यका लताबाईसारखी गाते असा भ्रम उत्पन्न होतो. पण या गाण्यात लताबाई जे जीव आनतात आणि जिव्हाळा निर्माण करतात त्याची प्रचीती बाह्य अनुकरणातून कशी येणार! 'ओठ सजना' सारखे गाणे जेव्हा लताबाई गातात तेव्हा त्या लताबाई राहात नाहीत. त्या ते गाणे जगतात. चांगल्या गाण्याच्या शब्दाशब्दातले सुखदुःख त्या भोगतात आणि स्वरास्वरातून ते उत्कटतेने प्रकट करतात. त्याचे गाणे एखाद्या फुला प्रमाणे उमलत जाते. मग त्यातून भावनेचा सुगंध दरवळू लागतो. चित्र असो, शिल्प असो, साहित्य असो या संगीत असो; प्रत्येक कलेच्या अंतरंगी एक प्रकारचा दर्द असतो. जो कलाकार त्याचा सुंदर रीतीने आविष्कार करू शकतो तोच सामान्यापासून रसिकश्रेष्ठापर्यंत सर्वांची मने जिंकू शकतो.

हा दर्द व्यक्त करण्याच्या कामी गोड गळ्याची देवाने दिलेली देणगी लताबाई अतिशय चतुरतेने वापरतात. तसे पाहिले तर 'गोड' या शब्दाने त्यांच्या आवाजाचे वर्णन करण्यात काही स्वारस्य नाही. कोशात अधिक सुलभ आणि अर्थग्राहक असा दुसरा शब्द नाही म्हणूनच तो वापरायचा. साध्या भाषणातही त्यांच्या आवाजाचा विलक्षण गोडवा जाणवल्यावाचून राहत नाही. एकोणीसशे एकसष्टच्या डिसेंबरातली गोष्ट. डोळ्यावर शस्त्रक्रिया करवून घेण्यासाठी मी मुंबईला चाललो होतो शस्त्रक्रियेनंतर पूर्ण विश्रांती मिळावी म्हणून मी लताबाईंच्याकडे राहावे अशी त्यांची व हृदयनाथाची इच्छा होती. त्याप्रमाणे त्यांच्याकडे उतरण्याचे ठरले होते. पुण्याला पोहोचल्यावर आम्ही कोणत्या गाडीने येत आहोत हे कळवण्यासाठी माझी थोरली मुलगी मंदा हिला मी मुंबईला फोन करायला सांगितले. तो करून असे सांगायला ती आली तेव्हा पर्णभारात लपलेल्या कोकिळेचा आवाज ऐकून चकित झालेल्या बालकाप्रमाणे ती मला म्हणाली, "लताबाईंच फोनवर आल्या होत्या. फोनवरून सुद्धा किती गोड लागतो त्यांचा आवाज! अगदी गाण्यातल्यासारखा!"

त्यांच्या आवाजातला गोडवा त्यांच्या अंतःकरणातही पाहायला मिळेल आस्तिक्यबुद्धी, देशभक्ती, कुटुंबप्रेम आणि स्नेहशीलता या सार्‍या भावना त्यांच्या ठिकाणी किती जागृत आहेत हे त्यांच्या परिचयाची संधी ज्यांना मिळाली आहे त्यांना वर्णन करून सांगायला नको. एकोणीसशे एकसष्टच्या डिसेंबरात त्यांचा पाहुणा म्हणून मी गेलो त्या रात्रीची गोष्ट. मुंबईला नेहमी नऊ वाजता पोहोचणारी गाडी कशाने कुणाला ठाऊक मध्येच रुसून बसली तिचा रुसवाफुगवा संपून घरं गाठायला अकरा वाजून गेले. पण आम्ही पाहतो तो लताबाई व घरची मंडळी आमची वाट पाहात बसली आहेत न जेवता. गाण्याच्या ध्वनिमुद्रणाची कामे कधी वेळीअवेळी चालतात, आणि झोपायला रात्रीचे दोनतीन कसे होतात याची कल्पना असल्यामुळे आपल्यासाठी ही मंडळी उपाशी तिष्ठत राहिली आहेत या जाणिवेने मला फार संकोचल्यासारखे झाले. पण ते लताबाईंच्या गावीही नव्हते. त्यांच्या दृष्टीने तो अतिथिधर्माचा आवश्यक असा भागच होता!

चित्रपटसृष्टीतल्या बहुतेक गोष्टी टळूपुटीच्या असतात. या जगात अहर्निश पैशाची पूजा केली जाते जीवन हा जुगार आहे ही समजूत बळावते. वेगाडी यश आणि क्षणभंगुर सुख याची मोहिनी भल्याभल्यांना एखाद्या वावटळीप्रमाणे कुठल्याकुठे उडवून नेते अशा या सृष्टीशी सतत निकटचा संबंध येऊनही लताबाईंनी आपल्या श्रद्धा आणि भावना कसोशीने सांभाळल्या आहेत पाण्यातल्या कमल पत्राप्रमाणे त्या या व्यवसायात वावरतात. आपले गाणे चांगले व्हावे म्हणून त्या जिवाचे रान करतील. पण ते गाणे उत्कृष्ट रीतीने ध्वनिमुद्रित झाले की त्याचा त्या जगाशी संबंध संपतो मग उरतात त्या देव्हार्‍यातल्या मंगेशाच्या मूर्तीपुढे भक्तिभावाने लीन होणारे एक लेकरू. माईच्या प्रकृतीची काळजी करणारी लेक भावंडावर मायेची अखंड वृष्टी करणारा दिदी या लताबाई ज्ञानदेवापासून शरच्चंद्रा पर्यंत श्रेष्ठ भारतीय प्रतिभावानांच्या साहित्याचे चोखंदळपणे वाचन करतील, साहित्यनिर्मितीतील सौंदर्यावर



वि स. खांडेकर

नेमाने वोट ठेवतील. जे त्याना आवडत नाही त्याविषयी आग्रहपूर्वक आपले मत सुनावतील. या लताबाई मराठी चित्रपटनिर्मितीला उभे राहायला जागा असावी म्हणून कोल्हापूरचा 'जयप्रभा' स्टूडिओ फायदेशीर होत नसतानाही तो चालवण्याची जबाबदारी अंगावर घेतील. या लताबाई सुंदर चित्र, सुंदर शिल्प किंवा सुंदर निसर्ग यांच्याशी समरस होतील आणि देशोदेशीच्या संगीताच्या ध्वनिमुद्रिका भान विसरून ऐकतील. हे सारे त्या जेवढ्या तन्मयतेने करतात तेवढ्याच हौसेने त्या आल्या गेल्याचे स्वागत करतील. स्नेह्यांशी गप्पागोष्टी करण्यात रंगून जातील. त्यांची विनोदबुद्धी तल्लख आहे. त्यामुळे त्या चतुर संभाषण करू शकतात आणि संभाषणाची गोडीही मनसोक्त चाखू शकतात. भारतीय संस्कृतीतील चिरंतन मूल्यांचा—शुचिता, त्यागबुद्धी, गृहस्थधर्म, कुटुंबवत्सलता, वडिलधाऱ्या माणसाविषयीचा आदर इत्यादिकांचा—त्यांना विलक्षण अभिमान आहे.

परंपरागत चांगले संस्कार त्या कटाक्षाने पाळतात. पाचसहा वर्षांपूर्वीची गोष्ट. त्यांच्या एका वाढदिवसाला त्या कोल्हापुरात होत्या. मला याची काहीच कल्पना नव्हती. सध्याकाळी नेहमीप्रमाणे एका स्नेह्याना बरोबर घेऊन मी फिरायला गेलो. मी गेल्यावर लताबाई आमच्या घरी आल्या. माझी फिरायला जाण्याची वाट ठरलेली आहे. मुलाने ती त्याना सांगितली. मग गाडी घेऊन लताबाई माझा माग काढीत आल्या. मी माझ्या स्नेह्यांबरोबर माळावर हवा खात बसलो होतो. रस्त्यावरून हळूहळू येणारी एक गाडी आम्हाला दिसली. काही क्षणानी तिच्यातून लताबाई उतरल्या व आम्ही बसलो होतो त्या दिशेने येऊ लागल्या. वाढदिवसादिवशी नमस्कार करून माझा आशीर्वाद घ्यायचा होता त्याना. तो त्यानी त्या माळरानावर घेतला.

'सूनबाई' चित्रपटाच्या वेळची गोष्ट. शस्त्रक्रिया झाल्यावर डॉक्टराना डोळा दाखवण्याकरता मी मुंबईला गेलो होतो. 'सूनबाई'ची गाणी तयार होत होती तेव्हा. या मराठी बोलपटाचे संगीत-दिग्दर्शक होते सलिल चौधरी. त्यानी काढलेली चाल मोठी मोहक पण अवखळ होती. बंगालीतील कोळ्यांच्या एका गाण्याची. त्या चालीवर गाणे करायचे होते ते बारशाच्या समारंभाला शोभेल असे. त्या चालीवर गाणे होणे कठीण आहे असे काही मंडळींचे मत असल्याचे मला हृदयनाथांनी सांगितले. म्हणून मी त्या चालीशी कुस्ती आरंभिली. ती चाल हृदयनाथांच्याकडून अनेकदा म्हणवून घेतली. गाणे कसेबसे पुरे केले. गाणे चालीबरहुकूम झाले आहे की नाही हे पाहण्याकरता सलिलबाबू आले. हृदयनाथांच्या खोलीत आम्ही तिघे बसलो. पण बंगाली व मराठी शब्दोच्चारात आणि शब्दांवरील आघातात फरक असल्यामुळे सलिलबाबूंच्या तोंडून सुद्धा ते गोड लागेना. इतक्यात लताबाई तेथे आल्या. त्यानी एकदोनदा कागदावरल्या ओळींवरून नजर फिरवली आणि 'हलके पाऊल ना' हे गाणे त्या म्हणू लागल्या. लगेच त्या गाण्याची रया बदलली. म्हणण्याच्या दृष्टीने त्यात कुठे काही खटकत नाही हे स्पष्ट झाले.

लताबाईंची कला राजवाड्यांच्या भिंतीत किंवा कलावंतांच्या मैफलीत कोंडून पडलेली नाही ही सर्वसामान्य मनुष्याच्या दृष्टीने भाग्याची गोष्ट आहे. त्यांच्या गाण्याचा गोडवा झोपडीपर्यंत पोहोचला आहे. कष्ट करून थकलेल्या जीवाना तो विसाव्यात आहे. ही कला त्यांच्या दैनंदिन जिव्हाळ्याचे एक साधन बनली आहे. हल्ली सध्याकाळी मी फिरायला जातो तेव्हा संध्यारागाची पश्चिमेकडली कलाकुसर पाहून मन आनंदून जाते. पण फिरून परत येताना ती कलाकुसर दिसत नाही. काळोखाने ती नाहीशी करून टाकलेली असते. मात्र त्या गमावलेल्या आनंदाची भरपाई करणाऱ्या दोन गोष्टी वाटेत मला हटकून भेटतात. रातराणीचा सुगंध आणि लताबाईंच्या कुठल्यातरी गाण्याचे गोड सूर. बंगल्यातून, घरातून, झोपड्यातून नाचत नाचत बाहेर येणारे सूर! जनजीवनात असे अढळ स्थान मिळण्याचे भाग्य असामान्य कलावंतांवाचून दुसऱ्या कुणाला लाभू शकेल?

माई मंगेशकर

# थोरली

आम्ही मंगशीला होतो तेव्हाची गोष्ट. नेहमीप्रमाणे सोमवारी महारुद्राच्या वेळी मी गोमुखीत तीर्थ घ्यायला गेले असताना माझ्या हातात मुगारा आणि बेलपत्र आले. त्यानंतर मला दिवस गेले. हा मंगशाचाच अनुग्रह असे मी समजले. पुढे बाळंतपणासाठी मी इंदोरला माझ्या माहेरा गेले आणि दिनांक अठ्ठावीस सप्टेंबर एकोणीसशे एकोणतीस रोजी शनिवारी रात्री साडेदहा वाजता लताचा जन्म झाला जन्मवेळी तिचे वजन दहा पौंड होते. बाळसे छान होते. आणि जावळही खूप होते. मला आठवते आहे, तान्हेपणीसुद्धा ती चळवळी आणि धडपडी होती. नवव्या महिन्यातच ती चालायला लागली बोबडेही कधी बोलली नाही. एकदम स्वच्छ बोलू लागली

लता दहाअकरा महिन्याची होती तेव्हाची एक आठवण अगदी सांगण्यासारखी आहे. त्यावेळी आमचा मुक्काम पुण्याला होता. कशी कोण जाणे तिला माती खाण्याची बुद्धी झाली. मालक तेव्हा सारंगी वाजवत बसले होते. त्याचे लक्ष गेले. तिला माती खाताना पाहून ते खूप रागावले. अचानक त्यांच्या रागाचे पर्यवसान अश्रू ढाळण्यात झाले. आणि त्यांना रडताना पाहून चिमुरड्या लतानेही सारंगीच्या सुरातच आपला सूर मिसळला. मुलाचे पाय पाळण्यात दिसतात ते असे. पुढे सव्वा वर्षांची झाली नाही तो ती ऐकलेली रेकॉर्ड जशीच्या तशी गाऊन दाखवू लागली.

लहानपणापासूनच तिला वडलांचा फार लळा. त्यांचाही तिच्यावर फार जीव. पहिलीच असल्याने त्यांनी तिचे खूप कोडकौतुक केले. लताचा स्वभाव लहानपणापासून भोळा, पाचपेच बिलकूल नाहीत. परंतु उपजत शहाणपणा मात्र खूप. वयाच्या मानाने समज फार चांगली. मालकांना तिचा फार अभिमान वाटे. तिचा शब्द तर ते अगदी फुलासारखा झेलत असत. ते नेहमी म्हणत की मी जे कमावले नाही, ते ही कमावून दाखवील. माझे नाव झाले नाही परंतु हिचे फार नाव होईल.

आमच्या नाटक कंपनीच्या कॅशाची पेटी घरातच असे. त्यात भरलेल्या रुपयांच्या ढिगावर लता जाऊन बसत असे मी जमिनीवर बसणार नाही असे ती म्हणत असे मालक तिचा हा बालहट्ट पुरा करीत.

एखादे विशी लहर लागली की ती आपल्या वडलांना म्हणे, बाबा मला अमुक राग शिकवा. ती चार वर्षांची असताना आम्ही इंदूरला गेलो होतो. राजवाड्यावरचे निशाण चढता उतरताना सनई वाजे. एका सध्याकाळी सनईचे ते सूर तिने ऐकले आणि ती आपल्या वडलांना म्हणाली, बाबा मला अशीच चीज पाहिजे. तेव्हा त्यांनी तिला 'सदारंग नित उठकर देत दुहाई' ही पूरिया धनाश्री रागातली चीज शिकवली.

तिच्यावाचून मास्टरांना मुळीच करमत नसे. ते बाहेरगावी गेले होते तेव्हा तिने शाळेत जायला सुरुवात केली. ते परत आले तर त्यांच्या जेवणाच्या वेळी ती घरी नव्हती. शाळेत गेली होती. मग ते खूप रागावले. माझी मुलगी समोर नसली तर मी जेवणार नाही म्हणाले. तेव्हापासून तिची शाळा सुटली. मग घरीच मराठी शिकण्यासाठी एक पंडित ठेवला. त्याने तिला आणि तिच्या पाठच्या धाकट्या भावंडाना गायत्री मंत्र शिकवला. पुढे पुण्याला एकेचाळीस साली आम्ही नवीन घर घेतले. घराची वास्तुशांत करतेवेळी मास्तरांनी पाची मुलांना बसवून पूजा केली. त्यावेळी या सगळ्या मुलांनी गायत्री मंत्र अस्खलित म्हटला.

मास्तर दररोज सकाळी साडेचार वाजता रियाझाला बसत. 'ए मान्दे गहू' ही भैरव रागामधील चीज त्यांची विशेष आवडती होती. पुष्कळदा ही चीज ते या वेळी गात असत. त्यावेळी चिमुकली लता जागी होई आणि अर्धवट झोपेत पडल्या पडल्याच सारे लक्षपूर्वक ऐकत राही. तिच्या शाळेत जाण्याविषयी मघाशी सांगितलेच आहे. जेमतेम दोनचार दिवस ती शाळेत गेली असेल नसेल. तिथेही एक दोन तीन या आकड्यांऐवजी सा रे ग म या स्वरांनी तिने मोजायला सुरुवात केली तेव्हा मास्तरांनी घरी तक्रार केली की शिकण्याऐवजी गाण्यातच या मुलीचे लक्ष आहे. माझ्या आठवणीप्रमाणे तिच्या वयाच्या पाचव्या वर्षापासून मास्तरांनी तिला स्वतः शिकवायला आणि चिजा द्यायला सुरुवात केली. तुला कुठली चीज पाहिजे आहे असे ते तिलाच विचारत आणि ती सांगेल ती चीज तिला शिकवत असत. त्यांना रियाज ऐकून ऐकून तिला त्याच चिजा माहीत झाल्या होत्या. त्या बालवयातही ती त्यांनी शिकवलेल्या चिजा व्यवस्थित घेत असे हे विशेष. मास्तर हयात असेपर्यंत हा क्रम चालू होता. हळूहळू पाठची एक एक भावंडे शिकण्यात सामील होऊ लागली. तेव्हा चिजा देताना मास्तर प्रत्येकाला वेगळी चीज देत असत. यमन, देसी, मुलतानी, बिलावल, मालकंस, केदार, भैरवी या प्रचलित रागाबरोबरच बडहंस सारंग, शुद्धकल्याण, बिहागडा, खेम कल्याण, श्री गौरी, मल्हार केदार, सुगराई, पचम, छाया, बहादुरी तोडी, गुणकली यासारख्या अनेक अनवट अप्रचलित रागांतल्या चिजाही त्यांनी तिला शिकवल्या.

वयाच्या सातव्या वर्षी लता सोलापूर येथे जलशात गायली. हा तिचा पहिला सार्वजनिक कार्यक्रम. त्यानंतर पुण्याला आणि बेळगावला मास्तरांच्या जलशातच तिचेही स्वतंत्र गाणे झाले.

तिच्या वडलांनी जन्मात एकदाच तिला शिक्षा केली. त्याचे असे झाले, तिचे गाणे तालात येत नव्हते. सारख्या चुका होत होत्या. तेव्हा ते फार रागावले. घडवंचीवर गाद्या रचल्या होत्या त्यावर त्यांनी तिला बसवून ठेवले आणि तेवढा ताल पाठ होईपर्यंत जेवण मिळणार नाही असे सांगितले. ताल पाठ झाल्यावरच तिला खाली उतरवले. त्यानंतर ती कधीही बेताल गायली नाही.

मास्तरांच्या आयुष्यातल्या अखेरच्या दोनतीन वर्षांत प्रकृतीच्या अस्वास्थ्यामुळे त्यांनी तिच्या गाण्याकडे विशेष लक्ष दिले नाही. तिला शिकवलेले चांगले ग्रहण करण्याची ताकद आली आणि ते गेले हा दैवदुर्विलास नव्हे काय? त्यांच्या अखेरच्या दिवसात ते स्वतःच चिजा लिहीत असत. मग अचानक एखाद्या चिजेचा अंतरा आठवला की तो समोरच्या भिंतीवर नाहीतर मिळेल त्या कागदावर लिहून ठेवीत आणि तिला हाक मारून तो कुठल्या रागाचा आहे वगैरे माहिती तिला सांगत.

रायेसर लता म्हणजे त्यांच्या बहिणींचा जीव की प्राण होती. ते आजारी असताना एकदा

त्यांनी रेडिओवर तिचा कार्यक्रम ऐकला. 'पावना वामना' आणि 'सौभद्रा'तली एकदोन पदे ती गाईली होती. त्यावेळी तिचे गाणे ऐकून "आता मला मरायला हरकत नाही. माझा स्वर मी ऐकला" असे उद्गार त्यांनी मनमोकळे काढले.

त्याच्या दहाव्या अकराव्या वर्षीच लता रेडिओवर गाऊ लागली. त्यावेळी रेडिओवर ती नाटकातली पदे म्हणत असे. काही पदे तिच्या वडलांनी तिला शिकवली होती तर काही नुसती ऐकून ऐकून तिने स्वत:च शिकून घेतली होती. शेवटच्या आजारात मालक मला म्हणाले, "घाबरू नकोस. हा सूर्यास्त होत असला तरी समोरच या सूर्याचा उदय होत आहे. सर्व काही ठीक होईल."

मालक गेल्यावर तिने त्यांचा मोठा फोटो लावला. गुरुवारचा उपास सुरू केला तेव्हापासून आजतागायत ती गुरुवार करत आहे. त्यांच्या फोटोची पूजा करून त्यांना मनोमन वंदन करून ती गाण्याचा रियाज करीत असे. गुरुवारी तर ती नेहमीपेक्षाही अधिक रियाज करी.

मालक गेल्यावर आम्हाला हलाखीचे दिवस आले. तिचे वय त्यावेळी बारा वर्षांचे होते. पण ती मला म्हणाली, "बाबा गेले तरी मी आहे. काळजी करू नकोस. मी कष्ट करीन आणि तुमचा सर्वांचा सांभाळ करीन." आणि आपले हे शब्द तिने खरे करून दाखवले.

दिवस कठीण होते तरी आमचे जुने विश्वासू नोकर आम्हाला धरून राहिले. तरीपण एखादे वेळेस आचारी नसला तर ती मग स्वैपाक करू देत नसे. आपण स्वत: ती जबाबदारी अंगावर घेई.

मालक गेल्यावर लता विनायकरावांकडे प्रफुल्ल पिक्चर्समध्ये ऐंशी रुपयावर नोकरी करू लागली. कधी ताप आला, काही दुखले खुपले तरी ती मला पत्ता लागू देत नसे "माईने काम करू दिले नाही तर माझी भावंडे काय खातील?" असे ती म्हणे. 'गजाभाऊ' चित्रपटाचे शूटिंग चालू होते तेव्हा तिला ताप आला. पण तिने कुणाला कळू न देता तापातच काम केले. गजाभाऊ चित्रपटात त्याच आणखी एक प्रसंग. या चित्रपटात लताने एका लहान मुलीची भूमिका केली होती तिचा सांभाळ करणारी प्रौढ बाई तिचे हाल करते, तिला मारते असा एक सीन होता. नलिनी नागपूरकर यांनी या प्रौढ बाईचे काम केले होते. खरे मारल्याशिवाय रडू येणार नाही असे विनायकराव म्हणाले. त्यांच्या सूचनेनुसार नागपूरकर बाईंनी खरोखर तिच्या कानशिलात जोरात मारली. इतकी की ती कळवळली एवढेच नव्हे तर तिच्या कानातून रक्त आले. पण ही गोष्ट तिने मला सांगितली नाही. आपल्या भावंडांजवळ ती कधी कधी हे बोले आणि त्यांच्याकडूनच ते मला कळले. एकोणीसशे सत्तेचाळीस सालापर्यंत ती विनायकरावांकडे कामाला होती. हे दिवस अतिशय हलाखीचे गेले.

सत्तेचाळीस साली विनायकराव वारले त्यावेळी आमच्या घरात फार वाईट परिस्थिती होती. बाळ (हृदयनाथ) फार लहान होता. घरात कर्ता पुरुष कोणीच नव्हता सगळी जबाबदारी लतावरच पडली. तिने हळूहळू प्लेबॅक द्यायला सुरुवात केली होती पण प्रारंभी पैसे खूप बुडवले जात. केलेल्या कष्टाचा पुरेसा मोबदलाही मिळत नसे. त्यावेळी नाना चौकातल्या शंकरशेट मंदिरात आमचे बिऱ्हाड होते. ग्रँटरोडहून लोकलने लता अंधेरी, मालाड, गोरेगाव येथील स्टुडिओमध्ये गाण्यासाठी जाई. लोकलमधून उतरल्यावर ही दोनतीन मैलांची पायपीट तिला करावी लागे. तिच्या खाण्यापिण्याचे तर फारच हाल होत. सकाळी कपभर चहा घेऊन जाई ती संध्याकाळी उशीरा परत येई. स्टुडिओत कोणी तिच्या जेवणाखाण्याची चौकशी करीत नसे की कधी चहाचा कपही मिळत नसे. कधीकधी तर तिला भुकेमुळे चक्कर येई. पण याही परिस्थितीत ती शक्य तो घरी कुणाला पत्ता लागू देत नसे.

मला आठवते आहे, खेमचंद प्रकाश यांच्याकडे ती गाऊ लागली तेव्हा हे दिवस बदलू लागले. खेमचंद तिची काळजी घेत. खाण्यापिण्याची वास्तपुस्त करीत. पण तरीही रखडपट्टी चालूच होती पुढे वर्षभर काम करून थोडे पैसे जमल्यावर अठ्ठेचाळीस साली तिने हिल्मन कार–पहिली गाडी

घेतली. तेव्हा कुठे पायपीट थांबली. मग एकुणपन्नास साली दुसरी गाडी घेतली. त्यानंतर पुढे सतत भरभराटच होत गेली

त्याच काळातली आणखी एक आठवण. आमची परिस्थिती बरी नव्हती तेव्हा सोन्याच्या बांगड्या, पाटल्या, तोडे, चंद्रहार वगैरे माझे सर्व दागिने एकेक करीत मोडावे लागले होते. लताजवळ थोडेसे पैसे साचल्यावर तिने प्रथम जर काही केले असेल तर ते हे की ते सारे अलंकार नव्याने घडवून घेऊन तिने ते माझ्या स्वाधीन केले. त्यावेळच्या माझ्या भावना व्यक्त करण्यास पुरेसे शब्द माझ्याजवळ नाहीत.

घरात इतकी स्थित्यंतरे होत गेली तरी तिचा स्वभाव बदलला नाही. ती होती तशीच साधी, निगर्वी राहिली आहे. घरात जेवणास उशीर झाला, इतर कसलाही त्रास झाला किंवा एखादी गोष्ट मनाविरुद्ध झाली तरी तिने शांतपणे सहन केले आहे. घर सोडण्याचा विचार कधीही तिच्या मनात आला नाही. पण रस्त्यावरून सामानाने भरलेली बैलगाडी चालली आहे, बैलांना बोजा ओढता येत नाही किंवा रस्त्यावरच्या बेवारशी कुत्र्याला कुणी मारत आहे असे काही पाहिले की तिच्या मनाला फार यातना होतात. आणि एकदम एका चमत्कारिक वैराग्याचा तिला झटका येतो.

रस्त्यावरली भिंतींवरी बेवारशी कुत्री शोधून त्यांचे औषधपाणी करून पैसे भरून त्यांना पांजरपोळात सोडणे हा पूर्वी एक उद्योगच असे. कित्येकदा त्याने बैलगाडीवाल्यांना पैसे देऊन ओझ्याच्या दोन खेपा करायला लावल्या आहेत आमच्या घरात तर अनाथ बेवारशी अशी जवळ जवळ दहाबारा कुत्री आम्ही सांभाळली होती. त्यांचा थाट काही विचारू नका. त्यांना झोपायला गाद्या, पिले झाली की ती ठेवायला पाळणा, असे त्यांचे लाड होत लोक हाल करतील, नीट सांभाळणार नाहीत या भीतीने पिले बाहेर कुणाला द्यायची नाहीत. मग आमच्या घरात मात्र हा मोठा उत्सव!

लता जरी आजच्या काळातली मुलगी असली, फॅशनेबल जगात वावरत असली तरी तिच्या आवडीनिवडी मात्र जुन्या वळणाच्याच आहेत. याचे एक गमतीचे उदाहरण सांगते. वयोमानामुळे मला आता नऊवारी साड्या जड वाटतात. आणि घरातल्या घरात वहाणारी साड्या नेसणे सोयीचे पडते. पण लताला मात्र हे पारसे पसत नसते. तिचा आपला हट्ट असा की मी नऊवारीच नेसावे. मग ती काय करते तर एकदम बाजारात जाते आणि माझ्यासाठी दहाबारा उत्तमपैकी नऊवारी लुगडी घेऊन येते

अशा या माझ्या थोरल्या मुलीच्या किती गोष्टी सांगाव्यात! पितृभक्त, मातृभक्त, भावंडावर प्रेम करणारी अशी ही आमची लता. सर्व जबाबदाऱ्या अंगावर घेऊन हिमतगाने पार पाडणारी कुटुंबाचे ऋण फेडणारी घराण्याचे नाव मोठे करणारी.

बाळासाहेब देसाई

# आंतरराष्ट्रीय कलाकार

संगीतक्षेत्रात अनेक वर्षे ज्याची आठवण राहावी, न भूतो
न भविष्यति या शब्दातच खरोखर ज्याचे वर्णन करता यावे
असा अलौकिक गोड गळा घेऊन आलेली आणि चित्रपट-
सृष्टीत सर्वश्रेष्ठ पार्श्वगायिका म्हणून ख्यातनाम झालेली
एक फार मोठी कलावंत म्हणून गेली अनेक वर्षे लता मंगेशकर याना मी ओळखत होतो. त्यांच्या
प्रत्यक्ष परिचयाचा योग मात्र अगदी अलीकडे म्हणजे सहासात वर्षांपूर्वी आला. अठ्ठावन्न किंवा
एकुणसाठ मध्ये लताबाईंच्या वडलांच्या पुण्यतिथीला प्रमुख पाहुणा म्हणून मी गेलो आणि त्यावेळी
लताबाईंचा आणि त्यांच्या सर्व भावंडांचा माझा परिचय झाला. प्रसिद्धीचे झगझगीत वलय सतत
सभोवती फिरत असणाऱ्या लताबाई प्रत्यक्ष भेटीत मला फारच साध्या, नम्र व सभ्य असल्याचे
प्रत्ययास आले. तशीच त्यांची भावंडेही मला फार गुणी व सालस वाटली. बुद्धिमत्ता आणि कर्तृत्व
या त्यांच्या गुणांना अभिजात विनयशीलतेची जोड मिळालेली पाहून मला त्यांचे मोठे कौतुक वाटले.
त्यांच्याशी बोलत असताना मन एकदम खूप मागच्या काळात गेले आणि अनेक जुन्या आठवणी
मनात दाटून आल्या.

फार लहानपणी, त्यावेळी नाटकाची चैन माझ्यासारख्याच्या खिशाला परवडणारी नव्हती
त्यावेळी रंगभूमीवरच्या केवळ एकाच नटाच्या दर्शनासाठी मी पुन्हा नाटके बघत होतो. तो नट म्हणजे
मास्टर दीनानाथ. उंचापुरा धिप्पाड देह, राजबिंडे रूप, अत्यंत आकर्षक आणि परिणामकारक
व्यक्तिमत्त्व अशा दीनानाथांना स्टेजवर बघताना देहभान हरपून जाई. रंगभूमीवर ते पाऊल टाकीत
ते देखील कडाडून टाळी घेतच. आपल्या मरदार पहाडी आवाजात 'परवशता पाश दैवे' सारखे
गीत ते गाऊ लागले की सर्वांगावर थरथरून रोमांच उभे राहात. विजेसारखी त्यांची तान रंगभूमीवर
फिरू लागली की आश्चर्याने प्रेक्षक श्वास रोधून बघत राहात. केवळ दीनानाथांना बघण्यासाठी पिटात
दोन आण्याच्या जागी मी आनंदाने बसून राही. त्यांचे 'रणदुंदुभी' नाटक मी पन्नास वेळा तरी
पाहिले असेल. लताबाई व त्यांची भावंडे बघताना मला एकसारखी दीनानाथांची आठवण येत
होती. दीनानाथांना पाहताना हा अगदी वेगळा, स्वयंभू कर्तृत्वाचा व प्रतिभेचा कलावंत आहे हे

बाळासाहेब देसाई

तत्काळ जाणवत असे. लताबाईंही मला तशाच वाटल्या. तीच स्वतंत्र प्रज्ञा, तेच तेजस्वी व्यक्तिमत्त्व आणि कलेच्या ऐश्वर्याचा तोच वरदहस्त.

लताबाईंची आणि माझी प्रत्यक्ष भेट पाच दहा वेळाच झाली असेल नसेल. आणि तीही अगदी थोड्या वेळापुरती पण त्या अल्पकालीन भेटीतही त्यांची सुसंस्कृतता, संभाषणचातुर्य आणि स्वाभाविक सुजनता यांची माझ्या मनावर फार अनुकूल छाप पडली. रूढ अर्थाने शिक्षणाचा फारसा लाभ झालेला नसूनही एखाद्या पदवीधरालाही सुसंस्काराच्या दृष्टीने लाजवील असे त्यांचे व्यक्तिमत्त्व आहे. एकदा लताबाई आमच्याकडे जेवायलाही आल्या होत्या. त्यावेळी त्यांच्या संगतीत आम्हा सर्वांचा वेळ मोठ्या आनंदात गेला. एवढ्या मोठ्या गायिकेला जेवणात कितीतरी काळजी घ्यावी लागत असेल आणि पथ्ये सांभाळावी लागत असतील अशी माझी कल्पना होती. तथापि प्रत्यक्षात तसे काही आढळून न आल्यामुळे मला मोठी गंमत वाटली.

कामाच्या व्यापात करमणुकीसाठी वेळ काढणे आज जरी मला अवघड होऊन बसलेले असले तरी वेळात वेळ काढून लताबाईंची गाणी मी ऐकत असतो त्यांच्या व आशाबाईंच्या गाण्याचा मी एक निस्सीम चाहता आहे. ज्यावेळी संयुक्त महाराष्ट्राची स्थापना झाली त्या शुभ प्रसंगी लताबाईंच्या कंठातून निघालेली "घनश्याम सुंदरा" ही होनाजी बाळाची भूपाळी प्रत्यक्ष ऐकताना थरारून जाण्याचे भाग्य मला लाभले आहे. त्याचप्रमाणे चिनी आक्रमणाच्या प्रसंगी मुंबई येथील ब्रेबॉर्न स्टेडियमवर सहस्रावधी श्रोत्यांसमोर राष्ट्रीय संरक्षण निधीसाठी 'ऐ मेरे वतनके लोगो' हे जे अप्रतिम गीत त्यांनी गाइले, जे गीत ऐकताना प्रत्यक्ष पंडित जवाहरलाल नेहरूही गहिंवरले, त्या प्रसंगी मी हजर होतो या दोन्ही आठवणी मनावर ठसून राहिल्या आहेत.

लताबाई या केवळ महाराष्ट्रीय नव्हेत, केवळ राष्ट्रीय नव्हेत, तर आंतरराष्ट्रीय गायिका आहेत 'जागतिक कलाकार' हे विशेषण सर्वार्थाने जर आज कोणा भारतीय कलावंताला लागू पडत असेल तर ते लताबाईंनाच. संगीत ही विश्वभाषा आहे. म्हणून श्रेष्ठ संगीतकार हा कोणत्याही एका प्रांताच्या मर्यादांचा राहूच शकत नाही त्याचे सान्या जगाशीच नाते जडलेले असते असे लताबाईंनी सर्व विश्वाशी नाते जोडले आहे

## प्रल्हाद केशव अत्रे

# स्वरसम्राज्ञी

सौंदर्य (Beauty), संगीत (Music) आणि सुगंध (Fragrance) ही आमच्या जीवनाची तीन तत्त्वे आहेत. मनुष्याच्या ह्या तीन भुका भागल्यावाचून त्याच्या आत्म्याचा संपूर्ण विकास होऊ शकत नाही अशी आमची श्रद्धा आहे. म्हणून रोज सकाळी उठल्यानंतर डोळे, कान आणि नाक ह्या तीन अवयवांना यथास्थित आनंद दिल्यावाचून आमच्या दैनंदिन कार्यक्रमाला आम्ही प्रारंभ करीत नाही.

या आमच्या जीवनसाधनेत लताबाईंच्या गायनाला सर्वांत मोठे स्थान आहे. 'घनश्याम सुंदरा श्रीधरा अरुणोदय झाला' या त्यांच्या महामधुर भूपाळीने सारा महाराष्ट्र जागा झाला. 'चाफा बोलेना, चाफा चालेना' या 'बी' कवींच्या 'चाफा' गीताने त्यांनी सारा महाराष्ट्र 'फुली फुलवून' आणला आणि भास्करराव तांबे कवींच्या 'जन म्हणतील पळभर हाय हाय। मी जाता राहिल काय काय' या मृत्युगीताने त्यांनी साऱ्या महाराष्ट्राच्या काळजाचे लचके तोडले आहेत.

याव्यतिरिक्त आकाशवाणीवरील त्यांच्या गाण्यांच्या शेकडो नव्हे लाखो आवर्तनांनी त्या गेली पंचवीस वर्षे रोजच्या रोज भारतातील कोट्यवधि जनतेला आनंदाच्या महापुरात अक्षरशः बेहोष करीत आहेत. भारतीय संगीताचे अभिजात स्वरमाधुर्य त्यांनी साऱ्या भारतवर्षात कानाकोपऱ्यापर्यंत पोहोचविलेले आहे. त्यांची लोकप्रियता केवळ भारतातच नाही, सारे जग त्यांची गाणी आकाशवाणीवरून रोजच्या रोज ऐकत आहे. भारतीय चित्रपटातील संगीताची लोकप्रियता केवळ त्यांच्यामुळेच वाढलेली आहे. चित्रपटामध्ये पार्श्वगायनाला जे महत्त्व नि जो दर्जा लाभलेला आहे तो केवळ लताबाईंच्या पुण्याईमुळेच यात काय शंका आहे? ध्वनिमुद्रित संगीताच्या हजारो मुद्रिका काढून तर त्यांनी जागतिक विक्रम केला आहे. त्यांची ही कीर्ती ध्यानात घेऊन, 'टाईम' (Time) या विश्वविख्यात अमेरिकन साप्ताहिकाने लताबाईंचा परिचय आपल्या एका अंकात दिलेला होता. भारतीय आकाशवाणीच्या 'विविध भारती'मधील लोकप्रिय चित्रपटगीतांमधील शेकडा सत्तर गाणी लताबाईंची असतात हे आम्ही सांगण्याचीही आवश्यकता नाही.

मधुर आणि मुलायम आवाज, स्पष्ट आणि अर्थपूर्ण शब्दोच्चार यामुळे लताचे गाणे ऐकणाराचे

देहभान गळून पडते दुःख, क्लेश, यातना याना विसरायला लावण्याचे विलक्षण सामर्थ्य लताबाईंच्या स्वर्गीय गळ्यात आहे. जवळजवळ सर्व भारतीय भाषात गाणी गाऊन त्यानी आपले दिव्य स्वर कन्याकुमारीपासून ते काश्मीरपर्यंत पोहोचविले आहेत

महाराष्ट्राची संस्कृति नि परंपरा याच्याबद्दल स्वरसम्राट दीनानाथ मंगेशकर आणि त्यांचे कुटुंब याना केवढा उत्कट अभिमान आहे, तो सर्वविश्रुत आहे. महाराष्ट्रराज्यस्थापनेच्या महोत्सवाचे उद्घाटन लताबाईंनीच आपल्या मधुर मंगलाचरणाने केलेले सर्वांनी ऐकलेले आहे महाराष्ट्र सरकार आणि भारत सरकार यानी लताबाईंची ही महान संगीतसेवा लक्षात घेऊन त्यांच्या ह्या असामान्य गुणाचा सत्कार करावयाला नको काय ?



भालजी पेंढारकर

# खरी लता?

स्वरसुंदरी, गायनसम्राज्ञी, सरस्वती, कोकिळकंठी या आणि आणखी अशा, अनेक दुसऱ्याजोग्या भूषणांनी विभूषित असलेल्या पार्श्वगायिका कु. लता हिजबद्दल काही लिहिण्याचा मला आदेश आला आणि माझ्या मनःचक्षूसमोर फार लहानपणी पाहिलेले, कै० गणपतराव जोश्यांचे 'हॅम्लेट' नाटक तरळून गेले त्या नाटकात वेगाचे सोंग पांघरलेल्या राजपुत्राजवळ जाऊन, त्याच्या खऱ्या विचाराचा काही थांगपत्ता लागतो की काय याची चाचपणी 'शालेय' करू लागला राजकुमाराने शेजारच्या माणसाजवळची बासरी घेऊन ती शालेयाच्या हातात दिली आणि सांगितले, "या बासरीतून उत्कृष्ट संगीत, कधी हृदय पिळवटून टाकणारे करुणस्वर, तर कधी सर्व गोपगोपींना मोहून टाकणारे विश्वप्रेम-संगीत काढता येते तुम्ही ते काढून दाखवाल का?" शालेय बोलला, "मला ते करता येत नाही" त्यावर राजपुत्र म्हणाला, "या टीचभर लाकडाच्या निर्जीव नळकांड्यातले सुंदर सूर तुम्हाला काढता येत नाहीत आणि या साडेतीन हात देहात, विश्वकर्म्याने अजब करामतीने निर्मिलेल्या माझ्या अंतःकरणातले लपलेले विचार समजून घेण्याचा प्रयत्न करता!"

लता,–तिचे चाहते म्हणतात त्याप्रमाणे–भगवंताची बासरी आहे आणि राजपुत्र म्हणतो त्याप्रमाणे साडेतीन हात देहाची स्त्री आहे खरेच, ती काय आहे? अगोदर स्त्री, त्यातून दयामय भगवंतानी दिलेली आवाजाची अनमोल देणगी, सिनेमावाल्यानी (स्वतःच्या सोयीसाठी) अफाट जाहिरातींचे वलय तिच्याभोवती निर्माण केलेले चंचलत्वाबद्दल प्रसिद्ध असलेल्या लक्ष्मीच्या कृपेचा तिला लाभलेला साजशृंगार—खरी लता या सगळ्या सुंदर गर्दीतून पाहायची केव्हा आणि कशी! कोडेच आहे हे. जो तो आपल्या आवडीप्रमाणे, कधी करमणूक म्हणून, तर कधी हौस म्हणून कधी रिकाम्या सुताराप्रमाणे, तर कधी कुठलीही कुऱ्हाड सापडली तर पितर स्वर्गाला गेल्याचा नूपुरी आनंद वाटतो म्हणून हे कोडे सोडविण्यात वेळ दवडतो फार थोडे, लता समजण्यासाठी लताचा विचार करीत असतील. लताच्या आवाजाचा, संगीताचा, तिच्या अचूक शब्दफेकीचा, सूर आणि शब्द यांच्या द्वारा ती उभवीत असलेल्या अमृतमय मानविश्वाचा आनंद लुटणारे शेकडो, नव्हे सहस्रावधी गानप्रेमी सज्जन

तिचे गाणे ऐकतात. आनंदी होतात. 'वा! ईश्वराची काय देणगी आहे' असे म्हणतात. आणि तिला अगत्य, आशीर्वाद, शाबासकी, यापैकी काहीतरी देऊन पुन्हा आपल्या दैनंदिन उद्योगात मग्न होतात त्यांच्या दृष्टीने लता म्हणजे फक्त गीत. लता म्हणजे थकल्याभागल्या जीवाचा एक सुंदर विरंगुळा!

या चाहत्याप्रमाणेच, रणमैदानावरून तिला आलेली, शूर सैनिकापासून तो धुरंधर सेनापतींपर्यंत अनेकांची पत्रे मी वाचली आहेत. देशापासून दूर, आप्तविरहाने कष्टी आणि मातृभूमीच्या कुशीत येण्यासाठी उत्सुक असे ते जीव तिला लिहितात, "लताबाई, तुमच्या गाण्यात आम्हाला आमची घरदार दिसतात. आप्तांचे आवाज ऐकू येतात. बालपणाचे बोलके बोल त्यातून उमटतात. आणि त्यात आमचं एकाकीपण विरून जात. आम्ही सज्ज होतो नव्या दमानं .."

घरीदारी कष्ट करणाऱ्या नायाबापड्या लताच्या गाण्याच्या सुरांबरोबर कष्ट विसरून राबतात. क्वचित, स्वत:ही गातात. गुणगुणतात. तृप्त होतात.

पोटासाठी दिवसरात्र राबणाऱ्या हमालापासून तो खुर्चीत अडकलेल्या हपीसरापर्यंत सारेजण; माणूस, जात, गोत, पंथ, भेद विसरून लताचे गाणे ऐकतात. कानातून हृदयात प्रवेशणाऱ्या संगीताच्या या सुंदर प्रवाहात मनसोक्त डुंबतात. प्रसन्न होतात. त्यापलिकडे लता कोण, कशी, कुठे, काय करीत असेल याचा विचारही त्यांना शिवत नाही.

पण आपल्याला प्रिय अगर अप्रियही व्यक्तीच्या जीवनाची जादा चोकशी हाही मनुष्यस्वभाव आहे. एवढेच नव्हे तर आपल्या आवडीच्या व्यक्तीला नसते सद्गुण चिकटवणे आणि नावडत्या माणसावर नसते दुर्गुण लादणे हेही अनेक प्रसंगी घडते. लताच्या बाबतीत हा दुसरा प्रकार विशेषपणे घडत आला आहे.

देशाच्या सर्व भागातून आणि परदेशी स्थिर झालेल्या भारतीयाकडून तिला दररोज अनेक पत्रे येतात त्यात कोणी तिला सरस्वतीचा अवतार म्हणतो. कोणी गानदेवता म्हणतो. कोणी तिचा फोटो मागतो. कोणी तिला प्रेमपत्रे लिहितो. आणि काहीजण पत्रात तिचा उद्धारही करतात. कारण?, त्यांचे तेच जाणोत! काही गानप्रेमी सज्जन स्त्रीपुरुष तिच्या दैवदत्त देणगीचे मनापासून कौतुक करून वत्सप्रेमाने तिला आशीर्वाद देतात. हे सारे तिला लाभलेले आहे ती लता खरेच कशी आहे असाही प्रश्न काहीजण करतात. त्यात अस्वाभाविक असे काहीच नाही. पण लता खरी कशी आहे?

बद्दलच्या या सर्व एऱ्याखोट्या, चागल्यावाईट गोष्टी वर्तमानपत्राच्या चव्हाट्यावर इतक्या हिरीरीने मांडल्या जातात की त्या खोट्या म्हणण्याची प्रत्यक्ष लताची वाकद नाही. तेथे इतराची काय कथा!

माणसाच्या सर्व आशाअपेक्षा, गुणदोष, सुखाची आवड, दु:खाच्या यातना, या बाबतीत लताही माणूसच आहे. स्तुतीने आनद वाटणे, दु खाने रडू येणे, प्रेमाने गुदगुल्या होणे, निंद्याचा सताप येणे, खावे, प्यावे आणि साधे का होईना, ल्यावे असे वाटणे, या सर्वसाधारण गोष्टी तिच्यातही आहेत. दैवी देणगीने अलकृत झालेला तिचा गळा आणि तिने आत्मसात केलेल्या कलेचे अलौकिकत्व सोडल्यास लता ही लताच आहे. माणूस आहे.

लताचे काही दोष ध्यानात घेऊनही तिला लाभलेल्या ईश्वरदत्त देणगीप्रमाणेच तिची कर्तबगारी तिच्या वैऱ्यानाही मानावी लागल. वयाच्या बाराव्या चौदाव्या वर्षापासून अनुभव, विशेष शिक्षण अगर कोणाचा पाठिंबा यापैकी जवळ काहीही नसताना केवळ स्वत च्या श्रमाने आजची मुनत्ता संपादणे, एवढा लौकिक मिळवणे आणि हे सर्व सातत्याने आज बावीस पचवीस वर्षे अबाधित साभाळणे, वाढवणे ही काय साधारण गोष्ट आहे? हे काय केवळ दैवाच्या दयेने घडले? बहुतेक भारतीय भाषाच्या खाचाखोचा, त्यातले निर्दोष उच्चार आत्मसात करण्यासाठी त्या त्या भाषेतील अधिकारी शिक्षकाजवळ तिने केलेला अभ्यास, पदातील भावनाचा प्रसगाला साजेल असा आविष्कार करण्यासाठी जरूर असलेले विचार, उच्चार आणि स्वराचे सौंदर्य हे काय श्रमाशिवाय, अभ्यासाशिवाय केवळ आवाजाच्या देणगीने घडते? तिला तिच्या आवाजाचे सोने भगवतानी दिले हे जितके खरे तितकेच त्या सोन्याचे नवनवीन सुदर अलकार घडवून ते मोहक करणे हे लताचे स्वतत्र कर्तृत्व आहे.

एकत्र कुटुब हा लताच्या वैशिष्ट्याचा, अनेकापैकी एक अभिनदनीय पैलू आहे. आई, बहीण, भाऊ, आत या सर्वांचा एकत्र संसार चालवणे आणि तो प्रेमाने, अभिमानाने आणि मानमान्यतेने निभावणे ही एक गोष्टही, म्हाताऱ्या आईबापाची देखील अडचण वाटण्याच्या आजच्या काळात, आजच्या जगात लताचे मोठेपण सिद्ध करावयास पुरी आहे.

पद्धतशीर अभ्यासाची सधी नाही, पाहायचे आणि शिकायचे असेच जीवन गेल्यामुळे तिच्या जीवनविषयक विचाराची आणि आचाराची काही प्रसगी सगती लावणे अवघड वाटते. घोड्याना गाडीला जोडतात, बैलाना बळजबरीने राबवतात, मुक्या जनावराना छळतात, याचा राग येण्याइतकी सहृदयता तिच्यात आहे, त्याबरोबरच, बरोबरीच्या मनुष्यप्राण्याला जिभेच्या चाबकाने प्रसगी अयोग्य ताडन करण्याचा कठोर फटकळपणाही तिच्यात आहे. स्वश्रमाने हजारो रुपयाच्या देणग्या मिळवून देण्याच्या उदारतेबरोबर हजार दोन हजारांसाठी जिकीर करण्याचा व्यवहारी कट्टरपणाही तिच्यात कधीतरी दिसेल. हळुवार सहानुभूतीबरोबर वेडा उपहासही तिच्यात प्रसंगी प्रतीत होतो स्वत शी स्वत चाच विरोध हा या जिनत लतेला येणारा बहर आहे. ल्हर हा कलावताचा स्वभाव आहे म्हणतात. त्या कारणात आहे हे काय नव्याने सागावे? काही प्रसगी कामाच्या दगदगीत अव्यवहार्यपणे तिजकडून दुखवले गेलेले काही सज्जन आहेतही. पण सज्जन ते सारे समजून घेऊन तिला क्षमा करतात तिच्या अमोल गुणाच्या गौरवार्थ ते झाले गेले विसरून जातात त्याचा डागोरा पिटीत नाहीत.

लताची आपल्या वडलांवर, भारतावर, शिवछत्रपतीवर, धर्मावर (तिला समजला तो) श्रद्धा आहे. कोणाला दुखावण्याची तिला गरज नाही आणि सवय नाही. कर्जाला ती फार घाबरते. फार विलक्षण नसले तरी चांगले संस्कार तिच्यावर झालेले आहेत. ती भावनाप्रधान आहे. पण म्हणून ती आग्रही, प्रसंगी दुराग्रही नाही असे मी कसा म्हणेन? क्रोध, मद, मत्सरही अगदीच उद्भवत नसावा असे मी कसे सांगू? चटकन अपसमज करून घेण्याचा क्वचित उतावळेपणा तिच्यात आहे. तसा चुकले असे पटले तर ते कबूल करण्याचा प्रांजळपणाही तिच्याजवळ आहे.

भालजी पेंढारकर

गाण्याखालोखाल लताचा वाखाणण्यासारखा आणखी एक गुण म्हणजे सृष्टिसौंदर्य बघण्याची, ते कॅमेऱ्याने टिपण्याची तिची आवड व त्यात दिसून येणारी तिची कलात्मक दृष्टी. तिने घेतलेली काही छायाचित्रे पहिल्या प्रतीच्या छायाचित्रकाराला, कदाचित शोभतील.

थोडक्यात म्हणजे भगवंतानी रूप खैरात करून ठेवली आहे तिला पुष्कळच देऊन!

आणि म्हणूनच, जगात नित्य असे काही नाही हे ध्यानात घेऊन ती आपल्या कलेचा, गुणांचा उपयोग आवडत्या देशासाठी, तोही बदलत्या मूल्यांचा विचार करून करील, तर खरी लता लोकांना दिसेल-आवडेल. रंगेल प्रसंगी गोड गळ्याने करमणूक करणारा मानवी ग्रामोफोन म्हणवून घेण्यापेक्षा प्रयत्नानी ती देवी सरस्वतीचा सुस्वर साक्षात्कार ठरेल. हे अवघड असेल, तरी लताला अशक्य नाही. आवश्यक ती श्रीची कृपा, बुद्धी, सखी आणि ज्ञानाशीर्वाद तिला लाभलेला आहे. म्हणूनच, अवतार-समाप्तीनंतर भूलोकी विसरून गेलेली भगवंताची बासरी ठरायचे की केवळ पार्श्वगायिका म्हणूनच जगा-मरावयाचे हे ठरवून त्याप्रमाणे ती आचरण करील अशी मला आशा आहे.

खरी लता दाखवण्यासाठी मी वाट पाहातो आहे ती वरील सर्व गुणांनी पूर्णालंकृत होण्याची. तिला स्वत:ला आहे यापेक्षा पुष्कळच हवे असेलही. पण सर्वच सर्वांना मिळत नाही. हवे ते कष्टाने मिळवावे लागते.

अपूर्णतेतच पूर्णत्वाच्या प्रयत्नाची जिद्द जन्मते!



शिवाजी गणेशन

# पारवरू

संध्याप्रकाश. ढगाच्या सतत पालटत्या आकाराच्या पार्श्वभूमीवर घरट्याकडे परतणारी पारवे. या दृश्याइतके अद्‌भुत, सुंदर आणि उत्तेजक दुसरे काहीही असेल्से मला वाटत नाही. ही पारवे मला मुक्तता, स्वतन्त्रता, शक्ती, कर्तृत्व आणि इतर अनेक स्पृहणीय गुणाची प्रतीके वाटतात.

लता मंगेशकर आणि तिचे कुटुंबीय हे मला सतत अशा पारवाचे स्मरण करून देतात. मीही असाच एक मुक्त पक्षी आहे. त्यामुळे माझा आणि या कुटुंबाचा घनिष्ठ स्नेह असावा हे स्वाभाविकच आहे. आम्ही सारीच पारवे आहोत आणि कलेचे एकच क्षितिज आक्रमण्याचा आम्हाला ध्यास आहे. पारवामध्ये भाऊबहिणी असतील की नाही? असतीलच. त्याना एकमेकाविषयी काय वाटत असेल बरे? प्रेम, जिव्हाळा, अभिमान. होय ना? मग तेच मला लताच्या घराबद्दल वाटते. तिलाही आमच्या कुटुंबाबद्दल तीच आत्मीयता आहे. या भावंडाच्या गुणाबद्दल आणि कर्तृत्वाबद्दल मला सतत विलक्षण कौतुक वाटत आले आहे.

'लता' या शब्दाचा संस्कृतमध्ये 'वेल' असा अर्थ आहे. आमची लता ही वेलीसारखी नाजूक आहे पारवासारखी कोमल, मृदू आहे. हे पारवरू एका क्षणी मुग्ध, असहाय, निरागस असे खाली वर अल्गद दिसावेल तर दुसऱ्याच क्षणी मुक्त, स्वतन्त्र, बडखोर वृत्तीने आभाळात उंच भरारी घेईल. मोठे लहरी, गोड आणि लोभस पाखरू आहे हे!

या मंगेशकर कुटुंबात आणि पारवात एक अनाकलनीय नाते आहेच. एकदा ही भावंडे आमच्याकडे पाहुणचारासाठी आली होती त्याच वेळी माझ्या एका मित्राने काही कोयाळ जिवत पकडून ते माझ्याकडे धाडून दिले होते. त्याच्या रुचकर मासावर मी ताव मारणार होतो. पण पिंजऱ्यात कोंडलेली ती गरीब, गोजिरवाणी, असहाय पारवे पाहिली मात्र, लताला आणि तिच्या बहिणींना असे रडू कोसळले आहे म्हणून सांगू! मी ती पारवे तात्काळ सोडून दिली. एवढेच नव्हे, तर तेव्हापासून कधीही मी कोयाळ म्हणून पुन्हा खाल्ले नाही.

आज भारतात, इतकेच नव्हे, तर भारताबाहेरच्या जगातही सर्वांत अधिक प्रमाणात जर कुणाचा

स्वर ऐकला जात असेल तर तो लताचा—या माझ्या आवडत्या बहिणीचा गेली कित्येक वर्षे हे असे चालले आहे आणि यापुढेही अनेक वर्षे ते असेच चालत राहील याविषयी मला तिळमात्र शंका वाटत नाही. लताचा स्वर हा शतकाशतकांतून एकदाच निर्माण होणारा स्वर आहे. तसा स्वर पुन्हा सिद्ध होणे अवघड—नव्हे, अशक्य आहे. मी ज्यावेळी इतर देशातून हिंडत असतो त्यावेळीही लता माझ्यापासून दूर आहे असे मला कधी वाटतच नाही. आपल्या स्वराच्या रूपाने ती माझ्या समीप सदा असतेच. मी नुसता रेडिओ सुरू करण्याचा अवकाश, हे लाडके पाखरू आपले अद्भुत स्वरजाल लगच माझ्याभोवती विणू लागते. सौंदर्याचे, माधुर्याचे आणि जीवनाच्या एका खोल समजूत जाणिवेचे विविध आकृतिबंध तयार होऊ लागतात ते बघताना माझे देहभान हरपून जाते

या अद्वितीय पाखराने यापुढेही सतत अशाच उंच उंच भराऱ्या घेत राहावे, कलेची याहूनही अधिकाधिक विस्तीर्ण क्षितिजे आक्रमीत राहावे एवढीच माझी इच्छा आहे.



## पंकज मलिक

# सुधाकंठिनी कल्याणीया

एकावन्न किंवा बावन्न सालची गोष्ट असेल. स्थळ : नागपूर.
प्रसंग : एक संगीत महोत्सव. या महोत्सवाच्या संचालकांनी
उत्सवात भाग घेण्यासाठी मला निमंत्रण केले होते. आणि
त्याला अनुसरून मी नागपूरला आलो होतो. याच कार्य
क्रमासाठी श्रीमती लताही तेथे उपस्थित होती. त्यावेळी देखील ती चित्रपटरसिकांच्या गळ्यातला
ताईत बनलेली होती. कारण 'महल' सारख्या चित्रपटातील 'आयेगा आनेवाला' वगैरे अत्यंत
गाजलेल्या तिच्या गीतांनी तेव्हाही जनतेला वेड लावलेले होते.

कार्यक्रमाच्या संचालकांनी माझी व लताची ओळख करून दिली. तिच्या त्या प्रथमदर्शनाने
मी किती चकित होऊन गेलो होतो याचे आजही मला चांगले स्मरण आहे. कल्पनेलाही ज्याचा
विचार करताना भोवळ येईल अशी गगनचुंबी कीर्ती आणि त्या कीर्तीची ही अधिष्ठात्री मात्र अगदी
एवढीशी, बाहुलीवजा. लाजाळूपणा आणि गोड्या त्या छोट्याशा मूर्तीत पुरेपूर भरलेला. हा
विरोध मला जेवढा विस्मयकारक तेवढाच आनंददायक वाटला. श्रीमती लताच्या वागण्याबोलण्यात
तिचा अभिजात साधेपणा, सौजन्य आणि सभ्यता याचे मोठे हृद्य असे दर्शन मला घडले आणि
त्यामुळे तिच्याबद्दल माझ्या हृदयात विलक्षण जिव्हाळा आणि आपुलकी दाटून आली. कितीतरी
वर्षांचा परिचय असावा अशी आत्मीयता तिच्यासंबंधी मला वाटू लागली. एवढी मोठी कीर्ती आणि
वैभव संपादन केलेले, पण त्याची ओझरतीही जाणीव लताच्या वर्तनात मला कोठे दिसली नाही.
या साधेपणाने मी मोहित होऊन गेलो तिच्या कलागुणाविषयी मला वाटणारी कौतुकाची भावना मी
जेव्हा तिला बोलून दाखवली त्यावेळी अत्यंत विनयाने व लीनपणे तिने त्या स्तुतीचा स्वीकार
केला. हे सारे किती अकृत्रिम होते. मनाच्या सरलतेचे आणि नम्रतेचे दर्शन घडवणारे होते
जी माणसे अकस्मात कीर्तिशिखरावर जाऊन पोहोचलेली असतात, प्रसिद्धी आणि लोकप्रियता
ज्यांच्याकडे झपाट्याने वेगाने आलेली असते, अशी माणसे 'स्वाभाविक' राहू शकत नाहीत
त्यांच्या वागण्याबोलण्यात कृत्रिम उपचार, दंभ, आत्मगौरवाची भावना, खोटाखोटा विनय याचा
मनाला अगदी उबग आणणारा प्रत्यय पावलोपावली येत असतो. त्यांच्या सगळ्यात जीव गुदमरू

लागता. पण अशा ढोंगीपणाचा, विनयाचे मिथ्या आवरण घेतलेल्या दांभिक गर्विष्ठपणाचा लताच्या व्यक्तित्वात लवलेशही नव्हता. तिच्या पहिल्या भेटीने एक अत्यंत अनुकूल असा ठसा माझ्या मनावर उमटला.

या कार्यक्रमात लताने जी गाणी गाइली त्यानेही मी असाच विस्मयचकित होऊन गेलो त्या दिवशी तिने आपल्याजवळच्या शास्त्रीय बैठकीवर आधारलेल्या गाण्याचे भांडारच जणू उघडले होते त्या क्षेत्रातले तिचे ज्ञान, तिचा आवाका आणि झेप यानी मी अक्षरशः मंत्रमुग्ध झालो होतो! हा वेळपावेतो लतावद्दलची माझी समजूत अशी होती की या मुलीला जादूचा गळा लाभलेला असून तरा काही विशिष्ट प्रकारच्या गीतावरच तिची हुकमत चालते, शास्त्रीय गाणे तिला बहुधा येत नसावे पण त्या दिवशी शास्त्रीय गायनातले तिचे कौशल्य आणि त्या क्षेत्रातला तिचा जबरदस्त अधिकार जेव्हा माझ्या प्रत्यक्ष अनुभवास आला त्यावेळी तिच्यावद्दलचा माझा हा पूर्वग्रह किती चुकीचा होता ते मला स्वत शी मान्य करावे लागले तिच्या तेजाळ आणि समृद्ध स्वराने त्या दिवशी स्वर्गीय गानमाधुर्याचे असे उन्मेष प्रकट केले की माझ्या अज्ञानाचे व गैरसमजाचे धुके त्यापुढे क्षणार्धात विरघळून गेले!

लताचा गळा अत्यंत गोड आहे, स्वराची समृद्धी आणि संपन्नता तिच्याजवळ फार मोठी आहे, हे तर खरेच. पण तिचा आवर्जून उल्लेख करण्यासारखा आणखी एक विशेष म्हणजे आवाज हवा तसा वळवण्याचे तिचे असामान्य कसब. या बाबतीत ती केवळ अनन्य आहे असे म्हणावयास काही प्रत्यवाय नाही. हे वैभव तिला निसर्गत च लाभले आहे. गाणाऱ्या पश्याइतक्याच सहजतेने लता गुणगुणते, किलबिलते, स्वरसप्तक उधळीत राहाते. विशेषत कंपयुक्त स्वराची फेक ती ज्या सफाईने करते, त्यासाठी गळ्यावर जो विलक्षण ताबा ती ठेवू शकते त्याला तोडच नाही!

गेली पचवीस वर्षे श्रीमती लता गात आहे. या दीर्घ अवधीत विजयाकडून आणखी मोठ्या विजयाकडे अशी तिची वाटचाल सतत होत राहिली आहे. आणि आज तर ती कीर्तीच्या नि वैभवाच्या ऐन शिखरावर उभी आहे अशा वेळी सारा देश तिचा गौरव करील, आणि लताच्या समतोल व्यक्तित्वाला, सदभिरुचीला नि अभिजात सुसंस्कृततेला साजेसे त्या गौरवाचे साधे सुंदर स्वरूप असेल याविषयी मला काडीमात्र शंका वाटत नाही. चित्रपटातली आणि ध्वनिमुद्रिकातली तिची अक्षरशः असंख्य गीते तिच्या मधमधी स्वराची, कलात्म सौंदर्यदृष्टीचा प्रत्यय आणून देणाऱ्या तिच्या सहज शैलीची आणि तिच्या सूक्ष्म भावसंपन्नतेची साक्ष पटवतात. अशा कौतुकास्पद कलागुणाचा अपूर्व मेळ तिच्याठायी झालेला असल्यामुळेच भारताच्या या टोकापासून त्या टोकापर्यंत, लहानापासून थोरापर्यंत साऱ्यांचीच ती एकमेव लाडकी कलाकार होऊन बसली आहे. यत्किंचितही अतिशयोक्ती न करता मी अगदी निश्चयपूर्वक असे म्हणू शकतो की श्रीमती लता हिने चित्रपटातील गीतांचा दर्जा, प्रतिष्ठा आणि कलात्मक ऐश्वर्य कितीतरी प्रमाणात वाढवले आहे, इतकेच नव्हे तर आपल्या अगदी वेगळ्या आणि खास स्वत च्या अशा शैलीचे नि तनाचे सौंदर्य पार्श्वगायनाला देऊन कधीही न कोमेजणारा, अक्षयी टवटवीत असा बहर त्या कलेला प्राप्त करून दिला आहे!

तिच्या आणखी एका खास वैशिष्ट्याचा मी जर निर्देश केला नाही तर हे वर्णन अपुरेच राहणार आहे. लताचे हे वैशिष्ट्य म्हणजे तिचे अचूक निर्दोष शब्दोच्चार. या तिच्या गुणाचा मला आवर्जून उल्लेख करावासा वाटतो. कारण आपल्या अगत्या या वैशिष्ट्यामुळे आजच्या नामांकित पार्श्वगायकात तिने सर्वाधिक मानाचे स्थान मिळवले आहे. आपल्या स्वत च्या मातृभाषेखेरीज इतर भाषांतही लता ज्या सफाईने गाते, त्या भाषेतील स्वराचे विशिष्ट वळण राखणे, निर्दोष शब्दोच्चार करणे, विशिष्ट आघात आणि ठेहराव आवाजाला देणे आणि त्या त्या भाषेचे प्रांतिक वैशिष्ट्य अचूक व्यक्त करणे हे सर्व ती ज्या अधिकाराने सहज साधू शकते त्या बाबतीत तिची बरोबरी करणारे

फारच थोडे कलाकार चित्रपटसृष्टीत आज सापडतील! श्रीमती लताची या क्षेत्रातली सफाई पहावयाची असेल तर दक्षिण भारतीय भाषातली तिची गाणी एकदा ऐकावीत! तमीळ, तेलगू या भाषातल्या तिने गाइलेल्या गाण्याचे शब्दोच्चार असे साफ, अचूक आणि निर्दोष आहेत की अत्यंत चोखंदळ आणि दोषान्वेषी टीकाकाराच्या कसोटीलाही ती गाणी पूर्णतया उतरतील. त्यात खोट काढणे त्याला शक्य होणार नाही. ही गाणी कोण गाते आहे हे जर ऐकणारापासून लपवून ठेवले तर गायिका कोणत्या देशातली किंवा प्रांतातली आहे, तिची मातृभाषा कोणती आहे हे श्रोत्याला प्रयत्न करूनही सांगता येणार नाही!

सरतेशेवटी ईश्वराच्या चरणी एकच प्रार्थना करून हा छोटासा लेख संपवतो. संगीत ही देवभाषा आहे असे म्हटले जाते. ती देवभाषा आहे हे खरेच पण व्यथित अशा मानवी हृदयाचाही तो एक मोठा दिलासा आहे. श्रीमती लता हिच्या चित्रपटक्षेत्रातल्या कारकीर्दीच्या रौप्यमहोत्सवाच्या या मंगल प्रसंगी मी मनापासून असे इच्छितो की तिच्या कलेची ही ज्योत दैवी तेजाने अशीच सतत झळकत राहावी. तिचा प्रकाश भारतातल्याच नव्हे तर जगभर पसरलेल्या मानवापर्यंत पोचावा, आणि तिच्या कलेचा सुवर्णमहोत्सवही अशाच चढत्यावाढत्या वैभवाने नि रसिकांच्या कौतुकाने साजरा व्हावा!



पक्न मल्लिक

दयानंद बांदोडकर

# गोमंतक-कन्या

स्वरसम्राज्ञी म्हणून मान्यता पावलेली कु. लता मंगेशकर ही एक गोमंतकीय, आमच्या गोमंतकाचे कलातपस्वी कै. मा. दीनानाथ याची सुकन्या म्हणून मला प्रथम परिचित होती. तिच्या सुरेल गळ्यातून निघणाऱ्या स्वर्गीय स्वरलहरींनी लाखो संगीतप्रेमी मुग्ध झालेले मी पाहिले आहेत. कु. लताचे ध्वनिमुद्रित संगीत ऐकून आपल्या थोर पित्याची अतृप्त इच्छाच ती पूर्ण करीत आहे असे सार्थपणे म्हणावेसे वाटते. कै. दीनानाथ हे एक महान संगीतज्ञ होते. त्यांची संगीतसाधना फार उच्च श्रेणीची होती. निरनिराळ्या रागदारीच्या चिजा शोधण्यासाठी त्यांनी अतिशय परिश्रम घेतले. त्या चिजांवर आपल्या प्रतिभेने नवीन साज चढवून त्यांनी मराठी नाट्यसंगीत समृद्ध केले. त्यावर स्वतःचा असा वैशिष्ट्यपूर्ण ठसा उमटवला. एक नवा संप्रदाय निर्माण केला. एक नवी बैठक स्थापन केली. त्या बैठकीला साथ ठेवून, त्या संगीतसाधनेचा आधार घेऊन गानकोकिळा गणली जाणारी लता आज कीर्तीच्या अत्युच्च शिखरावर विराजमान झाली आहे. केवळ भारतातच नव्हे तर परदेशातही इतकी लोकप्रियता मिळवलेली दुसरी व्यक्ती सापडणार नाही.

कु. लताचा पहिला जाहीर कार्यक्रम मी ऐकला तो मुंबईत रंगभवनमध्ये. चीनच्या आक्रमणानंतर संरक्षणनिधीसाठी तो कार्यक्रम आयोजित करण्यात आला होता. पुण्याच्या मिलिटरी कॉलेजसाठी जो निधी जमवण्यात आला त्यावेळी लताच्या कार्यक्रमाचा मी मुख्य पाहुणा होतो. लतानंतर तिची धाकटी भगिनी श्री. आशा भोसलेही तेथे गाइली. त्यावेळी माझ्यावर प्रभाव पडला तो आशाचाच. आशा एका वेगळ्याच तडफेने गाते. तिच्या आवाजात भेदकता आहे. तिच्या गळ्यातून निघालेला स्वर श्रोत्यांच्या अंतःकरणात कुठेतरी खोलवर स्पर्श करून जातो. नाट्यसंगीतातला एक एक तुकडा अशा चपलतेने ती फेकते की ऐकणाराचे देहभान हरपावे! हीच ती मा. दीनानाथ यांची कन्या अशी जाणीव व्हावी.

लता आणि आशा यांचा लौकिक सर्वश्रुतच आहे. पण उषा, मीना, हृदयनाथ या त्यांच्या इतर भावंडांना देखील संगीतातली चांगली समज आहे. प्रत्येकाचे त्याचे त्याचे स्वतःचे म्हणून एक

खास वैशिष्ट्य आहे. कुणी बालगीतात तरबेज, तर कुणाचा समरगीत गाण्यात हातखंडा. पित्याची
पुण्याई आणि ईश्वराची देणगीच ती. सर्व कुटुंबियावर कसा वरदहस्त आहे.
या प्राथमिक ओळखीनंतर मंगेशकर भावंडाचे पणजीला आमच्याकडे वास्तव्य झाले
व जवळच्या घरगुती स्वरूपाच्या परिचयात त्याचे रूपांतर झाले. कुणाच्या तरी मायाळू कृपाछत्रा
खाली वाढण्याचा या मुलाचा ऐन उमेदीचा काळ पोरकेपणात गेला या गुणी कलावताना
कुणातरी वडीलधाऱ्या माणसाचा आधार असावा असे मला तीव्रतेने वाटले. कु. लताची आणि
तिच्या बंधुभगिनींची साधी राहणी माझ्या विशेष नजरेत भरली. परमेश्वरावरील त्याची दृढ श्रद्धा
पाहण्यात आली. सगळीजणे वडील माणसाशी यथायोग्य आदरभाव बाळगून वागणारी दिसली.
गोमतक या आपल्या पितृभूमीविषयी कु. लताच्या मनात पूज्यभाव आहे. तिच्या या उत्कट
भावनेचे दर्शन मला गोवा साहाय्यक समितीच्या वतीने षण्मुखानंद हॉल, माटुंगा येथे दि. १९ जून
१९६५ रोजी लताने जो भव्य कार्यक्रम सादर केला त्यावेळी झाले. जणू ते तिला आपल्या घरचेच
कार्य वाटले. केवळ माझा एक शब्द तिला पुरेसा वाटला आठपधरा दिवस केवढी तिची तयारी
चालली होती. त्या वेळचे आघाडीचे संगीतकार लक्ष्मीकांत प्यारेलाल याच्या दिग्दर्शनाखाली तिचा
कार्यक्रम सादर होणार होता. लक्ष्मीकांत प्यारेलालना तिच्यासाठी कधी खोळबून राहावे लागले नाही.
आपले नित्याचे गर्दीचे कार्यक्रम आटोपूनही ठरलेल्या वेळेपेक्षा पधरा मिनिटे अगोदर लता तालमींना
हजर राहत असे. सहसा जाहीर कार्यक्रम न स्वीकारण्याकडेच लताचा कल. कधी चुकून स्वीकारला
तरीही तो एका गीतापुरताच मर्यादित स्वरूपाचा. पण आमच्या कार्यक्रमाच्या वेळी तिने एकदर सहा
गीते सादर केली. आपले सर्व कसब, आपली सर्व तपश्चर्या तिने त्या दिवशी पणाला लावली.
मिलिटरी कॉलेजच्या मदतीसाठी झालेल्या कार्यक्रमाच्या वेळी आशा मला प्रभावित करून गेली होती.
पण षण्मुखानंद हॉलमध्ये मला कळले की लता ती लताच ! तिची सर दुसऱ्या कुणाला येणार नाही.
तिच्या स्वरातील कप, आर्तता, एक एक संवेदना जागृत करण्याचे तिचे सामर्थ्य ! मी तर खरोखरच
भारावून गलो. केवळ मीच नव्हे, षण्मुखानंदमध्ये उपस्थित असलेला प्रत्येकजण हेच म्हणत होता.
षण्मुखानंद हॉलला त्या दिवशी गधर्वनगरीचे स्वरूप प्राप्त झाले होते.
भारत सरकारने कु. लताविषयी दुजाभाव का दाखवावा समजत नाही. पद्मश्री, पद्मभूषण वगैरे
बहुमान ज्या कलावताना मिळाले त्याची नामावली पाहता आमच्या कु. लताची योग्यता काकणभर
जास्तच आहे. सरकारने आपली चूक सुधारून वेळीच लताचा यथोचित गौरव करावा
चित्रपटक्षेत्रात वावरत असूनही लताने आपल्या व्यक्तित्वाची जाणीवपूर्वक जोपासना केली
आहे. तिच्या स्वभावातील शालीनता समोरच्या व्यक्तीला प्रभावित करते. देशाविषयी, धर्माविषयी
जाज्वल्य अभिमान तिच्या रोमरोमात भिनला आहे. गोमतकाचे नाव निघताच लताचे सस्कारक्षम
मन वेडेपिसे होते. आध्यात्मिकतेकडे तिचा कल आहे. आपल्या पूज्य पिताजींचे एक भव्य स्मारक
उभारण्याचा लताचा मनोदय आहे मा. दीनानाथानी संगीतात नाविन्य आणले. अगदी शेवटच्या
क्षणा आपल्या कन्येच्या गळ्यात गधार असल्याची जाणीव त्याना झाली होती. मा दीनानाथाच्या
त्या ऋणातून मुक्त होण्यासाठी सगीताशी एकरूप झालेल्या लताने संगीताद्वारेच अपार्थिव स्वरूपाचे
त्याचे भव्य स्मारक उभारावे. भारतीय शास्त्रीय सगीताचा कोपरान कोपरा लताने हस्तगत करावा
आज चित्रपटातून पाश्चात्य सगीताचा उपयोग केला जातो. पण तो उथळ स्वरूपाचा, गल्लाभरू
असतो त्या ऐवजी अभिजात शुद्ध स्वरूपातील पाश्चात्य संगीत आणि भारतीय सगीत याचा मिलाफ
घडवून त्यातून एक नवचैतन्यदायी धून, नादब्रह्माशी तादात्म्य घडवणारा एखादा स्वर देता आला तर
लताने बघावे. ते सामर्थ्य लताजवळ आहे. प्रयत्न केला तर केवळ लतालाच ते शक्य होईल.

दयानंद बांदोडकर

नौशाद

# लता आणि मी

एकोणीसशे शेहेचाळीस साल. कारदार स्टुडिओतला एक नित्याचा कामाचा दिवस. म्यूझिक रूमला लागून असलेल्या छोट्या 'बूथ' मधून मी कोणाला तरी फोन करीत होतो. तेवढ्यात एक मुलगी माझ्याशेजारून पुढे गेली. ती स्वतःशीच काहीतरी गुणगुणत होती. तिच्या त्या गुणगुणण्याने माझे चित्त एकदम वेधून घेतले. तिच्या स्वरात होतेच तसे काही तरी. अतिशय मुलायमपणा आणि असामान्य लवचिकपणा हे त्या स्वराचे सहज जाणवलेले दोन विशेष. माझ्या एकदम मनात आले : योग्य संधी लाभली तर हा स्वर लक्षावधी लोकांची हृदये काबीज करू शकेल.

फोन करून झाल्यानंतर मी माझ्या खोलीत आलो आणि लगेच मी त्या मुलीची चौकशी करू लागलो. मी माझ्या सहकाऱ्यांना म्हणालो, "लाखात एक आहे या मुलीचा आवाज. त्यात विलक्षण गोडवा आणि गोलाई आहे." त्यावर ते काहीच बोलले नाहीत. त्यांनी 'त्यात काय मोठेसे' अशा काहीशा उपेक्षावृत्तीने खांदे उडवले. पण मी नामोहरम झालो नाही. उत्तेजित स्वरात मी पुढे म्हणालो, "मी या मुलीला माझं एक तरी गाणं म्हणायला लावणारच!" त्यावर मात्र त्यांचे डोळे आश्चर्याने विस्फारित झाले. त्यांच्या आश्चर्याचा अर्थ माझ्या ध्यानात आला. जोहराबाई, राजकुमारी, नूरजहाँ, सुरैय्या, शमशाद बेगम यांच्यासारख्या एकाचढ एक अशा नामांकित गझल गायिकांनी पार्श्वगायनाचे जे क्षेत्र गाजवले आहे तेथे या एका कुठल्या कोण, किरकोळ, पोरसवदा मराठी मुलीची काय डाळ शिजणार आहे असेच जणू त्यांना म्हणावयाचे होते!

पण माझ्या सहकाऱ्यांनी मला कितीही निरुत्साह करण्याचा प्रयत्न केला तरी मी माझ्या निर्धारापासून ढळणार नव्हतो. त्या मुलीच्या स्वरातला गोडवा, त्यातली तीव्र धार ही ज्याने एकदा ऐकली त्याला तिचा विसर पडणे केवळ अशक्यच होते. मला तो स्वर इतरानाही ऐकवावयाचा होता. तात्काळ, क्षणाचाही विलंब न लावता मी माझा दोस्त अन् सहकारी पुण्यवान याला त्या मुलीची चौकशी करून तिचा पत्ता काढून आणण्यास आग्रहपूर्वक बजावले. संधी मिळताच शक्य तेवढ्या त्वरित त्या मुलीचे गाणे पदरात पाडून घेण्याची खटपट करायची असे मी मनोमन ठरवून टाकले होते. आणि माझ्या

म्हणा स्त्रिया तिच्या म्हणा, सुदैवाने अशी संधीही लगेच चालून आली. 'चांदनी रात' या चित्र
पटासाठी एक गीत घ्यायचे होते. मी लगेच त्या मुलीच्या आवाजाची चाचणी घेण्यासाठी तिला
बोलावणे धाडले.

त्या दिवशी सकाळपासून पावसाच्या सरी येत होत्या. राहून राहून येत होत्या. मुंबईचा
पाऊस. तरीही बरोबर ठरलेल्या वेळी त्या मुलीने माझ्या खोलीत पाऊल टाकले. ती खूप भिजली
होती. आणि एक जुनी फाटकी छत्री तिने आपल्या हातात घट्ट धरली होती. मी तिचे स्वागत केले.
तिनेही हसून मला नमस्कार केला. मी तिला बसायला सांगितले. ती बसली. मग मी तिच्याकडे
प्रथमच नीट न्याहाळून पाहिले. तिचा बांधा कृश, सडसडीत होता. आपल्या लांब दाट केसांच्या
दोन वेण्या तिने पाठीवर सोडल्या होत्या. साधी सुती पांढरी साडी ती नेसली होती. आणि तिच्या
पायातल्या चपला पार झिजून गेल्या होत्या. तिच्या चेहऱ्यावर देवीचे वण होते. तरीही तो चेहरा
विलक्षण उत्कट वाटत होता. आणि बालकाच्या अव्याजतेने चमकणारे पाणीदार डोळे जणू दूरच्या
अज्ञात भविष्याचा वेध घेत होते. खोलीत येऊन बसल्यानंतर क्षणभर खाली मान घालून ती स्तब्ध
राहिली. मला वाटते आपल्या बावरलेल्या मनाला शांत करण्याचा ती प्रयत्न करीत असावी. मला
ती एखाद्या पैलू न पाडलेल्या हिऱ्यासारखी वाटली. होय. हिराच. आज ओबडधोबड वाटणारा,
पण पुढे केव्हा तरी साऱ्या जगाकडून कौतुकाची खंडणी वसूल करणारा—

आम्हा उभयतांत एक विचित्र शांतता पसरली होती. क्षणमात्र वाट पाहून मीच त्या शांततेचा
भंग केला. मी तिला म्हटले, "तुम्ही तर पार भिजून गेला आहात."

माझे शब्द ऐकून तिने चटकन् वर पाहिले. तिच्या मुद्रेवर संकोचयुक्त स्मित उमटले आणि ती
म्हणाली,

"मी ट्रॅममधून खाली उतरले आणि नौशादसाहेब, पावसाची खूप मोठी सर आली. मला परळ
टी. टी.पासून इथपर्यंत चालतच यावं लागलं. बरोबर छत्री होती. पण ती ही अशी." बोलता बोलता
तिने आपल्या जुन्या फाटक्या छत्रीकडे नजर टाकली आणि ती पुन्हा हसली.

मीही त्या जुन्यापुराण्या छत्रीकडे पाहिले. ती फारच केविलवाणी दिसत होती.

मग मी वेळ न घालवता मुख्य विषयाकडे वळलो. मी तिला विचारले, "तुमचं नाव ?"

"मी लता मंगेशकर."

"तुम्ही आतापर्यंत चित्रपटात एखादं गाणं स्वतंत्रपणे एकटीनं म्हटलं आहे ?"

"होय. एकदा म्हटलं आहे. 'बॉम्बे टॉकीज'च्या 'मजबूर' चित्रपटासाठी संगीत दिग्दर्शक
गुलाम हैदर यांनी मला एक गाणं एकटीला दिलं होतं."

"तुमचे वडील?—"

"माझे वडील म्हणजे श्री. दीनानाथ मंगेशकर. मराठी रंगभूमीवरचे प्रसिद्ध संगीत नट
होते ते."

बोलता बोलता तिचे डोळे अभिमानाने चमकले.

"तुमच्या सहज गुणगुणण्यावरूनही हे ध्यानात येत की तुम्हाला गाण्याची चांगली तालीम
मिळाली आहे." मी म्हणालो, "शास्त्रीय संगीताचं शिक्षण तुम्ही कोणाकडून घेतलं?"

"सुरुवातीला अर्थात् मी माझ्या वडलांकडेच शिकले." लता म्हणाली, "पण त्यानंतर गंडा बांधून
मी तालीम घेतली अमानत खाँ साहेबांकडून."

आता ती बरीच शांत झालेली दिसली. तिचा प्रारंभीचा संकोच, बुजरेपणा मावळून गेला आहे
हे पाहून मी तिला थोडेसे गाऊन दाखवण्याची विनंती केली. ती तिने तात्काळ मान्य केली.
खरोखरच या मुलीला गाण्याची दैवी देणगीच लाभलेली होती. या कलेची अद्भुत समज तिला

जन्मतःच प्राप्त झालेली होती. स्वराला योग्य तो आकार देण्याचे तिचे कसब असामान्य होते. आणि तिचे गाणे स्वच्छ, निर्मळ, सुरेल होते. मला आता एकच गोष्ट जाणून घ्यायची होती. नव्या गाण्याचे सूर तिला सहजपणे आत्मसात करता येतील की नाही?

चित्रपटातले जे गाणे तिला देण्याचा माझा विचार होता ते मी हार्मोनियमवर तिला वाजवून दाखवू लागलो. त्या गाण्याची अस्ताई तिने चटकन उचलली. अंतराही तिला अगदी सहज जमला. तिचे गाणे अगदी निर्दोष होते. बदकाच्या पिलांनी पाण्यात जितक्या स्वाभाविकपणे पोहावे तितक्या सराईतपणे तिचा स्वर त्या गाण्यात फिरत होता. या मुलीबद्दलच्या माझ्या सर्व अपेक्षा संपूर्णतः खऱ्या ठरल्या होत्या. लौकरच ते गाणे तिने आत्मसात केले.

गाण्याच्या ध्वनिमुद्रणाच्या दिवशी मात्र प्रारंभी ती थोडीशी संकोचलेली, बावरलेली दिसली. तिची ती अवस्था पाहून मी ध्वनिमुद्रणासाठी ती जेथे उभी होती त्या खोलीत गेले आणि तिला धीर देत म्हणालो,

"इथं जमलेल्या लोकांपैकी कोणालाही गाण्यातलं काही कळत नाही असे समज तू. या विषयात तू शहाणी आहेस आणि ते सारे एकजात खुळे आहेत हे पक्कं ध्यानात ठेव. गाण्याला तुझ्यावर ताबा गाजवू देऊ नकोस. तू गाण्यासाठी नाहीस. गाणं तुझ्यासाठी आहे. समजलीस?"

त्यावर लता हसली. 'समजले' अशा अर्थी तिने मान डोलावली. तिच्या लांबलचक वेण्याही जणू समजूत पटल्यासारख्या तिच्या पाठीवर हेलावल्या. मी समाधानपूर्वक तेथून बाहेर पडलो.

गाण्याचे पहिले ध्वनिमुद्रण ठीक झाले. आम्ही बाहेर येऊन ते ऐकले. ते लोकगीत लताने गाइले होते चांगले. पण तिचा आवाज अरुंद, पातळ वाटत होता. चित्रपटातल्या ज्या उपनायिकेच्या तोंडी ते गाणे घातले जाणार होते ती पुष्ट, भरदार देहाची स्त्री होती. तिच्या तोंडी हे गाणे विसंगत तर वाटणार नाही ना अशी शंका आमच्या मनात आली. ध्वनिमुद्रक ईशान घोष याच्याशी मी थोडी चर्चा केली आणि तेच गाणे पुन्हा एकदा घेतले. यावेळी लताच्या स्वराचा भरगच्चपणा आणि त्याची गोलाई पाहून सारे जण अगदी थक्क झाले. ईशान घोष आणि मी एकमेकांकडे बघून हसलो आणि आम्ही दोघांनीही समाधानपूर्वक मान डोलावली. आम्ही परस्परांचे मूक अभिनंदन करीत होतो.

कठिणच. पण त्याच्या चित्रपटासाठी लताने गाइलेले 'कौन सुने फरियाद हमारा' हे गाणे त्यांनी
ऐकले मात्र, ते अगदी तृप्त होऊन गेले. त्यांच्या अवघड परीक्षेत लता उत्तम रीतीने उतरली होती.
त्यानंतर नायिकेची सारी गाणी तिलाच मिळाली. आणि पार्श्वगायनाच्या क्षेत्रातले तिचे उज्ज्वल
भवितव्य निश्चित झाले.

त्या काळातली एक गोष्ट अजूनही माझ्या पक्की ध्यानात राहिली आहे. एकदा आजारामुळे
दोन दिवस मी स्टुडिओत आलो नव्हतो. माझी गैरहजिरी लताला तेवढी जाणवली. आणि माझे घर
शोधीत शोधीत ती यायला आली. मी कोठे राहतो याची तिला काहीच कल्पना नव्हती एक तासभर
ती घराघरातून माझे नाव विचारीत हिंडत होती. सरते शेवटी आमच्या घरी ती येऊन पोहोचली तेव्हा
ती खूप दमली, शिणली होती. पण तिचा तर्क अचूक ठरला होता मी आजारी असलो पाहिजे ही
तिची भीती खरी होती. ती सर्व सध्याकाळ लताने माझ्या बिछान्याशेजारी बसून काढली. आणि त्या
अवधीत नवी गाणी, नवे करार, चित्रपटाची कामे यासबधी अवाक्षरानेही तिने चौकशी केली नाही.
तो विषयच मुळी निघाला नाही. ती आली होती फक्त माझ्या प्रकृतीची चौकशी करण्यासाठी. "कसे
आहात तुम्ही, नौशादसाहेब?" एवढे विचारण्यासाठी. हा लताच्या स्वभावाचा आणखी एक मनोज्ञ
पैलू आहे. दुसऱ्याच्या दुःखाने ती सदाच कळवळते. ही गाढ सहानुभूती हे संवेदनाशील कलावंताचे
एक अस्सल लक्षण आहे. आणि ते लताच्या ठिकाणी फार मोठ्या प्रमाणात आढळून येते

यानंतर मेहबूब यांनी आपले 'अंदाज' चित्र सुरू केले. त्यावेळी चित्रपटातली नायिका
नर्गिस हिच्या गाण्यासाठी कोणाचा आवाज घ्यावा असा जेव्हा प्रश्न निघाला तेव्हा मी मेहबूबना
लताचे नाव सुचविले. त्यावर ते लगेच मला म्हणाले, "भाई, या बाबतीत तर तुम्हालाच जास्त
कळते तुम्हाला योग्य वाटेल तो निर्णय तुम्ही घ्या. मला तो प्रमाण आहे."

आणि मग एका सुरेल सकाळी लताने मेहबूब स्टुडिओत 'तोड दिया दिल मेरा' हे 'अंदाज'
मधले नंतर खूप गाजलेले गाणे गाइले. या गाण्याचे ध्वनिमुद्रण चालू असताना स्टुडिओत एक
गोरागोमटा, तरतरीत तरुण उपस्थित होता. तो मन लावून ते गाणे ऐकत होता. आणि त्याच्या
मुद्रेवर विलक्षण तन्मयतेचा, हर्षाचा भाव उमटला होता हा तरुण म्हणजे चित्रपटसृष्टीतला
एक बुद्धिमान आणि प्रतिभाशाली कलावंत राज कपूर होय. लताचे गाणे ऐकताना 'बरसात'
चित्रपटाची कल्पना त्याच्या मनात भिरभिरत होती. पुढचा इतिहास सर्वश्रुतच आहे.

या साऱ्याचा अर्थ असा मात्र नव्हे की एका रात्रीत लता ही वैभवाच्या आणि सुखसोयींच्या
सृष्टीत प्रविष्ट झाली! छे छे. तसे मुळीच नाही एकीकडे चित्रपटाच्या सृष्टीतली अवघड वाट
आक्रमीत असता दुसरीकडे तिच्यापुढे अनेक कठिण समस्या होत्या. कौटुंबिक अडचणी होत्या.
वैयक्तिक प्रश्न होते. तिचे वडील निधन पावले होते आणि वाढत्या कुटुंबाची कठिण जबाबदारी
लताच्या कृश, अशक्त, कोवळ्या खांद्यावर पडली होती त्या वयात ते सारे पेलणे तिला फार
अवघड जात होते. त्यावेळी दैनंदिन जीवनात ती अनेकदा माझा सल्ला विचारीत असे. कधी कधी
ती आपले मन माझ्याजवळ मोकळे करी. त्यावेळी मीही प्रारंभीचे माझे कठिण दिवस तिला सांगून
तिच्या जिवाला धीर देत असे. रेल्वेचे तिकीट घेण्यापुरतेही पैसे जवळ नसल्यामुळे दररोज कुलाब्या
वरून दादरपर्यंत मी पायी कसा येत होतो, हे तिला सांगत असे. मग मी तिला म्हणे,

"लता, कष्ट, पुन्हा कष्ट आणि अविरत कष्ट हेच अंतिम यशाचे एकमेव साधन आहे हे
ध्यानात ठेव. त्याचप्रमाणे ईश्वरावर दृढ श्रद्धा आणि आपल्या कलेशी अव्यभिचारी निष्ठा याखेरीज
कोणीही कलावंत श्रेष्ठ पदवीला पोहोचू शकत नाही हेही लक्षात असू दे!"

त्या काळात लताने दररोज देवपूजा करण्याची सवय स्वतःला लावून घेतली आणि आजपर्यंत
तिची ती सवय टिकून राहिली आहे. या श्रद्धेला तिने विलक्षण शिस्तीची आणि कठोर आत्मसंयमाची

नौशाद

जोड देऊन गाण्याचा रोजचा रियाजही सुरू केला. कलेच्या क्षेत्रामध्ये जास्तीत जास्त प्रगती करून घ्यावी हे एकमेव ध्येय तिने आपल्या डोळ्यापुढे ठेवले होते. व त्याची पूर्वतयारी करण्यास तिने प्रारंभ केला होता.

लता ही अत्यंत हळवी आणि संवेदनाशील अशी कलावंत आहे. मी तर म्हणेन की ती वाजवीपेक्षा अधिक हळवी आहे. त्यामुळे चित्रपटातील वेगवेगळ्या भूमिकांसाठी गाताना त्या त्या भूमिकांच्या भावभावनांशी, सुखदुःखांशी ती चटकन समरस होते. त्यांच्या वेदना, व्यथा तिच्या हृदयाला जाऊन भिडतात. कधी कधी या सान्याचा फारच तीव्र परिणाम तिच्यावर होतो. कित्येकदा एखाद्या दुःखी गाण्यामागची भूमिका दिग्दर्शक लताला समजावून सांगत असताना तिचे डोळे भरून येताना आणि तिच्या गालावरून आसवे ओघळताना मी पाहिले आहे.

तिच्या या अतिरिक्त हळवेपणामुळे कधी कधी मोठे चमत्कारिक प्रसंग उद्‌भवतात. 'अमर' चित्रपटासाठी तिचे एक गाणे मी बसवून घेत होतो. त्या गाण्यातली एक विशिष्ट जागा मला हवी होती तशी तिच्या गळ्यातून येईना. त्या दिवशी तिचे काहीतरी बिनसले होते. काही घरगुती घटनेमुळे तिचे मन त्रस्त झाले होते. मग मीही फारसा आग्रह धरला नाही, आणि गाण्यातल्या त्या विशिष्ट 'मुरकी' बद्दल फारशी चिंता करण्याचे कारण नाही असे लतालाही मी सांगून टाकले. त्यावेळी आम्ही 'हिज मास्टर्स व्हॉइस' कंपनीच्या 'रेकॉर्डिंग रूम' मध्ये होतो आणि कंपनीचे माइक गायकर ध्वनिमुद्रण करीत होते. गाणे ध्वनिमुद्रित झाल्यावर आम्ही सर्वजण ते ऐकू लागलो. मी माझ्या नेहमीच्या सवयीनुसार डोळे मिटून लक्षपूर्वक गाणे ऐकत होतो. लता माझ्याशेजारी बसली होती. गाणे चालू असता ती विशिष्ट अवघड जागा येऊन गेली आणि एकदम माझ्या शेजारी धाडकन काहीतरी पडल्याचा आवाज कानी आला. मी चमकून डोळे उघडले. बघतो तो लता मूर्च्छित होऊन खाली जमिनीवर पडली होती! सगळीकडे एकच गोंधळ उडाला. मी घाईघाईने पाणी मागवले आणि ते तिच्या तोंडावर शिंपडले. जरा वेळाने ती शुद्धीवर आली. मी तिला विचारले,

"लता, काय झाले?"

इतकीच साधी, सरळमनस्क राहिली आहे. तिचा हा साधेपणा तिच्या वेषभूषेपासून तो केशरचने पर्यंत सर्वत्र दिसतो. दार केस असूनही लता निश्चित वा चित्रविचित्र केशरचना करताना कधी दिसत नाही पूर्वीप्रमाणेच आजही तिच्या दोन लांबलचक वेण्या पाठीवर सोडलेल्या असतात. ती साधी लिपस्टिकसुद्धा लावीत नाही. मग मेक अप करणे दूरच. मीरेची भजने तिला फार आवडतात. पांढरा रंग तिला अत्यंत प्रिय आहे. आणि औदार्य हा तिचा सर्वांत मोठा गुण आहे.

लताच्या या औदार्याचा लाभ अनेकांना झाला आहे. किती तरी वादकांना, संगीत दिग्दर्शकांना लताने आपण होऊन मनापासून साह्य केले आहे. अडचणीत सापडलेल्या निर्मात्यांना मदत करण्याच्या आपल्या जुन्या खोडीमुळे तर आजही ती स्वतः अनेकदा अडचणीत येते. अनेक राष्ट्रीय आणि सामाजिक कार्यासाठी तिने सढळ हाताने साह्य केले आहे.

आणि लताच्या बाबतीत याहून काही वेगळे घडणेही संभवत नाही तिचे व्यक्तिमत्त्वच मुळी असामान्य घटकांनी बनलेले आहे लताची आपल्या वडलांचे ठायी अढळ भक्ती आहे. आणि दर वर्षी उचित कार्यक्रमाची जोड देऊन ती त्यांची पुण्यतिथी साजरी करते. बडे गुलाम अली खां, नजाकतअली व सलामतअली हे तिचे आवडते शास्त्रीय गायक आहेत तिची स्मरणशक्ती अजब आहे वीस वीस वर्षांपूर्वी गायिलेली गाणी त्यातल्या बारीकसारीक तपशिलासकट आणि साथीच्या सुरावटीसकट आजही म्हणून दाखवून ती मला चकित करते. असामान्य परिश्रमशीलतेच्या जोरावर आपल्या गाण्यात तिने विलक्षण सहजता, सफाई आणि कलात्मक परिपूर्णता आणली आहे या सर्व गोष्टींमुळेच या क्षेत्रातले अद्वितीय स्थान तिने मिळवले आहे. ईश्वराने तिला सोनेरी स्वर दिला आहे तसेच उमदे दिलदार हृदय आणि साधा स्वभावही त्याने तिला बहाल केला आहे. मला वाटते, लताच्या अपूर्व यशाचे हेच रहस्य आहे.

प्रत्येक पिढी आपले स्वतःचे असे काही खास कलावंत निवडीत असते आणि त्या त्या पिढीचे लोक आपल्या असंख्य हृदयाच्या गाभाऱ्यात त्या कलावंताच्या मूर्तीची प्रतिष्ठापना करतात सैगल हा असा जनमनाच्या सिंहासनावर अधिष्ठित झालेला कलाकार होता. लता ही देखील लोकहृदयावर सत्ता गाजविणारी अशीच एक अभिषिक्त सम्राज्ञी आहे भारतीय चित्रसृष्टीने निर्माण केलेली ती सर्वाधिक यशस्वी आणि केवळ अद्वितीय अशी पार्श्वगायिका आहे. तिच्यानंतर अनेक पार्श्वगायिका होतील. त्यातल्या काही कदाचित तिच्याहून अधिक प्रसिद्धी मिळवतील पण दुसरी लता मंगेशकर मात्र पुन्हा निर्माण होणार नाही

तो जगन्नियंता लतावर आपल्या कृपेचा अविरत वर्षाव करो आणि त्याचे प्रेमळ आशीर्वाद तिला सदैव लाभोत. तथास्तु

नौशाद

आशा भोसले

# आमचे छोटे बाबा

नेहमीच उघडे असणारे आठवणींचे डोळे मी आज पुन्हा उघडीत आहे. जे मी मनातल्या खास पेटाऱ्यात जपून ठेवलेले आहे ते आज सर्वांसाठी खुले करत आहे.

माझ्या आठवणींचे डोळे मी जेव्हा उघडते तेव्हा त्या डोळ्यांना माझे बाबा, माई, लता, (होय. तेव्हा मी दिदीला लताच म्हणत असे) मीना, उषा, बाळ दिसतात. त्याप्रमाणेच एक लांबच लांब गॅलरी असलेले घर, त्या घरासमोर खूप जोरात भांडणाऱ्या बायका, एक हिरवे तळे, असे खूप खूप गमती दिसतात. आणि मग नजर पुन्हा माझ्या दिदीकडे वळते. एका सकाळी मी डोळे उघडले. तंबोऱ्याच्या चार तारा छेडल्या जात होत्या. मी किलकिले डोळे करून बघितले. कारण थंडी मी म्हणत होती. आम्ही पाच भावंडे एकमेकांना चिकटून नेहमीच झोपत असू आणि दादागिरी करून लताली नेहमी आम्हाला मध्ये घालून स्वतः मात्र कोपऱ्यातली जागा घेई. कारण ती स्वतःला फार स्वच्छ समजते. आम्ही मात्र सगळी घाणेरडी. आणि घर इतक्या थंडीत झोप सुद्धा देत नाही. बसली तंबोरा वाजवत. मी आणखी जरा डोळे उघडले. तंबोऱ्याचा एक मोठा भोपळा आणि त्याच्यासमोर ही, 'मिया मूठभर दाढी हातभर' बसली होती. तंबोरा वाजवताना बसतात तशी ती जय बजरंगबली थाटात बसली होती. निमगोरा रंग, गोबरे गोबरे गाल, जाड भिवया, छोटी कपाळपट्टी, जाड भिवयाखाली खूप चमकदार डोळे, आणि सगळ्यात जर सुंदर काय असेल तर ती नाजुक, पातळ, अरुंद, लालगुलाबी ओठांची जोडी. ती इतकी अरुंद जिवणी की जास्त जोरात 'आ' केला तर दोन्ही कडा फाटून रक्त तर नाही ना येणार असे वाटावे. मला लांब जिवणी आवडत नसल्यामुळे त्या सुरेख ओठांचा मी नेहमीच हेवा केला आहे. निमुळती हनू, खूपच बारीक अंगकाठी, आणि केस खूप जाड व लांब—लांब म्हणजे किती? ती बसली होती तर तिच्या दोन्ही बाजूला वेण्यांची दोन वेटोळी पडली होती. मला अजून आठवते, तिला न्हायला घालायचे असले म्हणजे आमची माई व ती, दोघी रडायच्या. केसात फणी घातली की हिची ओय ओय सुरू. तर काय सांगत होते? हं. ती तंबोऱ्याजवळ बसली होती आणि तंबोऱ्याच्या तारा लावण्यासाठी हात वर करून खुंटी पिळण्याचे प्रयत्न करीत होती. त्यावेळी ती मला खूप मोठी

चक्री मोपऱ्याजवळ एक छोटीशी नाजुक खारोटी बसावी तशीच दिसली. आणि मी परत डोक्या वरून दुलई घेऊन झोपले. 45150

पुन्हा धूसर धूसर असे काहीतरी आठवते. असे की सोलापूरला आमच्या कंपनीचा मुक्काम आहे. तिथे ही कधी खेळताना तर कधी मारामारी करताना दिसत आहे. कागदाची विमाने करण्यात तर ती प्रवीण होती. तिची विमाने खूप उंच जायची. आम्ही तिच्याकडे सारखे जाऊन 'हे दे ना करून', 'ते दे ना करून' असे सारखे तिला सतवायचे. मग सोलापूरची एक रात्र आठवते. त्या रात्री ऑडियन्समध्ये मी माईच्या मांडीवर डोकं ठेवून झोपायच्या तयारीत आहे. आमचे बाबा गाऊन थकले आहेत. कारण दोन तास ते सारखे गात आहेत. लोक वाहवा करात आहेत. बाबांना पण विश्राती पाहिजेच आहे. नाही का ? मी मात्र कंटाळून गेले आहे. तितक्यात मी समोर बघते अरे, ही तर लताटली. ही काय गाणार वाटते ? मी सरळ होऊन बघू लागले. फ्रॉक विटाचा, दोन प्रसिद्ध वेण्या, आणि सरळ येऊन बसली की मांडी घालून स्टेजवर ! जरामुद्धा भीती नाही की काही नाही. आणि 'लरा माई सजनी' हा जयजयवंतीचा ख्याल सुरु केला. आता आहे की नाही ? तुम्हाला माहीत नाही. ही अशीच नासदायक आहे. आम्हाला सारखी म्हणते कशी, सकाळी उठा लौकर आणि सा रे ग म प ध नि सा शुद्ध सुरात लावा. म्हणजे एक तर लौकर उठा अन दुसरे, गात रहा मग खेळणार कोण ? मोठी आली आहे सांगायला ! पण सगळ्या भावंडात थोरली आहे ना शिष्ट कुठली ! तेवढ्यात किती जोरात टाळ्या पडल्या. सगळे लोक म्हणत होते, बाप सवाई लेगी होणार बरे का

परत काही आठवत नाही. आणि मग ही बघा लता आणि मीना दोघीजणी हळूहळू रसोईघरात चालल्या आहेत कारण माई झोपली आहे ना ! दोघीजणी चारकुड्या. अरे, डब्यावर डबे ठेवून काय काढताहेत या ? शी, त्या तर तिखट, मीठ आणि कच्चे तेल काढून कालवून खाताहेत. ही याची खाण्याची आवड ! चांगले जावे, इतके मोठे पातेलेभर दूध पडले आहे, त्याच्यावर साय किती घट्ट जमली आहे. ती पसा भरून खावी. तर—पण बरे झाले. नाहीतर मला कांहीच ठेवणार नाहीत या. आणि वर मी साय खाते म्हणून मला चोरटी मांजर म्हणतात. म्हणजे तिखट चोरले तर ती चोरा नाही वाटते ! काय न्याय तरी.

पुढे मग काहीतरी उलथापालथ झाली व आम्ही सगळे पुणे मुक्कामी आलो. त्यावेळी 'रागची' मधल्या गाण्याची स्पर्धा होती. आमच्या मावशीचे पतिराज श्री. गोडबोले दादा यांनी बाबाची परवानगी न घेताच दिदीचे नाव त्या स्पर्धेत दाखल कले. मग काय विचारता ! बाबा असे रागावले की ज्याचे नाव ते. ते दिदीला म्हणाले, "आता माझे नाव तू घालवणार. जा. या स्पर्धेत पहिली होऊन ये. नाहीतर पुन्हा घरी येऊच नकोस." ते एकसारखे असे बोलत होते. त्यावेळी दिदी कितीतरी रडली होती, आता काय होणार म्हणून. पण म्हणतात ना, पुताचे पाय पाळण्यात दिसतात ! त्यानतर एकदम आठवते ती कार्यक्रमाहून परत येणारी दिदी. तिच्याबरोबर बाबा आणि मी गाडीत होतो. बरोबर आणखी कोण होते ते नाही आठवत. दिदी साडीत होती की तिने फ्रॉक घातला होता तेही नाही आठवत. आठवतात फक्त तिच्या छातीवर लावलेले बिल्लेच बिल्ले आणि तिचे खूप चमकणारे डोळे. ते डोळेच सांगत होते की मी पहिलीच येणार. आताच नव्हे, या स्पर्धेपुरतीच नव्हे, तर हमेशा. आयुष्यभर !

आणि यानतर आठवतो एक अगदी वेगळा प्रसंग. त्या दिवशी आमची माई गावाला गेली होती. आणि दिदी घरात पुरणाचे जेवण करणार होती. गणपती जवळ आले होते. आई घरात नव्ह्यावर जो उधम चालतो तोच आमच्या घरी चालला होता तेवढ्यात काय झाले, एक छोटासा उदीर कुठून आला होता कुणास ठाऊक, तो रसोईत सारखा नाचत होता. दिदीला कसला राग आला होता कोण जाणे. ती जी उठली तो तिने हातातले लाटणे घातले उदरावर. पण हाय रे !

आशा भोसले

गेले की ते पिंजुकले ! आणि मग काय विचारता. पुरणाचे जेवणबिवण राहिले सगळे एकीकडेच. गणपती आले असताना गणपतीचे वाहनच मारले मी म्हणून दिदी रडत बसली कित्ती दिवस.

नंतर ते अशुभ वर्ष आले. सगळीकडे अंधार झाला. कुठलाही आसरा नव्हता. आम्ही अगदी निराधार झालो. छे. चुकले मी. आमचे बाबा वारले होते. पण दुसरे बाबा फक्त बारा वर्षांचे, परकरपोलक्यातील आम्हाला सांभाळायला सज्ज झाले होते. दिदीने सगळा भार आपल्या एवढ्याशा खांद्यावर उचलला होता. आम्ही कोल्हापूरला गेलो. दिदी विनायकाच्या कंपनीत काम करू लागली. काम करताकरता माईच्या मागे तिचा सारखा लकडा चालू असे. "माई, मुलांना शाळेत घाल. त्यांची वयं गेली नाहीत अजून. मी त्यांना खूप शिकवणार आहे. माझ्या भावड्याला मी डॉक्टर करणार आहे. इंग्लंडला पाठवणार आहे." त्यावेळी ती कशी कामे करी याची एक आठवण सांगते. 'गजाभाऊ' चित्रपटातल्या एका गाण्याचे शूटिंग होते. आणि दिदीच्या अंगात एकशे चार ताप होता. माई तिला म्हणाली, "लता, आज तू कामाला जाऊ नकोस." पण दिदी म्हणाली, "नाही, गेलेच पाहिजे." तिला आपल्यावरच्या जबाबदारीची कल्पना होती. तशा अवस्थेत ती कामाला गेली आणि भर तापात ते गाणे तिने केले. गाणे देखील विलक्षण होते. दिदीच्या अंगात पराचे कपडे घातले होते. आणि परांना दोऱ्या बांधून त्यांना टांगून ठेवले होते. तशा अवघडलेल्या स्थितीत तिने शूटिंग केले. अशी ही कामसू मुंगी.

पण दिदी भांडकुदळ मुद्दा तितकीच बरे का. एका साध्या सेफ्टीपिनसाठी माझ्याशी इतकी भांडायची की शेवटी तिची माझी मारामारी ही ठरलेलीच. ती नंबर एकची हट्टी. आणि मी म्हणजे पहिलवान, पठाण यांच नावांनी ओळखली जाणारी. मग काय! मारामारी ही ठरलीच. कधी कधी दुपारच्या वेळी आम्ही बहिणी खेळ खेळायच्या. भातुकलीचा खेळ. त्या खेळासाठी डाळीचे लाडू, चुरमुऱ्याचा भात अशी रसोई आम्ही तयारी करून ठेवायच्या, आणि अशा वेळी दिदी एक नवाच खेळ सुचवायची. ती म्हणायची, "मी जसा काही चोर. तुम्ही घरात सगळे झोपलेले असणार. मग मी हळूच येऊन चोरी करणार. मग मला तुम्ही पकडणार!" झाले आम्हाला कल्पना पसंत पडायची. दिदी आमच्या घरकुलात येऊन चोरी करून जायची. आणि आम्ही तिला पकडीपर्यंत भातुकलीतल्या खान्या जेवणाचा तिने फन्नामन्ना केलेला असायचा. तेव्हा कुठे तिचा डाव आमच्या ध्यानात यायचा. की मग पुन्हा भांडण सुरू. कधी कधी दिदी मीनाताईला नि मला बाहेर गॅलरीत न्यायची "मी भूत आहे. हाऽहाऽहाऽ! आता मी जे सांगेन तेच तुम्हाला केले पाहिजे. नाहीतर मी तुम्हाला खाऊन टाकीन. आऽऊऽऽ!" आम्ही मिळून तिची सारी कामे करायच्या घरात माईने जेवायला बोलावले की आम्ही डोळे पुसत, भीतभीत पानावर येऊन बसावे. एकदा वाटे, दिदी कशी भीती दाखवते ते माईला सांगून टाकावे. पण ही आमच्याकडे टक्कावून बघत असायची डोळे मोठे करून नाही नाही अशा अर्थाची मान हलवायची परत आम्ही 'आप' करून डोळे पुसत बसायचे. अशी ही नाठाळ दिदी.

माझी मते आणि तिची मते यात दोन टोकांचे अंतर आहे. मी बॉब करते तर ती दोन वेण्या घालते. मी रुंद गळ्याचे ब्लाऊज घालते तर ती बंद गळ्याचे. ती सारखीच पांढऱ्या रंगाचा पोषाख करते तर मला गुलाबी रंग प्रिय. माझ्या तिच्या राहणीत, विचारात पार फरक आहे. एवढेच काय, मी एकदम फटकळ तर ती सगळे मनात ठेवणारी. ती शरीराने सडपातळ, तर मी चांगली भरदार. ती नाजूक मंद गाणी गाते तर मी सगळ्या दणक्याची गाणी गात असते. ती म्हणते, मी कलेसाठी जगते तर मी म्हणते, कला माझ्यासाठी आहे. सगळे म्हणतात, या दोघीजणी दोन डोळ्यांसारख्या आहेत. दोन डोळे शेजारी, भेट नाही संसारी. पण त्यांना हे माहीत नाही की दोन डोळ्यांना प्रकाशाची जाणीव देणाऱ्या नसा एकच आहेत आणि जर एका डोळ्यात काही गेले तर दुसऱ्यात पाणी येते!

ललिता पवार

# सदाफुली

माझी आणि लताबाईंची मैत्री फार जुनी आहे. ज्या काही व्यक्तींबद्दल मला नितांत प्रेम, आदर आणि भक्ती वाटते त्यात लताबाई प्रमुख आहेत. आम्हा दोघींच्याही कार्यबाहुल्यामुळे मनात इच्छा असूनही प्रत्यक्ष सहवास मात्र क्वचित घडतो. तरीही मनाने मी त्यांच्या सन्निध असते. आणि या मानसिक जवळिकीवर शेवटी समाधान मानून घ्यावे लागते. गुलाबाच्या फुलासारखे सुंदर, बाळसेदार, टवटवीत बालक पाहिले की त्याला हृदयाशी कवटाळून धरावेसे वाटते. पण शेवटी त्याच्या गोड गालाला ओझरता स्पर्श करून त्यातच समाधान मानून घ्यावे लागते. तसेच काहीसे आहे हे!

लताबाईंचा जो थोडासा सहवास लाभला आहे त्यातल्या स्मृती मी सतत जतन करून ठेवल्या आहेत.

एकेचाळीस बेचाळीस साली मुंबई येथे सुप्रसिद्ध लेखक कै. राम गणेश गडकरी यांच्या पुण्यतिथीनिमित्त एक समारंभ झाला होता. त्या समारंभात लताबाई गायल्या होत्या. माझ्या समजुतीप्रमाणे ते त्यांचे प्रथमच झालेले प्रकट गायन असावे. त्यावेळी त्यांना पहिले पारितोषिक जाहीर करण्याचे भाग्य मला लाभले होते आणि मी त्यांना कर्णफुले अर्पण केली होती. आपल्या गानमाधुर्याने अगणित लोकांचे कर्ण तृप्त करणाऱ्या कलावतीला कर्णफुले वाहण्याची मला जी स्फूर्ती झाली तीत एक औचित्य सहजगत्या साधले गेले असे मला वाटते. ईश्वरी कृपेनेच ती इच्छा मला झाली असावी. लताबाईंनी त्यानंतरच्या काळात असंख्य पारितोषिके पटकावली असतील. पण एका कलाकार मैत्रिणीने आपलेपणाने अर्पण केलेल्या पहिल्या पारितोषिकाचा त्यांनी आनंदाने व कौतुकाने केलेला तो स्वीकार मी कधीही विसरणार नाही. तो क्षण माझ्या अभिमानाचा एक अमूल्य ठेवा आहे.

आणखी एक संस्मरणीय प्रसंग मी मनात असाच सतत जपून ठेवला आहे. 'अमरपुत्र' नावाचा एक चित्रपट मी मागे काढला होता. त्या चित्रपटासाठी आम्ही लताबाईंची गाणी घतली होती. त्या गाण्याचा त्यांना यथेष्ट मोबदला द्यावा म्हणून मी लताबाईंकडे गेले. पण लताबाईंनी

त्यावेळी काय केले असेल? त्यांनी मोजदल्याच्या रकमेला स्पर्शही केला नाही. त्या हसून इतकेच म्हणाल्या,

"वाह, ते असू द्या आता मग गरज पडेल तेव्हा मी हे मागून घेईन!"

त्यांचे ते उदात्त बोल ऐकून मग गहिवरून आले आणि मी नकळत मनोमय हात जोडून देवाला निःशब्द प्रार्थना केली, "देवा, माझ्या या दिलदार मैत्रिणीची सुरसरिता अशीच अखंड दुडुम वाहो गरजेचा रखरखीत कोरडेपणा तिला कधीही न भावो!"

लताबाईंकडे पाहिले म्हणजे दोन गोष्टी प्रामुख्याने मनावर चित्रतात ठसतात पहिली गोष्ट म्हणजे त्यांचे ते अत्यंत पाणीदार पण नितांत शांत, गंभीर डोळे! जगाकडे पाहणाऱ्या साक्षी सारखे निर्विकार प्रसंगपरत्वे त्या नेत्रतलावर भावतरंग उमटत असले तरी त्यांचा मूळचा स्थायीभाव 'शांत' हाच आहे लताबाईंच्या व्यक्तित्वातली मनाला जाणवणारी दुसरी गोष्ट म्हणजे त्यांचा अभिजात साधेपणा इतके अफाट वैभव, दिगंत कीर्ती आणि अपूर्व लोकप्रियता लाभूनही लताबाईंचा सुसंस्कृत साधेपणा तसाच निर्मळ राहिला आहे कितीही पाणी ओतले तरी कमलपत्र कोरडेच राहते त्याप्रमाणे आधुनिक नगरात वावरत असूनही फॅशनच्या, शृंगारसाजाच्या व भपक्याच्या मोहापासून त्या नेहमीच अलिप्त राहिल्या आहेत हा त्यांचा सहज दैवी गुण दुर्मिळ आहे

लताबाईंना सरकारी पदवी न मिळाल्यामुळे त्यांच्या असंख्य चाहत्यांना हळहळ वाटते पण माझ्या मते, यातच लताबाईंचे असामान्यत्व नाही काय? जिथे प्रत्यक्ष जनता जनार्दनाने त्यांना भक्तिभावाने मस्तकी धारण केले आहे, त्या अजोड सन्मानापुढे सरकारी पदवीच्या व्यावहारिक मोठेपणाचे काय मोल?

आमची ही गायनाची सदाफुली ईश्वराने सदैव प्रफुल्लित ठेवावी आणि त्या फुलाचा गोड परिमळ आम्हाला अनंत काळ मिळावा



ग. दि. माडगूळकर

# अंकुराची लवलव

लता मंगेशकर हे नाव आता केवळ गोमंतकाच्या, महाराष्ट्राच्या वा भारताच्या मालकीचे राहिलेले नाही सान्या जगातल्या संगीतशौकिनांना या नावाविषयी आदर उत्पन्न झाला आहे आपुलकी निर्माण झाली आहे संगीत ही विश्वभाषा आहे साहित्याला देखील भाषांतरावाचून देशादेशांच्या सीमा उल्लंघता येत नाहीत लताच्या स्वरांना कुठेच अटकाव नाही वायुलहरी जाऊ शकतात तेथे तेथे लताचा स्वर पोचला आहे तिच्या सादाला एक बाणासारखे टोक आहे आणि ते टोक नेहमी जणू मधाने माखलेले असते कित्येक अंत करणांना या बाणाच्या मधुर जखमा झाल्या असतील त्या जखमी रसिकांचे देश, भाषा आणि स्वभाव लतेला माहीत असण्याचा मुळीच संभव नाही

आपल्या चित्रपटीय जीवनाचा रजतमहोत्सव साजरा होत आहे याची जाण लतेला मुळीच नसेल. ती गात राहिली आहे कोकिळा कशाला गणती करील, किती वसंत आले आणि किती गेले

लता आता खूप मोठी झाली आहे तिच्या कीर्तिविस्ताराने सान्या अवकाशाचा मांडव व्यापून टाकला आहे पाहणाऱ्यांचे डोळे आश्चर्याने थक्क व्हावेत असे अलौकिक वैभव तिने मिळवले आहे मिळवते आहे तिच्या जीवनाच्या शताब्दीअखेर ती तसेच मिळवीत राहील त्यानंतरही लतेचे स्वरवैभव दरवळत राहील

माझे भाग्य असे की मी या लतेची लवलव तिच्या अंकुरावस्थेत पाहिली आहे तिच्या स्वरांचा अभावित गोडवा नकळत माझ्या कानी पडला आहे तिच्यासाठी गीत लिहिण्याची संधी मला फार पूर्वी मिळाली आहे सुमारे दोन तपापूर्वी

तो काळ मला अजून जसाच्या तसा आठवतो आहे बहुधा एकोणीससो बेचाळीस त्रेचाळीस साल असावे मोठ्या प्रयासाने मला मा विनायकांच्या 'प्रफुल्ल'मध्ये नोकरी मिळाली होती त्या नोकरीला नाव नव्हते दिग्दर्शकाचा सहकारी, प्रकाशन विभागातील कर्मचारी, तत्कालीन कथा लेखकाचा लेखनिक अशा अनेक भूमिका माझ्याकडे येत होत्या मी त्या वठवीत होतो. त्याच वेळी

किंवा थोडं आधी, लता 'प्रफुल्ल' मध्ये आली असावी 'मास्टर दीनानाथाची मुलगी' हे तिचे ओळखपत्र होते तेवढीच तिची संपत्ती होती

दीनानाथाचा उत्कर्षकाळ मी पाहिलेला नव्हता भारदस्त आवाजातली त्यांची गायकी मला ज्ञात होती ती ग्रामोफोनच्या तबकड्यामुळे तसे मी त्याना पाहिले होते पण ते त्यांच्या उतरत्या काळातच उत्तीस साली किर्लोस्करवाडीच्या समाजमंदिरात दीनानाथाची नाटके झाली तेव्हा मी कुंडलच्या हायस्कूलात शिकत होतो 'ब्रह्मकुमारी' नावाच्या गौतमाच्या वेषात तेव्हा त्याना मी पाहिले होते दाढी आणि मिशा नसलेला गौतमऋषी, खरे सागायचे तर, मला आवडलेला न हता गाणे समजण्याची पात्रता तेव्हा माझ्यात नव्हती नाही म्हणायला दीनानाथ या नटाचे व्यक्तिमत्त्व मात्र माझ्या मनावर एक जबरदस्त ठसा उमटवून गेले होते तो माणूस सुंदर होता पुरुषी सौंदर्याचा जणू आदर्श होता

त्या दीनानाथाची ही मुलगी मात्र किडकिडीत, सावळी, खुरटलेली फक्त डोळे तेवढे तेजाळ अप्पा जाधवाना की कुणाला, मी म्हणालो देखील, "अरे, ही आपल्या घराच्या आश्रयलेल्या सानलीसारखी दिसते " लता दिसायला क्षीण आणि किडकिडीत होती पण त्या वयातही तिला समज विलक्षण होता वाचनाचेही वेड तिने लावून घेतलेले होते 'प्रफुल्ल' संस्थेत साहित्याविषयी चर्चा करणारा एक छोटासा कंपू होता अप्पा जाधव त्याचा म्होरक्या आणखी पाचदहा माणसे होती बघता बघता लता या कंपूत सामील झाली मी आणि दिनकर पाटील त्यावेळी 'घडपड्या मुला'त जमा होतो चित्रपटकथाकार म्हणून फडके अत्रे खांडेकराचे ध्वज फिरवत होते त्याच्या कथा म्हणजे विनायकरावाना 'ब्रह्मलिखिता'सारख्या वाटायच्या विनायकराव मोठे होते त्याच्या श्रद्धा पुष्कळदा आधळ्या असत

आम्ही जग मुळीच पचवितले नव्हते पण पाहण्याची पात्रता आल्याचा भ्रम आम्हाला झाला होता मोठ्या लेखकाच्या कथातील छोटे दोष काढून त्यावर टीका टिप्पणी करीत बसणे हा एक आमचा उद्योग होता लताही मोठ्या हौसेने आमच्या त्या मंडळात सामील व्हायची. विनायकरावाच्या कुटुंबियापैकीच एक अशी त्यावेळी लताची अवस्था होती तिच्यातला गुण विनायकरावानी हेरला होता एका अर्थाने अनाथ झालेल्या त्या चिमुरडीला विनायकरावानीं आसरा दिला होता, एवढेच नव्हे तर तिच्या साऱ्या ससाराचा भारच त्या भावुक कलाकाराने आपल्या खाद्यावर घेतला हाता

लतेचे कुटुंब केवढे आहे हे कळायला मला फारसा अवधी लागला नाही योगायोगाने ती माझ्या शेजारीच राहायला आली कोल्हापूर येथील मगळवार पेठेत खिरगाळे तलावाच्या काठावर मावूराव पेंढाऱ्याची बंगली होती त्या बंगलीला लागूनच परशुराम मिस्त्रींनी टाटीवाटीच्या जागेत आपले स्वत चे घरकुल उभे केले होते परशुराम मिस्त्रींच्या मुली त्यावेळी लहान लहान होत्या त्या चित्र पटातून भूमिका करीत त्यातल्याच एका वयी मिनु नावाच्या मुलीच्या ओळखीने मी त्या घरकुलात राहायला आलो होतो पूर्वी माझ्याकडे एकच एक खोली होती आता इमारतीतल्या दोन खोल्या माझ्याकडे आल्या होत्या मी नुकताच 'पिवळा' झालो होतो पत्नी आलेली होती

आम्ही बैठकघर म्हणून वापरीत होतो, त्या खोलीच्या पश्चिमेकडे एक मोठी मोकळी जागा होती या दोन्ही जागावर तीन खोल्याची एक माडी होती त्या जागेतच मगेशकर कुटुंब राहायला आले लता माझी शेजारीण झाली

एव्हाना 'प्रफुल्ल'ने 'गजाभाऊ' नावाचा चित्रपट हाती घेतला होता लतेला त्या चित्रपटात भूमिका मिळाली होती अशीच भूमिका एका आईवेगळ्या अनाथ मुलीची मीही त्या चित्रपटात काम करणार होतो गल्पुरुषाचे त्याची माझी चागलीच ओळख झाली होती हळूहळू तिची लहान थोरली भावंडे माझ्या परिचयाची झाली हसा घालून फिरवणारी आशा, अधुकल्या डोळ्याची

मीना, आजारी दिसणारी उषा आणि पायाने अधू असलेला हृदयनाथ. लतेच्या मातुःश्रींचा न् माझा कधी नमस्कार चमत्कार झाला असेल इतकेच. त्या दुःखी होत्या. त्या फारशा बोलत नसत. शेजाऱ्यापाजाऱ्यांतही मिसळत नसत.

माझ्या बैठकीच्या खोलीतून लतेचे घर दिसे. या घरातला कर्ता पुरुष निघून गेला आहे हे पाहताक्षणी जाणवावे असेच त्या घराचे रूप असे. एक मात्र नवल होते. वरवर पाहणाऱ्याला ते दृश्य अतिरंजित वाटण्याचाही संभव होता.

लतेच्या बिन्हाडातील मधल्या खोलीत एक मोठा चौरंग भिंतीला लागून ठेवलेला होता. त्यावर कै. *दीनानाथांची तसबीर आणि त्या तसबिरीपुढे त्यांचे जोडे,* पादुका. *कोवळ्या वयातली लता त्या* पादुकांची पूजा करी आणि हाती तंबोरा घेऊन त्यांच्यापुढे बसे. गाण्याचा रियाज करी. वडिलांचे आवडते गीत पुन्हापुन्हा आळवून म्हणे, 'माली चंद्र असे धरिला.' मा. दीनानाथ तिचे वडील होते. तसेच गुरूही होते. त्या गुरूदेवतेच्या पादुका याच जणू तिला आता मार्गदर्शिका होत्या. वडिलांच्या पादुकांसमोर बसून लतेने आळविलेली मुरावट ऐकतांना खरोखरीच आम्हा करंट्यांना कधी कळले नाही की ही भाववेडी गायिका पुढच्या काळात साऱ्या भारताला आपल्या गाण्याने वेड लावणार आहे.

मधूनमधून लता माझ्या बिन्हाडी येई. एखाद्या धोरल्या बहिणीने वागावे इतक्या मोकळेपणाने ती माझ्याशी वागे. गाणे तिला देवानेच आपल्या सहस्र हातांनी दिलेले होते. भाषणातील चातुर्य आणि वागण्यातली हुषारी त्या पोरीने कुठून आत्मसात केली होती देव जाणे.

'गजाभाऊ'च्या चित्रणाच्या वेळची गोष्ट. चित्रपटाची गोष्ट चं. वि. बावडेकर आणि भा. वि. वरेरकर/नाडकर्णी या दोघा साहित्यिकांनी सिद्ध केली होती. तिच्या पटकथालेखनासाठी संस्थेने सुविख्यात नाटककार स. अ. शुक्ल यांना पाचारण केलेले होते. माझी नोकरी शुक्लांकडे रुजू करविण्यात आली होती. शुक्ल संवाद सांगत आणि मी ते लिहून घेई. हे काम हल्लीच्या शालिनी स्टूडिओतील चित्रणगृहाच्या माडीवरील एका खोलीत चाले.

एका सकाळी मी आणि शुक्ल बोलत बोलत जिन्याकडून खोलीत आलो. खोली नेहमी-सारखी उघडून ठेवलेली होती. शुक्लांसाठी बसायची गादीतक्क्याची बैठक तयार होती. माझे बैठे डेस्क समोर मांडलेले होते. त्या खोलीच्या भिंती अगदी ओबडधोबड होत्या. त्यांवर चित्रांच्या फ्रेम्स वगैरे टांगण्याची काही सोय नव्हती. खोलीत एकही चित्र नव्हते. आज मात्र भिंतीवर एक छोटे चित्र लटकवलेले दिसले. बाजारात विकत मिळणारे ते एक रंगीत कार्ड होते.

एका वृक्षाखाली बसून भगवान वेदव्यास, 'जय' नावाचा इतिहास सांगत आहेत आणि महाकाय अन् चतुर्भुज श्रीगणेश तो लिहून घेत आहे. माझ्या स्थूलपणाची चेष्टा तर त्या चित्राला अभिप्रेत होतीच पण 'चित्रकथालेखन ते काय आणि त्याचे हे केवढे अवडंबर' असा सूरही त्याला काढायचा होता. आम्ही ते चित्र पाहिले. शुक्लही मनमोकळेपणाने हसले.

ही उठाठेव केली कुणी, याची चौकशी करता करता शेवटी पत्ता लागला की, हा चहाटळपणा 'लते'चा.

या चेष्टेतून 'तक्रार' मुळीच उत्पन्न झाली नाही. लतेच्या चतुरपणाचे कौतुकच झाले. इतक्या लहान वयात तिच्या ठायी असली प्रगल्भ विनोदबुद्धी होती.

'गजाभाऊ' आणि 'चिमुकला संसार' या दोन्ही चित्रपटात लताने गाइलेली गाणी होती. ती वाजली पण *निनादली नाहीत. गंगेचे दर्शन झाल्याखेरीज गंगोत्रीची धार ओळखतो कोण ? लता* या नव्या गायिकेला संधी मिळाली हे मात्र खरे. मला तीही मिळाली नाही. या दोन्ही चित्रपटांत एखादे गीत तरी आपल्याला लिहायला मिळावे अशी माझी इच्छा होती. पण ते झाले नाही. जमले नाही.

चव्वेचाळीस साली बंगालमध्ये मोठा दुष्काळ पडला. आणि मा. विनायक यांनी बंगाल फंडाच्या मदतीसाठी कार्यक्रम करायचे ठरविले. वसंतराव जोगळेकर आणि दत्ता डावजेकर कार्यक्रमाची जमवा जमव करू लागले मा. विनायकरावांनी मला सांगितले, "बंगालच्या दुष्काळावर गाणे लिहा" आणि मी लिहिले. विष्णुपंत जोगांनी चालीचा एक मुखडा दिला "देख बंगाल न जा"

मी रचना केली. कविता थोडेच रचनाच अधिक—

"ऐका ऐका ही घोर विलापिका
देश बंगाल भुका"

हे गाणे डावजेकरांनी बसवले. जोगळेकरांनी त्याला अभिनय नृत्य इत्यादी कलाप्रकाराची जोड दिली दुष्काळ फंडासाठी माझे शब्द आणि लतेचे स्वर एकत्र आले बेळगाव आणि मुंबई येथील नाट्यमहोत्सवात या गाण्याचे कार्यक्रम झाले. कार्यक्रमाच्या शेवटी लता, रेणुका वगैरे 'प्रफुल्ल'मधल्या मुली प्रेक्षकात जात आणि फुले विकून पैसे गोळा करीत. ते पैसे बंगाल फंडाकडे दिले जात

पुढे 'प्रफुल्ल' मुंबईला गेली. लतानेही आमचा शेजार सोडला. 'प्रफुल्ल'ने घेतलेल्या जागेत (नाना शंकरशेठ मंदिर) पुढे अनेक वर्षे लता राहत होती.

निव्वदवरी लेनमध्ये 'प्रफुल्ल' कंपनीचे बिऱ्हाड असताना मी परत एकदा 'प्रफुल्ल'मध्ये आलो होतो. लता, दिनकर, अप्पा, मी यांच्या गाठी पुन्हा पडल्या. पण जुना मजा पुन्हा आला नाही. आता प्रत्येकजण प्रवाहात पडला होता. धावेला लागला होता

एकोणीसशे सत्तेचाळीस साली देश स्वतंत्र झाला आणि मा विनायक हे जगच सोडून गेले. सारा जमाव विस्कटला लता मुंबईत स्थायिक झाली तिच्या अंगच्या गुणांनी यशाची एक एक पायरी ती भराभर चढू लागली. सारी हिंदी चित्रसृष्टी तिच्या मुखाने गाऊ लागली. तमिळसारख्या परप्रांतिक व्यवसायालाही तिने आत्मसात करून टाकले. एका लतामुळे साऱ्या मंगेशकर कुटुंबाचे भाग्य उजळले निराधार असलेले ते कुटुंब अनेकांना आधार देण्यासाठी समर्थ झाले. शक्तिशाली झाले. साऱ्या देशात विख्यात झाले. चित्रपटाव्यतिरिक्तही पुष्कळ गाणी लता गायली कै. भा. रा. तांबे यांच्या कविता तिने आपल्या गानमोहिनीने आणखी उज्ज्वल केल्या पी सावळाराम या माझ्या मित्राच्या रचनाही लतेच्या आवाजामुळे लोकप्रियतेचा फड जिंकून गेल्या.

माझी गीते आणि लताचा नाद यांची गाठ मात्र नंतरच्या काळात फार कमी वेळा पडली. हे असे का झाले याला कारण काही नाही दोघांची भ्रमणकक्षा वेगळी होती. लताने उमाप कीर्ती कमावली. धनदौलत मिळवली तिने वाळकेश्वरला जागा घेतली. पेडर रोडला फ्लॅट घेतला.

तिच्या घरी जाण्याचा योग मला पुन्हा कधी आला नाही तिचे गाणे आणि कीर्ती मी तृप्त मनाने ऐकत राहिलो तिचा स्वर कानी आला की मला ते मैत्रीचे घर आठवते. त्या पादुका आठवतात. ते शीर आठवते, 'माली नद्र असे धरिला'.

एवढे ते सहज उच्चारून गेले. अधिकच पुणे आकाशवाणीसाठी मी आणि सुधीर फडके 'गीतरामायण' सादर करीत होतो मी सीतात्यागानंतरचे, सीतेने लक्ष्मणाला उद्देशून गायलेले गीत लिहिले—

मज सांग लक्ष्मणा जाऊ कुठे ?
वनि निरणे निरत मी पाहु कुठे ?

"कविमहाराज—" फडके म्हणाले.

"जी!" मी बोललो.

"या गाण्याची गायिका कोण पाहिजे?"

"आपण सांगा." त्यावेळी आम्ही एकमेकांना असे अतिसन्मानाने बोलत असू.

"दिदी लता पाहिजे लता." फडक्यांना जणू तिचा स्वर दिसत होता. लक्ष्मणाच्या रथातून खाली उतरून निश्चयी पण आर्त स्वराने त्याला थोपवणारी सीता त्यांच्या डोळ्यांसमोर साकारली होती,

"कठिण है." मी म्हणालो.

"का?" फडक्यांनी विचारले

"तिचा आपला योग नाही. पेशव्यांच्या दरबारात पताच्या कवितेला मज्जाव होता तसा दिदीच्या साम्राज्यात माडगूळकरांच्या गीतांना—"

"कोण म्हणत?"

"म्हणत कुणीच नाही. आतापर्यंतचा इतिहास "

फडके झटक्याने उठले. लताबाईंकडे गेले. कसलेही आढेवेढे न घेता लताबाई आल्या. त्यांनी ते गीत गायले. गीतरामायणाच्या मंदिरावर सोनेरी कळस चढला

आकाशवाणी, जाहीर कार्यक्रम या गोष्टींत भाग घेण्याइतका वेळ आज लतेकडे नाही तरी देखील ती आली. का? कशासाठी आली? फडक्यांच्या आग्रहामुळे? माझा जुना परिचय ध्यानी घेऊन? नाही मग? माझे निदान कदाचित चुकीचेही असेल पण मला निश्चितपणे वाटते की, सीतेसारख्या अलौकिक स्त्रीच्या जीवनातील कारुण्याचा तिला मोह पडला असावा लतेच्या स्वरात अलौकिक गोडवा आहे कुठल्याही रसाचे गाणे तिने गायले तरी ती त्या रसाचा पूर्ण परिपोष साधल्यावाचून राहत नाही तिने गायलेले प्रत्येक गाणे श्रवणीय होते कुणाही लतेतरच्या सान्या कळ्यांची फुले होत नाहीत या लतेच्या कंठातला प्रत्येक स्वर श्रोत्यांना कानाच्या ओंजळी करून झेलावासा वाटतो. तिचा स्वर म्हणजे चमत्कार आहे कारुण्याची भावना गाताना तर हा चमत्कार 'परतत्त्वा' पर्यंत झेपावल्यासारखा वाटतो आर्ततेचा आविष्कार करणारी गीते लतानेच म्हणावीत तिच्या स्वराला कारुण्याची बारिक वेसाएवढी किनार आहे कारुण्यरसात तिची स्वरकौमुदी पूर्णिमेला पोचते—चांदण्यात गूढ सावल्या मदपणे आंदोळू लागतात

लतेच्या अत्यंत यशस्वी आयुष्यात कुठेतरी कारुण्याची छटा आहे ती शोधल्यान सापडणार नाही सान्या मानवी आयुष्यालाच तो शाप आहे सान्या मनुष्यमात्रानाच ते वरदान आहे अलौकिकातले लौकिक तेच आहे लौकिकात 'अलौकिक' तेच आहे

माझी लतेची गाठ फार क्वचित् पडते पण मला ऐकून ठाऊक आहे की ती 'ज्ञानेश्वरी' वाचते, तिची पारायणे करते अध्यात्मविषयाचा तिला छंद लागला आहे आता नाही यश सुरू झाले तेव्हापासूनच

मला वाटते, नदीचा प्रवाह योग्य दिशेने चालला आहे

ऐहिक यश तिने खूप कमावले थोड्या वयात कमावले वयाच्या मर्यादा सामान्यांना असतात ज्ञानेश्वराच्या, बालकवींच्या महाराष्ट्रातच लता लहान वयात मोठी झाली आहे

भारत सरकारने तिला यापूर्वीच स मानपदक द्यायला हवे होते लतेला पदकाची आवश्यकता नाही. सरकारला स्वतःचे कर्तव्य उमगायला हवे होते ते उमगेल तेव्हा उमगो आत्तस्वकीय, चाहते सनोगाने म्हणतात "लतेला चित्रपटव्यवसायात येऊन पचवीस वर्षे झाली "

लता चित्रपटव्यवसायात कधीच नव्हती तिचे साम्राज्य वेगळे आहे त्या साम्राज्याची ती राणी आहे. पचवीस वर्षे त्या साम्राज्याशी संबंध आला हे चित्रपटसृष्टीचे भाग्य लताचे साम्राज्य चिरंतन आहे



ग दि माडगूळकर

अगदी अलिकडे केव्हातरी लतेची आणि माझी गाठ पडली. मी म्हणाले,

"लताबाई—" आणि थांबलो.

"का?" जीभ गालात खेळवीत, नेहमीच्या लकबीने लताने विचारले.

"तुला 'लताबाई' म्हणणे मानवत नाही"

"म्हणताच कशाला? तुम्ही नुसतच 'लता' म्हणायच."

"दिदी दिदी" करीत लताचा शब्द झेलणारे शेकडो निर्माते आज लतेच्या दाराशी रांगा लावून उभे आहेत. माझ्यासारख्या तिच्या जुन्या परिचिताना मात्र ती अजून 'लता'च राहिली आहे. तिला ज्ञानेश्वरीची पारायणे करावीशी वाटतात. या वाटण्यामागे आणखी काही मोठे भवितव्य उभे असेल. त्याचा प्रकाश आणखी देदीप्यमान असेल. लतेच्या स्वरातील मूल्यवान कारुण्य त्या प्रकाशाकडेच ओढ घेत असेल. कुणी सांगावे, कसे सांगावे. तुकारामाने 'मुक्ती' मागितली नव्हती. मिरेने तरी ती मागितली असेल कशावरून? आपण माणसे 'आहे' त्याच्या पलिकडचे काही देखील जाणू शकत नाही

परवा बातमी आली होती की लताबाईंना अन्नातून विषबाधा झाली. त्या अत्यवस्थ आहेत. सोम्यवधी मनात चर्रर झाले. तो विषप्याला तिच्या पचनी पडला नी प्रसंग टळला. तिचा स्वर जसा बुलंद तशीच तिची शरीरप्रकृतीही सुदृढ राहावी. वयाच्या वडीलकीने मी एवढेच म्हणेन,

"शतायुषी हो. यशस्वी हो आणि चिरजीव हो!"



## सुलोचना

# माझी छोटी मैत्रीण

एकोणीसशे नेचाळीस साली सडकलाट या कोल्हापूर जवळच्या एका ल्हानशा खेड्यातून मी कोल्हापूरला आले आणि मास्टर विनायक याच्या 'प्रफुल्ल' कपनीत दाखल झाले खेड्यातून प्रथमच मुंबईला येणाऱ्या माणसाची जी अवस्था होते ती कोल्हापूरला आल्यावर माझी झाली त्यातून मी तर सिनेमा कपनीत आले होते म्हणजे सगळे जगच तिथे अगदी निराळे होते

सकाळी अकरा वाजल्यापासून तो संध्याकाळी सहा वाजेपर्यंत मला स्टूडिओत राहाव लाग. पहिल्या दिवशी मी स्टूडिओत गेल आणि सगळेजण माझ्याकडे अशा दृष्टीने पाहू लागले की ही खेडवळ मुलगी कुठली आली! त्याचे सवाचे ते तसे पाहणे बघून मी तर अगदी बावरून नि गागरून गले पण तिथ दहा अकरा वर्षांची परकरपोलक घातलेली आणि खूप लाबसडक वस असलेली एक चुणचुणीत मुलगी होती तीच फक्त माझ्याकडे बघून प्रेमाने हसली कदाचित माझी ती अवस्था बघून तिला माझ्याबद्दल सहानुभूति वाटली असेल. काहीशा बावरलेल्या मन स्थितीतच मी घरी परतले आणि परत सिनेमा कपनीत जाणार नाही म्हणून रडायला सुरुवात केली परतु घरच्या लोकानी माझी कशीबशी समजूत घातली, आणि दुसऱ्या दिवसापासून घाबरलेल्या मनानेच मी पूर्ववत कपनीत जाऊ लागले

रोज जात असे मी पण माझ्याशी कुणी बोलत नसे मी होऊन कुणाशी बोलायला गेले तर सगळे मला हसायचे कारण मला मराठी चागले बोलता येत नसे त्यावेळी 'प्रफुल्ल' कपनीमध्ये दोन तीन मोठ्या अभिनेत्री होत्या त्या माझ्याशी बोलायच्या तर नाहीतच पण माझ्याकडे नुसत्या बघा यच्या सुद्धा नाहीत. अशा त्या वातावरणात थोडासा मला आधार जर कुणाचा असेल तर तो त्या लहानग्या मुलीचाच. मला कपनीतले रीतिरिवाज काहीच माहीत नव्हते त्यामुळे एक दिवस माझ्यावर अपमानित होण्याचा प्रसंग आला त्या वेळीही मला दिलासा दिला तो या छोट्या मैत्रिणीनच त्याचे असं झाले त्या दिवशी त्या मुलीला मी कपनीत सगळीकडे शोधीत होते परतु ती मला कुठेच दिसेना म्हणून मी तिला शोधीत शोधीत एका अभिनेत्रीच्या खोलीत गेले. आणि त्या मुलीची वाट

बसत तिथेच बसून राहिले. तेवढ्यात ती अभिनेत्री तिथे आली. मला तिथे बसलेली पाहून तिच्या कपाळावर आठ्यांचे जाळे पसरले. आणि ती आली तशीच बाहेर निघून गेली. काय झाले त्याची मला काहीच कल्पना नव्हती. थोड्याच वेळात मला कंपनीच्या मॅनेजरकडून बोलावणे आले. मी त्यांना भेटायला गेले तेव्हा काहीसा रागातच ते मला म्हणाले, "तुम्ही ज्या खोलीत बसला होता ती खोली त्या अभिनेत्रीची आहे. यापुढे तिथ तुम्ही बसत जाऊ नका."

मॅनेजराचे शब्द ऐकून मला खूपच वाईट वाटले. आणि मी दुसरीकडे जाऊन रडत बसले. एवढ्यात ती माझी छोटी मैत्रीण मला शोधीत तिथे आली आणि मोठ्या आस्थेने तिने माझी विचारपूस केली. तिची ती आपुलकी पाहून तर मला जास्तच रडायला येऊ लागले. माझे रडे ओसरल्यावर झालेला सर्व प्रकार मी तिला सांगितला. माझ्या मैत्रिणीला ते ऐकून खूप राग आला आणि ओढीतच मला तिने त्या अभिनेत्रीच्या खोलीत नेले. मी तिला सारखी सांगत होते, "मला नेऊ नकोस. त्या बाई रागावतील" पण तिने ते मुळीच ऐकले नाही. ती मला म्हणाली, "मी आहे तुझ्या बरोबर. तू घाबरू नकोस. तू तिथे चल तर ती अभिनेत्री काय करते तेच मला बघायचे आहे." असे बोलून तिने मला धीर दिला. आणि तिच्याबरोबर मी खोलीत आलेली पाहून त्या अभिनेत्रीलाही काही बोलता येईना. त्या दिवसापासून त्या माझ्या मैत्रिणीबरोबर मीही त्याच खोलीत बसू लागले.

त्यानंतर त्या छोट्या मैत्रिणीच्या सहवासानेच मी कंपनीत वावरू लागले. ती मला नेहमी म्हणायची, "मला सिनेमात काम करायला मुळीच आवडत नाही. मला रेडिओस्टार व्हायचे आहे." रेडिओस्टार म्हणजे काय हे त्यावेळी मला मुळीच कळायचे नाही. पण मी आपली तिच्या म्हणण्याला मान डोलावून होकार द्यायची. प्रफुल्ल कंपनीत अगदी मालकापासून तो गड्यापर्यंत सर्वजण या चुणचुणीत मुलीवर प्रेम करायचे. आणि तिचे लाडही पण खूप व्हायचे. तिनेही आपल्या गोड अन खेळकर स्वभावाने सर्वांना अगदी आपलेसे करून घेतले होते. ही माझी छोटी मैत्रीण कोण होती माहीत आहे का? ही माझी छोटी मैत्रीण म्हणजेच आजची जगप्रसिद्ध स्वरसम्राज्ञी लता मंगेशकर होय.

प्रफुल्ल कंपनीत मी फक्त सहासात महिनेच होते. पण त्या अवधीत लताबाईंची आणि माझी खूप मैत्री जमली होती. कंपनीतून संध्याकाळी घरी आल्यावर त्या सायकलीवर बसून माझ्याकडे यायच्या. आणि मग आम्ही दोघी मिळून त्यांच्या घरी जात असू. घरी जाताच लताबाईंच्या मातुश्री, माई, लताबाईंच्या बरोबर मलाही खायला द्यायच्या. मी खात नाही म्हटले तर आईच्या मायेने त्या माझ्यावर रागवायच्या आणि वाढलेले सारे आग्रह करून मला खायला लावायच्या. लताबाईइतकेच त्या माझ्यावरही प्रेम करायच्या. आणि तितकेच अजूनही करतात. लताबाईंची बाकीची भावंडे फार लहान होती. मला तर आठवते की त्यांच्या घरी गेले म्हणजे पहिले काम आशाबाईंची वेणी घालणे हे असायचे! माईंना विडा खायला आवडे. माझ्या गावाहून विड्याची पाने आली की मी ती माईंना नेऊन देत असे. माई मोठ्या प्रेमाने ती पाने खायच्या आणि मी ती आणून दिली आहेत असे बाहेरच्या माणसांना मुद्दाम सांगून माझे कौतुक करायच्या.

पुढे काही दिवसांनी प्रफुल्ल कंपनी मुंबईला गेली. मला मुंबईला येण्याविषयी लताबाईंनी खूपच सांगितले. पण मी जाऊ शकले नाही. पुढे मी चित्रपटसृष्टीतले माझे गुरु बाबा भालजी पेंढारकर यांच्या कंपनीत दाखल झाले. अशीच काही वर्षे गेली. अभिनेत्री म्हणून थोडीफार प्रसिद्धीही मला मिळाली होती. आणि एक दिवशी प्रथमच एक रेडिओ मी विकत आणला. मोठ्या उत्सुकतेने मी रेडिओ सुरू केला तो त्यातून सर्व दुःखाचा विसर पाडणारा असा एक अलौकिक स्वर्गीय स्वर माझ्या कानी पडला. मी अगदी भारावून गेले. पहिले गाणे संपून दुसरे कधी सुरू झाले ते कळले सुद्धा नाही. आणि मग त्याच स्वरात एकामागोमाग एक अशी बरीच गाणी मी

मला

ऐकली तीं गाणी ऐकताना मन भरून येत हाते. सर्वस्वाचा विसर पडत होता. अशी त्या स्वराने माझ्यावर विलक्षण मोहिनी घातली. तो आवाज कुणाचा आहे हे जाणून घेण्याची अतोनात उत्सुकता वाटू लागली. शेवटी त्या गायिकेचे नाव जेव्हा मी ऐकले तेव्हा माझ्या कानावर माझा विश्वासच बसेना. मी आश्चर्याने अगदी थक्क होऊन गेले कारण तो अलौकिक मधुर आवाज माझ्या त्या छोट्या मैत्रिणीचा म्हणजे लताबाईंचाच होता लताबाई कोल्हापूरहून गेल्यापासून तो त्यांचे ते गाणे मी ऐकेपर्यंत मधल्या काळात मला त्यांची काहीच हकिकत कळली नव्हती पण त्या दिवशी अकस्मात त्यांचा आवाज आणि त्यांचे नाव ऐकून मला जो विलक्षण आनंद झाला त्याचे वर्णन शब्दांत करणे मला तर अशक्य आहे. त्यानंतर लताबाईंचे गाणे ऐकल्याशिवाय माझा एकही दिवस जाईनासा झाला

एकोणीसशे चव्वेचाळीस सालानंतर मधली जवळजवळ आठदहा वर्षे मी त्यांना पाहिलेही नव्हते. आणि पुन्हा कधी काळी लताबाईंची भेट होईल ही आशाही नव्हती फक्त त्यांची गाणी ऐकण्यावरच मला समाधान मानावे लागत होते. कधी कधी मनात यायचे, कधी लताबाई भेटल्याच तर त्या ओळख देतील का ? की बालपणातली भाबडी मैत्री त्या विसरून गेल्या असतील ?

आणखीही काही वर्षे गेली. आणि मी चित्रपटात काम करण्यासाठी पुण्याला आले मला आता नीटसे आठवत नाही, पण 'बाळा जो जो रे' किंवा 'स्त्रीजन्मा ही तुझी कहाणी' यापैकी कोणत्या तरी एका चित्रपटाचा रौप्यमहोत्सव साजरा झाला होता आणि त्या निमित्त दत्ता धर्माधिकारी यांनी एक भोजनसमारंभ आयोजित केला होता. त्या समारंभाला मी गेले होते बरीच मंडळी तिथे जमली होती आणि एवढ्यातच लताबाई आपली धाकटी बहीण मीना हिच्यासह आल्या. सगळी मंडळी त्यांच्याभोवती गोळा झाली. मी मात्र त्यांचे ते कौतुक पाहत एका बाजूला बसले होते आणि स्वत शीच विचार करीत होते, लताबाईंना जाऊन भेटावं की नाही ? कारण आता त्या खूप मोठ्या पार्श्वगायिका झाल्या होत्या त्या आपल्याला ओळखतील का? आपल्याशी पहिल्याइतक्या आपुलकीने बोलतील का ? अशा अनेक प्रश्नांनी माझा गोंधळ उडविला होता आणि एवढ्यात लताबाईंचे माझ्याकडे लक्ष गेले. त्याबरोबर पूर्वीइतक्याच मनमोकळेपणाने माझ्याकडे बघून त्या हसल्या. मग मात्र मला राहवले नाही मी लगेच उठून त्यांच्यापाशी गेले. त्या माझ्याशी खूपच आपुलकीने बोलल्या माझी व माझ्या आईची त्यांनी आस्थेवाइकपणे चौकशी केली. एवढेच नव्हे तर मधल्या काळातले माझे सर्व मराठी चित्रपट आपण पाहिले असल्याचे त्यांनी मला सांगितले तसेच 'मीठभाकर' चित्रपटातले माझे काम त्यांना व माईंना खूप आवडल्याचेही त्या आवर्जून बोलल्या मला किती आनंद झाला असेल याची कल्पनाच करावी यावेळी लताबाईंना बरीच तरी प्रसिद्धी मिळालेली होती. वयाने, मानाने, सर्वच दृष्टींनी त्या मोठ्या झाल्या होत्या. पण मला मात्र 'प्रभुत्व' कालीतल्या माझ्या त्या छोट्या प्रेमळ मैत्रिणीत आणि आताच्या लताबाईंत काहीच फरक जाणवला नाही. ते साधेपणाने वागणे, मनमोकळे हसणे, आपुलकीने बोलणे—सारे काही जसेच्या तसे कायम होते. पूर्वी ज्या पद्धतीने त्या वागत असत तशाच आताही त्या माझ्याशी वागत होत्या त्यांच्यात मला जाणवलेला फरक म्हणजे पूर्वी मी त्यांना परकरपोलक्यात पाहत असे, आणि आता साडीत पाहत होते एवढाच वेणी त्या दोन लांबलचक वेण्यादेखील तशाच पाठीवर रुळत होत्या

पुढे लताबाई कोल्हापूरला येऊ लागल्या. आणि त्यानंतर आमच्या गाठीभेटी होऊ लागल्या त्यावेळी त्यांनी एका मराठी चित्रपटाच्या निर्मितीची तयारी चालवली होती त्या चित्रपटाचे नाव होते 'वादळ'. 'वादळ'मधल्या प्रमुख भूमिकेसाठी वेगवेगळ्या अभिनेत्रींची नावे घेतली जात होती. पण लताबाईंनी त्या भूमिकेसाठी माझीच निवड केली आणि एकप्रकारे माझ्या कलेबद्दल त्यांनी विश्वास व्यक्त केला. त्यामुळे मला केवढे समाधान वाटले असेल नाही ! माझ्या अभिनयाचे

लताबाईंनी नेहमीच कौतुक केले आहे नुसते शाब्दिक कौतुक नव्हे तर स्मृतिचिन्हे देऊन त्यांनी ते कौतुक माझ्याजवळ चिरंतन केले आहे यावरुन त्यांच्या मनातल्या लोभाचा मला प्रत्यय येतो. माझ्याप्रमाणेच माझ्या मुलीवर–कांचनवरही–त्या प्रेम करतात आजवर या प्रेमात कधी अंतर पडले नाही आणि पुढेही कधी पडणार नाही ज्या ज्या वेळी मी लताबाईंकडे जाते त्यावेळी त्या स्वत ट्रेमधून चहा आणून मला देतात यावर कदाचित कुणाचा विश्वास बसणार नाही, पण हे अगदी सत्य आहे मला मात्र अशा वेळी स्वप्न लागल्यासारखे होते

महाराष्ट्र हा दोन व्यक्तींच्यामुळे ओळखला जातो असे म्हणतात या दोन व्यक्ती म्हणजे एक छत्रपति श्री शिवाजीमहाराज आणि दुसऱ्या लताबाई ज्यावेळी मी हे ऐकते त्यावेळी माझा ऊर आनंदाने व अभिमानाने भरुन येतो आणि एवढ्या मोठ्या लताबाई या आपल्या आहेत, महाराष्ट्राच्या आहेत या जाणिवेने आपणच कुठे तरी मोठे झालो आहोत असे वाटून मस्तक उंचावते कुणी काही म्हणो, पण आपल्या माधुर्याने व आर्ततेने ऐकणाराच्या काळजाचा ठाव घेणारा असा अलौकिक आवाज पूर्वी कधी निर्माण झाला नाही आणि पुढेही होणार नाही. असे कलावंत युगा युगातून एकदाच जन्माला येतात लताबाईंना गायिका होऊन आज पचवीस वर्षे पुरी होत आहेत. त्यांचा रौप्यमहोत्सव आज साजरा होत आहे. पण माझी तर ईश्वराजवळ अशी प्रार्थना आहे की त्याने लताबाईंना उदंड आयुष्य द्यावे आणि त्यांच्या कलाजीवनाचा शतसांवत्सरिक महोत्सव साजरा करण्याचे भाग्य आमच्यासारख्या त्यांच्या असंख्य चाहत्यांना लाभावे



विश्वनाथ कोल्हापुरे

# चिरंजीव लता

आज अखंडित पंचवीस वर्षे आपल्या गोड आवाजाने रसिकांच्या हृदयाची पकड घेणारी ही हृदया. हो हृदयाच. बारशाच्या दिवशी पाळण्यात तिचे हेच नाव ठेवलेले होते. मला वाटते गडकऱ्यांच्या लतिकेमुळे हृदयाची 'लता' झाली. कारण दीनानाथांची 'भावबंधना' मधील लतिकेची भूमिका अगदी पेटंट होती. त्यावेळी लतासाठी घेतलेल्या भातुकलीतील भांड्यावर नावे होती 'हृदया दीनानाथ मंगेशकर.'

लतेचे वडील हे माझे मामा. मी त्यांना अप्पा म्हणत असे. ते ज्योतिषावर बोलताना सांगायचे, "विश्वनाथ, लतेच्या पत्रिकेतील गुरू, चंद्र, शुक्र, शनी आणि राहू यांच्या शुभयोगामुळे ही मुलगी मोठी कीर्तिवंत होईल." त्यांचे बोल अक्षरशः खरे ठरले. अखेरच्या दिवसात ते तिला म्हणायचे, "लते, गळ्यातला पंचम सांभाळ. तो तुला सब काही देईल. हे दोन तंबोरे आणि ही चिजांची वही-हीच माझी तुला देणगी." हे हृदयस्पर्शी बोल ऐकताना सर्वांचे मन गहिवरून येई.

लतेला वयाच्या चौथ्या पाचव्या वर्षापासून गाणी म्हणण्याचा अन् लक्षपूर्वक ऐकण्याचा नाद होता. त्यावेळी तिच्या कानावर येणारी गाणी म्हणजे नाटकातील पदे आणि चित्रपटातील सैगलची गाणी. लता तेव्हाही अगदी सही सही गायची. ही तिची आवड लक्षात येताच दीनानाथराव तिला निवडक रागदारी चिजा सांगू लागले. 'आलीरी मैं जागी' ही खंबावतीतील चीज वयाच्या दहाव्या वर्षी झालेल्या तिच्या व दीनानाथांच्या जलशात तिने प्रथम गाइली. ती ऐकताना पित्याला गहिवरून आले. त्यांच्या कानाचे पारणे फिटले. मी स्वतः हा गोड प्रसंग पाहिलेला आहे.

'आली तेरी जोबन' (सुगराई), 'बसंत आयी' (बहार), 'सदारंग नित उठकर देत दुहाई' (हमीर) अशा अनेक रागांतील चिजा त्या अल्लडपणातही ती फार चांगली म्हणायची. लतेबरोबरच मीना, आशा यांनाही दीनानाथराव चिजा सांगत. त्या तिघींनाही एकदा चीज ऐकली की बैठक मारून शिकत बसायची गरजच पडायची नाही. वयाच्या बाराव्या वर्षी एखाद्या चांगल्या गवयाइतका चिजांचा संग्रह लताजवळ तयार होता. 'हे हुवारे गया' ही मीनाची आवडती चीज अन् 'महादेव शंकर' (कुकुभ) ही आशाची आवडती चीज. चारचौघांत मोठ्या कौतुकाने वडील

आपल्या गुणी कन्यकांना ह्या चिजा गायला सांगत. सोलापूरच्या नूतन संगीत थिएटरमध्ये तारीख नऊ सप्टेंबर एकोणीसशे एकुणचाळीसच्या रात्री पितापुत्रीच्या जलशात लताचे अगदी प्रथमच स्टेजवर पाऊल पडले. लताचा पहिलाच जलसा, आणि तो 'नूतन संगीत' मध्ये. नियतीला असे जणू सुचवायचे होते की ही इवलीशी बालिका भविष्यकाळात संगीतात काही नूतन करून दाखवील. सोलापूरकरांनी बापलेकींचे मनापासून कौतुक केले. रागावर्तीनंतर 'ब्रह्मकुमारी'तील दीनानाथांचे 'मधुमीलनात या' हे पद लताने सुरेल गायले. त्या वेळेपासून लता आणि संगीत यांच्या झालेल्या मधुर्मीलनाचे फळ म्हणजेच तिचा सत्काराचा हा प्रसंग.

त्या जलशाच्या अपूर्व यशानंतर 'बलवंत' मधील गुणी बालगोपालांना जमवून 'बाळबलवंत'-तर्फे 'गुरुकुल' या नाटकाचा प्रयोग पंढरपूर येथे लताने केला. त्यात तिने कृष्णाची, पंढरीनाथ कोल्हापुरे यांनी सांदिपनीपुत्र कौशिकाची, चंद्रकांत गोखले यांनी सांदिपनीची अशा भूमिका केल्या. मीना, आशा, उषा या मंगलाचरणात होत्या. नाट्यकलाकारांचा इतका गुणी संच आणि त्यांचे दिग्दर्शन करणारे होते कै. दिनकर कामण्णा. प्रयोग फारच सुंदर झाला. त्याच मुक्कामात 'पुण्यप्रभावा'तील बाल युवराजाच्या भूमिकेत लता रंगभूमीवर आली. युवराजाची तीनही पदे लतेने दणकावून म्हटली. 'सौभद्रा'तील नारद, 'भावबंधना'तील कुसुम, 'चौदावे रत्न'मधील तान्या या भूमिकाही त्यानंतर तिने गाजवल्या. विशेषत तान्याची 'बघितलं ग्वाड पाखरू' ही लावणी तिने फार गोड ठसक्यात म्हटली.

मोठेपणी तिने फक्त एकदाच नाट्यात काम केले. अठ्ठेचाळीस साली दीनानाथांच्या पुण्यतिथीच्या वेळी चित्तरंजन कोल्हटकर (घनश्याम), पंढरीनाथ कोल्हापुरे (कामण्णा) यांच्यासमवेत ती 'लतिका' झाली. भालचंद्र पेंढारकर 'प्रभाकर' झाले आणि छोट्या मीनाने 'बिंदू'ची खेळकर विनोदी भूमिका वठवली. रंगभूमीवरील एके काळच्या प्रसिद्ध कलावंताची ही मुले एका रंगमंचावर पाहण्याचे भाग्य फक्त मुंबईकरांना व पुणेकरांनाच लाभले. लतिकेची सगळीच पदे चांगली झाली, पण माझ्या मनात घोळत राहिले ते तिचे 'सकल चराचरी या तुझा असे निवास' हे पद.

तसे पाहिले तर बाळपणापासूनच लताचा देवपूजेकडे विलक्षण ओढा. पाचसहा वर्षांची असल्यापासून नित्यनियमाने तिची देवपूजा चाललेली आहे. त्या बाल्वयात एका भांड्यात देवाच्या सर्व मूर्ती घेऊन धुतल्या की तिच्या देवाची आंघोळ व्हायची. मग एका रांगेने सर्व देवांना उभे करून हळदीकुंकू वाहिले जाई. दुसरा एक लतेचा आवडता खेळ पावसाळा असताना चालायचा. चाळीतल्या सर्व मुलांना एकत्र जमवून त्या काळी गाजलेल्या 'तुकाराम' बोलपटातील अभंग, संवाद अडीचतीन तास ती म्हणत राहायची. त्यावेळी लता 'तुकाराम' व्हायची. वडील मंडळी हा खेळ कौतुकाने पहात बसायची.

माझी त्यावेळी त्या सर्वांमध्ये एक होतो, हे केवढे मोठे समाधान आहे!

दत्ता डावजेकर

# ते सुरुवातीचे दिवस

एकोणीसशे एकचाळीस सालचा ऑक्टोबर महिना. मी माझे पहिलेच 'म्युनिसिपालिटी' या चित्राचे संगीत दिग्दर्शन संपवून 'नवयुग' मध्ये मा. विनायक यांच्याकडे नोकरीला राहिलो होतो. 'पहिली मंगळागौर' या चित्राचे काम चालू होते. दादा चांदेकर संगीत देत होते आणि मी 'सरकारी पाहुणे' चित्रासाठी चाली हुडकत वेळ काढीत होतो.

अशा वेळी एका दुपारी सातआठ वर्षांची एक मुलगी जुना फ्रॉक, त्यावर ब्राउन रंगाचा जुना कोट, पाठीवर दोन वेण्या सोडलेल्या, अशी आमच्या म्युझिक हॉलमध्ये आली. तिच्याबरोबर मला अपरिचित असलेले एक गृहस्थ होते. आणि त्या उभयतांबरोबर होते विनायकराव. ते घाईत असल्यासारखे मला म्हणाले, "डावजेकर, या मुलीचं गाणं ऐका आणि मला रिपोर्ट द्या." एवढे बोलून ते तसेच लगबगीने स्टुडिओकडे पळाले.

मी त्या मुलीला खुर्चीवर बसण्यास सांगितले आणि स्वतः हार्मोनियम घेऊन तिच्याजवळ बसलो. तिला कुठलेही गाणे म्हणण्याची सूचना केली. तिने गाणे सुरू केले अन् मी हार्मोनियमवर सूर शोधू लागलो. पण कसचे काय नि कसचे काय! आम्ही नावापुरतेच पेटी वाजवणारे. तिचा एक स्वर मी शोधताशोधता ती पुरा तानेचा फेरा मारून षड्जावर आलेलीही असायची. त्या गंधर्व गायनात मी मुळी पेटी वाजवणेच विसरून गेलो आणि तिच्या तोंडाकडे पाहात गाणे ऐकत राहिलो.

पहिले गाणे संपले. ती मुलगी थांबली. मी पुन्हा तिला एक गाणे गावयास सांगितले. तिने पुन्हा गाणे सुरू केले. मी व माझा अखिल वाद्यवृंद तिच्याभोवती कोंडाळे करून स्तिमित होऊन ऐकत राहिलो. मग आश्चर्य वाटले की इतकी लहान मुलगी इतके तयार आणि मधुर गाणे गाऊ तरी शकते कशी! हिला कुणी शिकवले असावे! मी आमचे सतारवादक पी. शंकर यांना कुतूहलाने त्या मुलीसंबंधी विचारले. त्यांनी माझ्या कानात हलकेच सांगितले, "अहो, ही लता, कै. दीनानाथ मंगेशकर यांची मुलगी."

दीनानाथांचे नाव मी ऐकले आणि एकदम माझ्या डोळ्यापुढे 'रणदुंदुभी' नाटक उभे राहिले.

समोर मला स्टेज दिसू लागले. दीनानाथांचे मी एकच नाटक पाहिलेले. आणि तेही अविस्मरणीय असे 'रणदुंदुभी'. त्यावेळी त्या नाट्यातल्या दीनानाथांच्या गायकीने मला शब्दशः वेडे केले होते. पुढे मी अनेकदा त्यांची नाटके बघण्याची धडपड केली होती. पण आमच्या अठराविश्वे दारिद्र्यामुळे ते मला शक्य झाले नव्हते. तरीही पाहिलेल्या त्या एकाच नाटकाचा, त्यातल्या दीनानाथांच्या त्या अलौकिक गायकीचा कानामनावरचा ठसा कधीच पुसून गेला नव्हता.

त्या दीनानाथांची ही मुलगी हे कळताच त्या सर्व जुन्या स्मृती विजेसारख्या मनात चमकून गेल्या. लताचे नुकतेच ऐकलेले गाणे मनात घर करून बसले होतेच. मी तसाच उठलो आणि धावतच 'सेट' वर गेलो. विनायकराव शूटिंगमध्ये गुंतले होते. मी तिथल्या त्या वाकड्यातिकड्या फळ्या, पट्ट्या, पडदे, दिवे, सामानातून वाट काढीत वेगाने त्यांच्याजवळ गेलो आणि घाईघाईने सांगू लागलो,

"विनायकराव, गाणं ऐकलं. ती मुलगी मागेल तो पगार तिला द्या. पण तिला आपल्या संगीत मचात ठेवून घ्या."

माझ्या हावऱ्या आणि उतावीळ चेहऱ्याकडे पाहात विनायकराव मिस्किलपणे म्हणाले,

"ठीक आहे. तुम्ही म्हणताच तर ठेवू या तिला आपल्या स्टाफवर. पण पगार काय द्यायचा?"

"काहीही" मी म्हणालो, "तुमच्या इच्छेला येईल तेवढा, पण जास्तीत जास्त द्या."

विनायकराव हसू लागले व म्हणाले,

"तुम्ही जा आता मी सर्व नक्की करतो"

आणि मग आम्हाला लता मंगेशकरचा लाभ झाला. आमच्या संगीतसंचाला गंधर्वअप्सरेचा लाभ झाला. मग आम्हाला प्रतिदिवशी लताचे मधुर व अकल्पित असे स्वर्गीय संगीत ऐकायला मिळू लागले. मनातल्या मनात मी माझ्या संगीतरचनेशी लताच्या गायकीची तुलना करीत असे. अशा वेळी कधी कधी मी अगदी निराश होऊन जाई. वाटे की छे! हे सारे नव्हेच. आपण करतो ते सारे कृत्रिम आहे. प्रदर्शनात मांडलेल्या चित्रातल्या नदीसारखे, डोंगरासारखे आहे. तात्पुरते दृष्टील सुखवणारे. त्यात आत्मा नाही. चैतन्य नाही. अंतःकरणाला प्रफुल्लित करणारे काहीही नाही. अरण्यातल्या खऱ्या अकृत्रिम निसर्गसौंदर्याच्या अनुभूतीची सर त्याला केव्हाही येणे शक्य नाही...या जाणिवेची व्यथा मनात सतत असल्यामुळेच की काय, 'सरकारी पाहुणे' या चित्राला मी दिलेले संगीत मला नेहमीचेच चांगले वाटले. लता त्यावेळी माझ्या जीवनात येती ना, तर इतके तरी वेताचे संगीत मी देऊ शकलो असतो की नाही याची मला शंकाच वाटते.

नंतर माझे नि लताचे सान्निध्य वाढत गेले. पुढे आम्ही कोल्हापूरला गेलो तेथे विनायकरावांनी आपली स्वतःची 'प्रफुल्ल पिक्चर्स' ही संस्था सुरू केली. संस्थेचे पहिले चित्र 'माझं बाळ' याच्या तालमी सुरू झाल्या. या चित्रात प्रथम लता माझ्याकडे गाइली. त्यापूर्वी ती दादा चांदेकर यांच्या दिग्दर्शनाखाली 'पहिली मंगळागौर' मध्ये गाइली होतीच. तिचा आवाज वयोमानाप्रमाणे काहीसा बारिक पण तितकाच तयार, चढ्या सुराचा असा होता. बालभावामुळे तिला नायिकेची गाणी देणे शक्यच नव्हते. शिवाय 'माझं बाळ'च्या नायिका मीनाक्षी या स्वतःच गाणाऱ्या असल्यामुळे त्यांना 'प्लेबॅक' देणेही अशक्य! तेव्हा मी स्वतः आणि विनायकराव दोघांच्याही मनात लताला गाणे देण्याची जबर इच्छा असून सुद्धा 'माझं बाळ' चित्रासाठी तिचा कसा उपयोग करून घ्यावा ते कळेना. विनायकराव मला रोज विचारीत, "डावजेकर, काही सापडलं का सिच्युएशन?" आणि मी "नाही हो!" म्हणून गप्प बसे. शेवटी स्वतः विनायकरावांनीच अनाथाश्रमाच्या सीनमध्ये मुलांच्या मिरवणुकीचे दृश्य घालून त्याच्या तोंडी "चला चला नवबाळ गुंफू चला सुममाला" असे गीत घालण्याचे ठरवले. त्यावेळी प्रथम लता व तिची भावंडे गाइली. पण ते समूहगीत असल्याने लताच्या गायकीचा पुरेपूर उपयोग त्यात मला करून घेता आला नाही. त्यानंतर मात्र 'चिमुकला संसार' व

लता

'गजाभाऊ' या चित्रातून लता पुष्कळच गाइली. आणि त्या गीतांनी तिला भरपूर स्तुतीही मिळवून दिली.

त्यावेळी मी, लता व वेबी आचरेकर तिघे रोज कंपनीत आलो की आमचा ठराविक कार्यक्रम म्हणजे शालिनी स्टुडिओच्या कंपाउंडाच्या बाजूबाजूने पुरी एक रपेट करायची व मग म्युझिक हॉलमध्ये जायचे. तसेच कंपनी सुटण्यापूर्वीही मध्यान्हकाळी आमची दुसरी रपेट ठरलेली. 'प्रफुल्ल पिक्चर्स'चे बोधचिन्ह होते कमलपुष्पाकडे झेप घेणारे बाळ. त्यामुळे आम्हा तिघांना 'प्रफुल्लची बाळे' म्हणून सर्वजण चिडवीत असत. या रपेटीत आमचा विषय संगीत हाच असे. लताला संगीताबद्दल जास्तीत जास्त बोलायला लावायचे आणि तिच्या तोंडून जेवढे म्हणून ऐकायला मिळेल—अर्थात् संगीतातच तेवढे ऐकायचे असा माझा तेव्हाचा ठरलेला क्रम असे. लता तेव्हा कधी वडलांची गाणी मला म्हणून दाखवी तर कधी अस्सल रागदारीच्या चिजा, तर कधी जुन्या गझला. कधी कधी मी वेबी आचरेकरला चुकवून फक्त लतालाच रपेटीसाठी नेत असे. मग खिशातले चॉकलेट हळूच काढून तिला देत मी म्हणे, "लता, काल तू ऐकलेली ती चाल मला पुन्हा ऐकव ना!" मग काय, चॉकलेटने तोंड गोड करून लता अधिकच गोड गात असे. माझेही काम होऊन जाई आणि मग मी नवीन चाली करायला उत्साहाने सुरुवात करीत असे. याच वेळी माझ्यावर मंगेशकर घराण्याच्या गायकीचा खूप प्रभाव पडला. अर्थात असे केवळ वर्ष दोन वर्षे ऐकून ती गायकी आत्मसात होणे शक्यच नव्हते. पण साधारणतः नवा ढंग आणि वेगळेपणा म्हणजे काय ते मला समजू लागले आणि अजूनही माझ्या काही चालींत मंगेशकर गायकीची थोडी छाप दिसून येते. ही मग लतापासून मिळालेली फार मोठी देणगी होय असे मी समजतो.

'गजाभाऊ' नंतर कंपनीवर मोठे गडांतर आले. आम्ही सर्वजण कोल्हापूर सोडून मुंबईला आलो. लता शंकरशेट मंदिरातल्या जागेत राहू लागली. मी माझ्या आतेभावाकडे राहावयास गेलो. यानंतर पूर्वीसारखे आमचे निकट सान्निध्य अर्थातच राहणे शक्य नव्हते. मीही पुढे 'प्रफुल्ल'ची नोकरी सोडली आणि चरितार्थासाठी इतर ठिकाणी कामे करू लागलो. याच सुमारास वसंत जोगळेकर यांच्या 'आपकी सेवामें' या चित्रात लताने माझ्याकडे पाच गाणी हिंदीमध्ये प्रथमच गाइली. ती सर्व गाणी राजकमल स्टुडिओत ध्वनिमुद्रित केली होती. यानंतर लताला हिंदी चित्रातून भराभर कामे मिळत गेली. हिंदी चित्रसृष्टीत तिचा जम बसला. मी मात्र मराठीतच रमडत पडलो.

एकोणीसशे एकेचाळीस बेचाळीस सालापासून लताच्या चित्रपटसृष्टीतल्या संगीत जीवनाला प्रारंभ झाला आणि आज तर त्या क्षेत्रात ती केवळ अजिंक्य होऊन बसली आहे. अखिल भारतातच नव्हे, तर जागतिक संगीतक्षेत्रातही लताच्या गीतांचा उच्चांक असावा. महाराष्ट्रातील एका मुलीने भारतीय चित्रसृष्टीत अजिंक्य व अग्रेसर असावे हे खरोखरच महाराष्ट्राला भूषणावह आहे. व म्हणूनच प्रत्येक महाराष्ट्रीयाने या गोष्टीची जाणीव ठेवणे अगत्याचे आहे. लता मंगेशकरनंतर तिची कनिष्ठ भगिनी आशा भोसले हिचा क्रम लागतो. म्हणजे या दोन्ही कलावंत महाराष्ट्रीय आहेत. हे आमचे केवढे भाग्य म्हटले पाहिजे. पार्श्वगायनातील गुणवत्तेमुळे तर लता सर्वप्रसिद्ध आहेच पण तिच्या कलेचा आणखी एक तेजस्वी पैलू म्हणजे तिने केलेले संगीत दिग्दर्शन. 'रामराम पाहुणं' या चित्राला प्रथम तिने संगीत दिले. आणि अगदी अलीकडे अवघ्या चार पाच वर्षांत 'मोहित्यांची मंजुळा' पासून 'साधी माणसं' पर्यंतच्या चित्रपटातून शुद्ध मराठी वळणाची सुंदर सुंदर गीते तिने जनतेला सादर केली. विशेष म्हणजे अगदी कमी वादक घेऊन तिने हे कौशल्य दाखविले आहे.

या संगीताचे वैचित्र्य आणि वैविध्य दीर्घकाळ रसिकांच्या ध्यानी राहील!

कमलनाथ मंगेशकर

# मंगेशाची कृपा

नवमहाराष्ट्र राज्याच्या स्थापनेचा तो दिवस. शिवतीर्थावर अफाट जनसमुदाय लोटला होता. पंडित जवाहरलाल नेहरू या समारंभासाठी मुद्दाम महाराष्ट्रात आले होते. त्यांच्या शुभ हस्ते एका नव्या राज्याची स्थापना होणार होती. अशा त्या सुंदर समारंभात, संध्याकाळच्या कोवळ्या उन्हात, एक गायिका महाराष्ट्रगीत गात होती. वातावरण त्या मधुर स्वरांनी भरून उचंबळून गेले होते. सूर उमटत होते. चढत होते. पसरत होते—

बहु असोत सुंदर संपन्न की महा
प्रिय अमुचा एक महाराष्ट्र देश हा

मी एका कोपऱ्यातून ते गीत ऐकत होतो. गायिकेकडे डोळे भरून बघत होतो. बघता बघता छाती अभिमानाने उंचावली. मन गहिवरून आले. गालांवर अश्रू ओघळले. जीवन कृतार्थ झाल्यासारखे वाटले. कारण ती गायिका माझी सख्खी पुतणी होती. माझ्या बंधूंची—मा. दीनानाथांची—लेक होती. ज्याने मराठी रंगभूमीला नववैभव प्राप्त करून दिले होते. त्याची मुलगी भारताची स्वरसम्राज्ञी बनली होती. आमचे मंगेशकर घराणे धन्य झाले होते.

व्यासपीठावर तन्मयतेने गाणारी आमची लता पाहून हे सारे विचार मनात दाटून आले आणि त्या गर्दीतही मी आमच्या कुलदेवतेला—शितळादेवीला—मनोमन दंडवत घातले. लता हा तिचाच कृपाप्रसाद होता. मला लतेच्या बाळपणीचा तो भयंकर प्रसंग आठवला. छोट्या लतेला देवी आल्या होत्या. पायाच्या नखापासून डोक्याच्या केसापर्यंत सारे अंग फुलून गेले होते. तो बाळजीव सारखा तगमगत, तडफडत होता. अंगदाहाला सर्वांही तिला सहन होत नसल्यामुळे आम्ही तिला केळीच्या पानावर झोपवीत होतो. तिच्याकडे बघताना नाही नाही त्या शंका मनात दाटून येत होत्या. 'मन चिंती ते वैरी न चिंती' अशी आमची साऱ्यांची अवस्था झाली होती. पण शितळादेवी पावली. श्रीमंगेशाने कृपा केली. आणि देवीसारख्या भयानक दुखण्यातूनही आमची लता सुखरूप आम्हाला

लता

परत मिळाली. ती वाचली. इतकेच नव्हे तर त्या कोवळ्या वयातही आपले वैशिष्ट्य स्पष्टपणे प्रकट करणारा, अनेक अवघड हरकती मुरक्या सहजपणे घेणारा तिचा असामान्य सुरेल गळाही आपल्या सर्व सुरेलपणानिशी टिकून राहिला

आज महाराष्ट्राचे गुणगान करीत असलेल्या लतेला बघताना हे सारे मला आठवत होते त्याबरोबरच तिच्या बाळपणच्या इतरही अनेक आठवणी उचंबळून वर येत होत्या बघता बघता 'नामांकित पार्श्वगायिका लता मंगेशकर' हिच्या जागी मला परकरपोलक्यातली छोटी चुणचुणीत लता दिसू लागली.

एकोणीसशे तेहतीस चौतीस साल आम्ही तेव्हा सांगलीला राहत असू. लता असेल तेव्हा सरासरी तीनचार वर्षांची या वयाची मुले खेळण्याबागडण्यात अधिक रमतात पण लता कधी आमच्या बरोबरीच्या मुलांत खेळत रमून गलेली आम्हाला पहायलाच मिळाली नाही ती बहुधा म्हराड्यात एकटीच खेळत असे. अशावेळी अप्पांनी—दीनानाथांनी—तंबोऱ्याची गवसणी काढली, तारा झंकारू लागल्या की लताने तिकडे धाव घेतलीच म्हणून समजावे त्यांनी गाणे म्हणायला प्रारंभ केला की लताही गाऊ लागे अनेकदा तो एखादा जीव कठीण कठीण चिजा आपल्या गळ्यातून अशा सफाईने साकार करी की अप्पासुद्धा तिच्याकडे आश्चर्याने बघत राहत

आता जुन्या गोष्टी आठवल्या म्हणजे नवल वाटते पण लतेची ग्रहणशक्ती किती छोट्या वयापासून तीव्र आणि वलग होती अप्पा कधी तिला जवळ घेऊन तासन् तास शिकवीत बसले नाहीत पण सहजगत्या, येता जाता, चालता बोलता त्यांनी जे तिला शिकवले ते तिने एकाग्र चित्ताने ऐकून घेतले. मनात साठवले घोटवले. आणि त्यातून आपली संगीतविद्या ती वाढवीत गेली. अनेकदा अप्पा एखादी कठीण तान घेत लता अगदी हुबेहूब तीच तान आपल्या गळ्यातून काढून त्याची शाबासकी मिळवी इतकच काय, पण एखादे वेळी अप्पांनी घेतलेली हरकत त्यांना पुन्हा घेता आली नाही तर लता स्वत ती त्यांना घेऊन दाखवी तिच्या या जबरदस्त ग्रहणशक्तीमुळे या मुलीला शिकवावे तरी काय असा अप्पानाही पुष्कळ वेळा प्रश्नच पडे कारण त्यांनी एखादी चीज शिकवायला प्रारंभ केला की लतेने म्हणावे, "बाबा, ती चीज तर तुम्ही केव्हाच शिकवली आहे!" मग ते दुसरी चीज सुरू करीत तीही आपण मागच आमसात केली असल्याचे लता त्यांना स्मरण करून देई असा काही जबरदस्त शागीर्द अप्पांना भेटला होता अर्थात आमचे बधुराजही काही कमी नव्हते अनेक उत्तमोत्तम नि कठिणातील कठीण चिजांचे भांडारच भरलेले होते त्यांच्याजवळ. चिमुकली लता त्यातून घेऊन घेऊन किती घेणार! असा अजब उस्ताद नि अशी अजब शागीर्द यांची जोडी क्वचितच निर्माण झाली असेल!

लतेच्या दांडग्या स्मरणशक्तीची अशीच एक आठवण सांगण्याजोगी आहे मी तेव्हा सांगलीच्या सिटी हायस्कूलमध्ये मॅट्रिकचा अभ्यास करीत होतो अनेकदा मी इतिहासातल्या सनावळ्या पाठ करीत बसे लता तेव्हा कुठेतरी आसपास खेळत असावयाची तिच्या कानावर त्या सनावळ्या ओघरत्या पडत पण त्या देखील तिला चटकन पाठ होत आणि मग कित्येकदा तीच मला सांगे, अमुक अमुक घटना अमुक अमुक सालात घडली म्हणून याच आपल्या अजब स्मरणशक्तीमुळे ऐकलेले गाणेही ती 'डिट्टो' म्हणून दाखवीत असे

एकोणीसशे पस्तीस सालची गोष्ट स्वरसम्राट सैगल याचा 'चंडीदास' हा चित्रपट सांगलीला लागला होता लताने अप्पाबरोबर तो चित्रपट पाहिला सैगल याचे काम आणि त्याचे गाणे तिला इतके काही आवडले की त्यानंतर कितीतरी दिवस ती आपण मोठ्या झाल्यावर सैगलशीच लग्न करणार असे आम्हाला सांगत असे! सैगल यांच्या रसपूर्ण गायकीने ती एवढी भारावून गेली होती की तिने हट्ट धरून पहिली ध्वनिमुद्रिका खरेदी केली ती सैगल याची 'देवदास'

वैशिष्ट्यपूर्ण गुण तिच्या अंगी आहेत. आपल्या सुमधुर स्वराने जगाला मोहिनी घालणारी ही आमची लता तितकीच निर्भय आणि मिष्किल पण आहे. दुसऱ्याची नक्कल करण्यात ती पटाईत आहे, तशी इतरांच्या उपयोगी पडण्यात ती सतत आघाडीवर असते. तिची ही परोपकारी वृत्ती कशी बालपणापासून तिच्या स्वभावात रुजलेली होती याचे एक गमतीदार उदाहरण सांगतो. माझी मॅट्रिकची परीक्षा आटोपल्यावर मी महिनाभर सांगलीहून बाहेरगावी गेलो होतो. त्यामुळे माझी खोली बंद होती. मला परत यायला तीनचार दिवसांचा अवधी राहिला तेव्हा आपल्या काकाची खोली स्वच्छ करून ठेवण्याची कामगिरी लतेने आपखुषीने आपल्या अंगावर घेतली. त्याप्रमाणे माझी खोली तर तिने झाडून पुसून स्वच्छ केलीच. पण माझ्या टेबलावर एक जुनं घड्याळ होतं ते देखील, त्यावरची धूळ जाऊन ते स्वच्छ व्हावं म्हणून लतेने साबण लावून, पाण्यात खळबळून, धुवून काढले. मी बाहेर गावाहून आल्यावर लतेने मला सर्वप्रथम माझी खोली स्वच्छ करून ठेवल्याची बातमी दिली नि मग ती हळूच मला म्हणाली "—आणि हे बघ काका, तुझं घड्याळसुद्धा मी साबणाने चांगलं धुवून ठेवलंय बर का!" आपल्या पुतणीचा तो प्रताप ऐकून मी फक्त कपाळाला हात लावला!

अशी ही आमची लता. गेली पंचवीस वर्षे ती सतत गात आहे. तिचा आवाज ही राष्ट्राची अनमोल संपत्ती होऊन बसली आहे. मला फार फार वाटते की आज तिच्या कलाजीवनाचा रौप्यमहोत्सव साजरा होत असताना शासनाने देखील तिच्या कलागुणांची कदर करावी. तिच्या कर्तृत्वाची दखल घ्यावी. लता या व्यक्तीखातर नव्हे तर तिच्या ठायी असलेल्या कलेखातर.

लतेच्या बाबतीत माझे आणखीही एक आवडते स्वप्न आहे. तिचा स्वर सातासमुद्रापलिकडे केव्हाच पोहोचला आहे. पण लतेने प्रत्यक्ष परदेशी जाऊन आपल्या अंगची गानकला प्रकट करायला हवी. अजून तिने भारताचा किनारा सोडला नाही. पण तिला प्रत्यक्ष पाहण्यासाठी अनेक परदेशी रसिक चाहते उत्सुक झाले आहेत. आणि माझी खात्री आहे की आमची लता आपल्या साध्या राहणीने, निगर्वी स्वभावाने, स्नेहशील वागणुकीने नि भावपूर्ण गायकीने परदेशी मंडळींचीही हृदये निश्चित जिंकील।



नि. वा. शिरवाडकर

# स्वर

लता मंगेशकर हे एका व्यक्तीचे नाव आहे हे सहसा माझ्या ध्यानातच येत नाही. असे नेहमी वाटते की, स्वराच्या एका अलौकिक अनुभूतीने, हे लौकिक नाव केवळ व्यवहाराच्या सोयीसाठी धारण केले आहे. रेडियोची कळ फिरविताच, सोन्याच्या कोऱ्या करकरीत मुद्रेप्रमाणे हे नाव अगणित ठिकाणी आणि अगणित वेळा रेडियोतून बाहेर पडले आहे आणि त्याच्या मागोमाग माणसाच्या सरपटणाऱ्या, कोरडलेल्या जीवनाला अपार्थिव आनंदाचा स्पर्श करणारे तीव्र मुलायम संगीत त्या परिसरावर चांदण्यासारखे बहरले आहे. शृंगार, कारुण्य, वात्सल्य, बलिदान इत्यादी अनेक भावनांची मूलतत्त्वे या स्वराच्या रुपेरी नौकेतून आपल्या घरापर्यंत पोचली आहेत आणि शब्दार्थांची तटबंदी तोडून त्यांनी आपल्या अंतःकरणात प्रवेश केला आहे. लता मंगेशकरांची छायाचित्रे मी अनेकदा पाहिली आहेत. त्यांचा प्रत्यक्ष परिचयही झालेला आहे. नाशिक येथील एका मुक्कामात त्या माझ्या घरी आल्या होत्या आणि इतर सर्वसाधारण माणसांप्रमाणे त्या समोरच्या खुर्चीवर बसल्या होत्या, बोलल्या होत्या. पण त्यावेळी सुद्धा काही औपचारिक बोलणे चालू असता, त्यांच्या जवळपास दरवळणाऱ्या त्या असामान्य स्वराचा माझे मन अभावितपणाने शोध घेत होते. लता मंगेशकर आणि संगीत यांची इतकी एकात्मता झाली आहे. निदान ऐकणाऱ्याच्या दृष्टीने.

त्या स्वराचा हा पंचविसावा वाढदिवस. पहिली उमेदवारीची चारपाच वर्षे सोडली तर हा स्वर भारताच्या आकाशात गेली वीस वर्षे अजिंक्य अधिकाराने वावरत आहे. राजसूय यज्ञाची पूर्तता करण्यासाठी प्रांतोप्रांती आपले यश आणि सत्ता प्रस्थापित करीत जाणाऱ्या सोनेरी ध्वजाश्वाप्रमाणे. या वीस वर्षांच्या काळामध्ये देशात कितीतरी परिवर्तने घडून आली, राजसत्ता बदलल्या, राज्यघटी बदलल्या. राष्ट्रीय जीवनात कधी गौरवाचे प्रसंग आले तर केव्हा विषादाचेही. कधी आनंद उत्साह तर केव्हा असह्य यातनाही. या सर्व परिस्थितीतून, लताचा रुपेरी स्वर मागावरच्या चक्रातून फिरत्या जाणाऱ्या धाग्याप्रमाणे सतत विणला गेला आहे. सुखाप्रमाणे दुःखाला आणि सन्मानाप्रमाणे अपमानाही त्याने शोभा केली आहे. मुग्ध शृंगाराने लाल मखमली दुपेटे त्याने धाग्यावर फुलविले

ल ११

आहेत, इंद्रायणीच्या लहरींचा आर्त नाद त्याने आपल्या पंखावर मिरवला आहे, आणि सरहद्दीवर कोसळणाऱ्या शहीदांना लक्षावधी लोकांच्या आसवांचा नजराणा त्याने पोचवलेला आहे. सृष्टीतल्या कोकिळा फक्त वसंतातच गातात, पण या कोकिळेने मात्र प्रत्येक ऋतूला वासंतिक स्वराचा दिलासा दिला आहे. दिवसामागून दिवस आणि वर्षांमागून वर्षे गेली, पण या स्वराची मधुर मिरासदारी कमी झाली नाही. आकाशातील असंख्य स्वरांच्या गर्दीतून या स्वराचा जरीपटका राजेपणाने संचार करीत आलेला आहे. स्वतंत्र रस्त्याचा अधिकार प्रस्थापित करीत आणि इतरांचे कुर्निसात घेत. या स्वराच्या शेजारी राहून अलीकडच्या काळात वाटचाल केली ती त्याच घरातील दुसऱ्या एका स्वराने—आशाच्या.

अनुभवाची वस्तूप्रमाणे व्याख्या करता येत नाही. लता मंगेशकरांच्या गाण्याची शास्त्रीय चिकित्सा करण्याचा मला अधिकारही नाही. पण कोणत्याही कलेच्या बाबतीत शास्त्र हे प्रतिभेच्या मानाने दुय्यमच असते. इंदूरचे रामूभैया दाते हे मोठे संगीतशास्त्रज्ञ आहेत आणि नाणावलेले रसिकही आहेत. त्यांनी एका लेखात असे म्हटल्याचे आठवते की मोठमोठ्या खांसाहेबांच्या आणि बुवासाहेबांच्या गाण्याइतकेच लताचे गाणेही मला आवडते, धुंद करते. ही करामत प्रतिभेच्या स्पर्शाची आहे. या स्पर्शामुळेच गीतातील स्वररचनेचे नक्षीकाम नव्हे, तर त्यातून झिरपणारा एक अनुभव आपल्या अंतःकरणापर्यंत जाऊन पोचतो आणि आपण काही क्षणासाठी का होईना पण त्याच्या स्वाधीन होतो. सैगलप्रमाणेच लता मंगेशकरांच्या अनेक गीतांनी हा अनुभव मला दिला आहे, आपल्या कोशाबाहेर गेल्याचा, मुक्ततेचा आनंद, त्याचप्रमाणे सभामंडप ओलांडून एखाद्या भावनेच्या गाभाऱ्यापर्यंत गेल्याचाही. ही बहुतेक गीते कोठल्यातरी चित्रपटातील आहेत आणि हेही निर्विवाद आहे की लताच्या गायकीने हिंदी चित्रपटाला एक कलात्मक संपन्नता आणि सामर्थ्य मिळवून दिले आहे. पण तरी देखील मला वाटते की लताची गाणी म्हणजे नुसती सिनेमाची गाणी नव्हेत. त्यांचे आवाहन सिनेमापुरते अथवा सिनेमावरही अवलंबून नाही. (अर्थात हे चांगल्या गीतासंबंधी.) मी फार थोडे हिंदी चित्रपट पाहिले आहेत. ते प्रत्यक्ष पाहताना त्यातील लताची नामांकित गीतेही मनात कोठे खोलवर जात आहेत असे सहसा मला वाटले नाही. चित्रणाच्या इतर अंगांच्या पातळीवर ओढल्यामुळे (काही अपवाद वगळता) ही गीते थिएटरात पुष्कळदा बोथट वाटली. त्यांची असामान्यता मला जाणवली आणि नेहमी जाणवते ती सिनेमाच्या पडद्यापासून दूर, रेडियोवरती अथवा मुद्रिकेवरती. जेव्हा ती स्वतःच्या स्वतंत्र अधिकाराने माझ्या परिसरात येतात. माझ्या खोलीतील रात्रीच्या नीरवतेवर कितीतरी वेळा लताच्या स्वराने आपले सोनेरी शिक्कामोर्तब केले आहे. परवाच 'ऐ मेरे वतनके लोगो—' हे गीत असेच ऐकत होतो. पूर्वी अनेक वेळा ऐकलेले. शब्द तर चांगले आहेतच. पण जाणिवेवर आणि भोवतालच्या हवेवर गाढ कोरीव भावनेचा कशिदा काढीत गेला तो त्या गीताचा स्वर.

त्या प्रतिभाशाली आणि अपराजित स्वराला मनःपूर्वक धन्यवाद.



वि. वा. शिरवाडकर

रविशंकर

# ईश्वरी वरदान

लता मंगेशकर यांचा आवाज पहिल्या प्रथम मी ऐकला तो रंगभूमीवर, मुंबईतील एक्सेलसियर थिएटरमध्ये बुद्धाच्या जीवनावर आधारलेल्या एका नृत्यनाट्यातली गीते म्हणताना. मला आठवते की त्याच वेळी त्यांच्या आवाजाची निश्चित गुणवत्ता आणि त्यांचे स्वच्छ सुस्पष्ट शब्दोच्चार यांनी मी फार प्रभावित होऊन गेलो होतो.

तेव्हापासूनच कलाक्षेत्रातली त्यांची प्रगतिपर वाटचाल कशी होत गेली आणि आज एका दुर्मिळ आणि लोकोत्तर कलावंतात त्यांच्या प्रतिभेची परिणती कशी झाली हे सारे मी बारकाईने आणि मोठ्या कौतुकाने पाहत आलो आहे. अशा तऱ्हेचे अलौकिक प्रतिभावंत खरोखरच दुर्मिळ असतात, कारण त्यांना घडवताना वापरलेला साचा निसर्ग पुन्हा क्वचितच वापरतो. प्रत्येक संगीतदिग्दर्शकाच्या गरजेनुसार आणि कल्पनेनुसार स्वतःला हवे तसे वळवू शकणारा विलक्षण लवचिक आवाज जसा त्यांना लाभला आहे त्याप्रमाणेच कोणतेही गीत अत्यंत भावपूर्ण रीतीने कसे म्हणावे आणि त्यातून काळजाला स्पर्श करणारी असाधारण कलाकृती निर्माण व्हावी यासाठी कंप, मृदुता, कारुण्य, लयबद्धता या साऱ्यांचा यथाप्रमाण वापर कसा करावा यांचीही एक उपजत समज त्यांना आहे.

आम्हा उभयतांना एकत्र काम करण्याचा योग आला तो 'अनुराधा' आणि 'गोदान' या चित्रपटातील गाण्यांच्या निमित्ताने. ही गीते ध्वनिमुद्रित करीत असताना कोणत्याही गीतामधली भावना जाणून घेणे, संगीतदृष्ट्या त्यात निर्माण होऊ शकणारी सौंदर्यस्थळे अचूक हेरणे आणि संगीतदिग्दर्शकाला नेमके काय हवे आहे याचा अंदाज घेऊन ते गीतातून संपूर्णतया प्रकट करणे या साऱ्याच बाबतीत लताबाईंना किती विलक्षण गती आहे याचा मला प्रत्यय आला.

बुद्धिमान आणि संवेदनशील गायकांविषयी माझ्या अंतःकरणात एक विशेष आदरभाव आहे. आणि या दोन्ही देणग्या ईश्वराने लताबाईंना अगदी मुक्तहस्ताने दिल्या आहेत.

उषा मंगेशकर

# 'राणीमा'च्या आठवणी

आठवू गेले तर काहीच आठवत नाही हीच दिदीबद्दलची माझी पहिली आठवण. एखाद्या माणसाच्या आठवणी काढण्यासाठी त्याच्यापासून दूर जावे लागते. दूर राहावे लागते. दिदीपासून आम्ही कधी दूर राहिलोच नाही तर तिच्या आठवणी काढण्याचा प्रसंग कुठून येणार ?

खरे म्हटले तर अगदी लहानपणच्या आठवणींत दिदी फारशी डोकावतच नाही. ती सर्वांत थोरली बहीण. मीनाताई नंबर दोन. आशाताई नंबर तीन आणि मग मी. दिदीच्या नि माझ्या वयात बरेच अंतर असल्यामुळे तिची विशेष दोस्ती मीनाताईबरोबर असे. त्या दोघी अगदी पाठोपाठच्या. त्यामुळे त्यांचे खेळ, भातुकली, हितगुजे एकत्र चालत. मी अगदी लहान म्हणून त्या मला आपल्यात खेळायलाही घेत नसत. माझी दोस्ती आपली बाळशी–हृदयनाथशी–असे. कारण तो माझ्या पाठचा. आमचे खेळणे, भांडणे, रडणे सारे बरोबरीने चालायचे. मोठी झाल्यावर आमच्या 'सुरेल कलाकेंद्रा'चे कार्यक्रमही मी त्याच्याच सहकार्याने केले.

मला दिदीची पहिली आठवण आहे ती बाळबद्दलचीच आहे. बाळ लहानपणी दिसायला फार सुरेख होता. अगदी लहानपणचे मला आठवते ते हे की बाळ सुंदर दिसे म्हणून दिदी त्याला नाटकातले राजपुत्राचे कपडे घाली. हिरवी मखमलीची चड्डी आणि लाल मखमलीचा कोट असा पोशाख तिने त्याला चढवला की तो राजबिंडा दिसे. त्याच्याबरोबर ती मलाही राजकन्येचा पोशाख घालीत असे. मखमलीचा झगझगीत लाल फ्रॉक आणि मग जाहिरातीसाठी तयार केलेल्या उघड्या गाडीतून ती आम्हा दोघांना कौतुकाने फिरवीत असे.

आमचे बाबा मुलांना गाणे शिकवीत. त्यावेळी बाकीची सर्व भावंडे त्यांच्यासमोर बसून गात. मी मात्र कधी त्यांच्यात बसले नाही मी बाबांची खूप लाडकी होते. त्यामुळे अशा वेळी मी एकीकडे त्यांच्या मांडीवर बसे. मी बाबांच्या मांडीवर बसले आहे, ते गाणे शिकवीत आहेत आणि दिदी, मीनाताई तंबोरा धरून समोर गात आहेत हे दृश्य अजूनही मला डोळ्यांसमोर दिसते.

मला आठवते तेव्हापासून अगदी प्रारंभी आम्ही धुळ्याला होतो. वर सांगितलेल्या आठवणी

विसल्याच. नंतर आम्ही पुण्याला आलो. यावेळी मी जेमतेम चार पाच वर्षांची असेन. दिदी आणि मीनाताई भातुकलीचा खेळ खेळत. क्वचित त्या मलाही आपल्याबरोबर खेळायला घेत. अशा वेळी दिदी आम्हाला सांगे "झोपा आता. रात्र झाली." आम्ही आपल्या वेड्यासारख्या खोट्या खोट्या झोपी जायच्या. अन् मग दिदी चोर म्हणून येऊन भातुकलीच्या खेळातल्या खाऊचा चट्टामट्टा करून टाकायची.

आमच्या बाबांचा पोषाकाच्या, वर्तनाच्या साधेपणावर फार कटाक्ष असे. त्यामुळे आम्हा भावंडांचे कपडे साधे असत. दिदी तेव्हा फ्रॉक घाली. त्याच्या बाह्या मनगटांपर्यंत असत. आणि खूप दाट केसांच्या दोन लठ्ठ वेण्या तिच्या पाठीवर रुळत असत. आम्ही पावडर लावलेली बाबांना आवडत नसे. तसेच मुलींनी पान खाल्लेलेही त्यांना बिलकूल खपत नसे. पावडरची हौस भागवण्यासाठी पिठाच्या डब्यात हात घालून व तेच हात तोंडांवर फिरवून दिदी आणि मीनाताई कधी कधी चेहरे उजळ करीत.

पुढे माझे बाबा गेले आणि आमचे आयुष्य एकदम बदलले. नंतर दिदी काम करू लागली. तिचा मिष्किल, थट्टेखोर स्वभाव बदलून ती बरीचशी गंभीर झाली. तिच्या मुद्रेवरचे अखंड हसूही मावळले. तेव्हा ती खूप कामे करी. तेव्हापासून तो आतापर्यंत मी तिला सतत कष्ट करतानाच बघते आहे.

तथापि त्या दिवसांतही तिने आम्हाला परिस्थितीची झळ सहसा लागू दिली नाही. आम्ही सर्वजण कोल्हापूरला आलो. दिदी विनायकांच्या 'प्रफुल्ल' कंपनीत कामाला राहिली. स्टुडिओची गाडी येऊन सकाळी तिला घेऊन जाई. नंतर दिवसभर तेथे काम करून रात्री केव्हा तरी ती घरी परत येई. कित्येकदा ती यायच्या आतच आम्ही धाकटी मुले झोपी गेलेली असू. दिदी तेव्हा फार कष्ट करीत असली पाहिजे. घरच्या खूप अडचणी असल्या पाहिजेत. पण त्यावेळी आम्हाला, विशेषतः मला आणि बाळला हे जाणवू नये, आमच्या मनावर त्याचा विपरीत परिणाम होऊ नये म्हणून घरात सारे जण जपत. घरातले वातावरण कटाक्षाने प्रसन्न ठेवीत. जेवणखाण, कपडालत्ता कशातही आम्हाला उणीव जाणवू नये याची दिदी काळजी घेई. ती त्यावेळी नृत्याचे शास्त्रोक्त पाठ घेत होती. सुट्टीच्या दिवशी ती आम्हाला नाचून दाखवी. कधी कधी स्टुडिओतल्या गंमती सांगून, वेगवेगळ्या माणसांच्या नकला करून ती आम्हाला खूप हसवी. कोल्हापूरला तिने आम्हाला शाळेतही घातले. चार लोकांपुढे आम्ही मुलांनी दीन, केविलवाणे दिसू नये, आमचे शिक्षण व्हावे, आमच्या मनावर चांगले संस्कार व्हावेत यासाठी तिची सारखी धडपड चाललेली असायची.

पुढे विनायकराव अकस्मात वारले आणि परिस्थिती अधिकच विपरीत झाली. त्याच्या आधीच आमचे एकत्र घरही फुटले होते. विनायकांच्या 'प्रफुल्ल' कंपनीबरोबर दिदी आणि मीनाताई या मुंबईला आल्या होत्या. आणि माई व आम्ही सर्व भावंडे खानदेशात थाळनेर येथे आमच्या आजोळी जाऊन राहिलो होतो. कोवळ्या वयाच्या आपल्या दोन मुली मुंबईला परक्या माणसांत कसा दिवस काढीत असतील या कल्पनेने माई विलक्षण कासावीस होई. दिदीच्या पत्रांची ती आतुरतेने वाट पाही आणि पत्रातल्या मजकुरावरून मुंबईतल्या परिस्थितीचा अंदाज घेण्याचा ती प्रयत्न करी. दिदीची पत्रे संयमाने लिहिलेली असत. पण या दोघींना इकडे खूप त्रास होत असला पाहिजे हे त्या पत्रांतूनही जाणवल्यावाचून रहात नसे. चव्वेचाळीस साली मुंबईला स्फोट झाला त्यावेळी दिदी आणि मीनाताई मुंबईतच होत्या. आपल्या मुलींचे तिकडे काय झाले असेल या कल्पनेने माई तेव्हा अतोनात घाबरून गेली होती.

पुढे दिदीने आम्हा सर्वांना मुंबईला आणले आणि आम्ही नाना चौकात राहू लागलो. आता दिदीची कामे एकाएकी खूप वाढली. सारा दिवस ती गाण्यांचे रेकॉर्डिंग करण्यात गढलेली असे.

लता

त्यावेळी दिवसच्या दिवस असे जात की सकाळी आम्ही उठायचे तो दिदी पहाटेच उठून कामाला गेलेली असे आणि रात्री ती परत येई तोवर आम्ही गाढ झोपलेले असू. सकाळी फक्त कपभर कॉफी घेऊन ती जाई. नंतर तिचे दुपारचे खाणे, चहा सारे बाहेरच होत असे. आता ती साड्या नेसत असे. पांढरी शुभ्र साडी, पांढरा ब्लाऊज, केसांच्या दोन वेण्या, कसलेही प्रसाधन न केलेला चेहरा अशी तेव्हाची दिदी आजही डोळ्यापुढे स्पष्ट दिसते. यावेळी तिला इतकी कामं असत की कधी कधी रेकॉर्डिंग उरकून घरी परत यायला तिला पहाटेचे तीन, चार देखील वाजत.

नंतर दिदी एकदम भराभर प्रसिद्ध होऊ लागली. तिची गाणी रेडिओवर वाजू लागली. पण तिच्या या प्रसिद्धीचे खरे स्वरूप किंवा महत्त्व कळावे एवढीही समज तेव्हा आम्हाला आली नव्हती. त्यामुळे आम्हाला त्याचे काहीच विशेष वाटत नसे. तोवर आमच्या घरी रेडिओ देखील आलेला नव्हता. कित्येकदा दिदीची गाणी आम्ही लोकांकडच्या रेडिओवरच ऐकत असू.

पन्नास साली मद्रासच्या 'ज्युपिटर' कंपनीने चित्रपटासाठी दिदीची गाणी घ्यायचे ठरवले आणि रेकॉर्डिंगसाठी त्यांनी तिला मद्रासला बोलावले. दिदीला खूप आनंद झाला. ती आम्हाला म्हणाली, "आता तुम्हा सर्वांना मी मद्रासला घेऊन जाईन!" आणि आम्ही सगळीजणे मद्रासला गेलो. आम्ही सर्वांनी मिळून केलेला तो पहिलाच मोठा प्रवास. या प्रवासात आम्ही खूप मजा केली.

याच सुमारास घडलेला एक विलक्षण प्रसंग आज इतक्या वर्षांनंतरही काल घडल्यासारखा स्पष्टपणे मला आठवतो आहे. बावन्नसालची गोष्ट असेल. नागपूरकरांनी नागपूरला दिदीच्या गाण्यांचा कार्यक्रम ठरवला. कार्यक्रमासाठी दिदी, मी आणि बाळ गेलो होतो. पण नागपूरचा असह्य उन्हाळा आम्हाला बाधला की आणखी काही कारण झाले कोण जाणे, आम्हा तिघांनाही खूप ताप भरला. दिदी तर बेहोष अस्वस्थ होती. आम्हाला कार्यक्रमाला उपस्थित राहणे केवळ अशक्य होते. आमच्या दिमतीला तिथले डॉक्टर देखील होते. आणि त्यांनीही कार्यकर्त्यांना कार्यक्रम होऊ शकणार नाही असे लिहून सांगितले. पण कार्यक्रमाच्या संचालकांनी मात्र प्रेक्षकांना घाबरून की काय कुणास ठाऊक, दिदी आता येईल मग येईल असे खोटेच सांगून त्यांना थोपवून धरण्याचा प्रयत्न केला. थोड्या वेळाने प्रेक्षक खवळले. त्यांचा संताप आटोक्याबाहेर गेला. त्यांनी खुर्च्या फेकल्या, सामानाची मोडतोड केली. कार्यक्रमासाठी उभारलेल्या मांडवाला आग लावून दिली. एकच गोंधळ उडाला. आमचा दोष नसताना आमच्यावर ठपका आला. तेव्हापासून दिदी नागपूरला जात नाही.

नाना चौकात आम्ही राहत होतो तेव्हाची आणखी एक गंमत आठवते. दिदीला भरपूर पैसे मिळू लागल्यावर तिने आम्हा भावंडांसाठी खूप भारी कापड विकत आणले. आम्हा सर्वांना हर प्रकारचे कपडे शिवून कपड्यांच्याबाबतीत अगदी चंगळ करून टाकायची असा तिचा बेत होता. ते सर्व कापड तिने एका शिंप्याकडे दिले. आमच्या कपड्यांची मापे घेऊन आणि कापड घेऊन शिंपी निघून गेला, तो पुन्हा आलाच नाही! कापड गेले नि कपडेही गेले.

त्या कपड्यांची नि त्या शिंप्याची आम्ही किती दिवस आशाळभूतपणे वाट बघत होतो!

नाना चौकात राहात असताना आमची मोठी चैन म्हणजे रविवारचा सिनेमा. दर रविवारी नाना चौकातून चालत चालत आम्ही थेट 'इरॉस' पर्यंत जात असू. तेथे चित्रपट बघत असू. येताना 'पॅरिशियन डेअरी'त न चुकता नियमाने कोल्ड कॉफी घेत असू नि पुन्हा चालत चालत घरी परत येत असू. कधी कधी रात्री परत यायला आम्हाला बारा देखील वाजत. अशा वेळी आमच्या बरोबर बहुधा आमचा आतेभाऊ पंढरीनाथ कोल्हापुरे हा असे. तो खूप विनोदी असल्यामुळे सारख्या कोट्या करून तो आम्हाला हसवायचा. या आमच्या कार्यक्रमात मंगला नागेशकर ही आमची मैत्रीण, आणि दिग्दर्शक माधवराव शिंदे हेही कधी कधी भाग घेत.

एकदा दिदीच्या मनात आले, सर्व्यांनी मिळून सिंहगड बघायला जायचे. तिने दोनशे रुपये

जमवले. माधवराव शिंदांनी शंभर रुपये गोळा केले. तेवढे पैसे घेऊन आम्ही पुण्याला गेलो. पुण्यातल्या पुण्यात पायीच खूप हिंडलो. 'जीवन'मध्ये जेवलो. सिंहगडला गेलो. आणि तिथून भयंकर दमून आल्यानंतर रात्री कुठल्यातरी थिएटरमध्ये लागलेले 'सीधा रास्ता' हे चित्र पाहिले. बसमध्ये स्वेटर्स चोरीला गेली, मग रात्री एक वाजता थंडीने कुडकुडत चालत घरी परत आलो !

दारिद्र्य आणि ऐश्वर्य—जीवनाच्या या दोन्ही अवस्था आम्ही अनुभवल्या. पण आमच्या घरातले वातावरण फारसे कधी बदलल्याचे मला आठवत नाही. आमच्या घरात जेवण हा मोठा समारंभ. अशा वेळी घरी असतील त्या माणसांना पकडून बसवून घेण्याची दिदीला मोठी हौस. माझ्या बहलपासून ही परंपरा चालत आली आहे. आम्हा भावंडांचे एकत्र खाणेपिणे, थट्टामस्करी, गप्पा, हसणेखिदळणे सतत चालू असते. त्यामुळे घर गाजत राहते. आम्ही एकमेकांत खूप भांडतो देखील. पण परक्यापुढे मात्र आम्ही सारी एक असतो. नातेवाईकांपुढे देखील सतत आम्ही एकीने वागत आलो आहो. त्यामुळेच आजवर आमच्यात कोणी फूट पाडू शकले नाही, गरिबी होती तेव्हाही नाही. आताही नाही.

दिदी बाहेरच्या जगात एक अत्यंत प्रसिद्ध अशी व्यक्ती आहे. मोठी कलावंत आहे. बाहेर ती कुठेही गेली तरी सर्वत्र तिला विशेष वागणूक मिळते. पण घरात ती स्वतःचे वेगळेपण कधीही जाणवू देत नाही. थोरली बहीण म्हणूनही नाही, की मोठी कलावंत म्हणूनही नाही. घरात ती आमच्यातलीच एक सतत असते.

दिदीला शॉपिंगची भयंकर हौस आहे. त्यासाठी नाना दुकानांतून ती हिंडेल. आणि कधी दमणार म्हणून नाही. अशा वेळी मात्र मी तिला न चुकता बरोबर हवी. दिदी काय काय खरेदी करील याचा नेम नाही. साड्या, पर्फ्यूम्स, माळा, सेंट्स्, हातरुमाल, बहिणीच्या मुलांसाठी कपडे व खेळणी इथपासून तो क्रोकरी, रेकॉर्डस्, ट्रॅन्झिस्टर्स, रेडिओ इथपर्यंत सारे ती खरेदी करीत असते. लोकांना प्रेझेंटस् देण्याची तिला विलक्षण हौस आहे. घरातल्या माणसांपासून तो मित्रमैत्रिणींपर्यंत साऱ्यांचे वाढदिवस नेमके ध्यानी ठेवून त्या दिवशी त्यांना ती भेटी पाठवते. साड्यांच्या खरेदीबाबत ती अतिशय चोखंदळ आहे. पण तितकीच अनिश्चित. एक साडी घ्यायची असेल तर दुकानदाराला हजार साड्या काढायला लावील. आणि मग मला म्हणेल, "तू पसंत कर." मी साडी निवडते. गाडीत जाऊन बसेपर्यंत तिला ती साडी पसंत असते. पण मग पुन्हा म्हणते, "राणीमा, तू ही साडी परत करून ये. मला आता ही आवडत नाही."

सांगायला विसरलेच. ती मला 'राणीमा' म्हणते. बंगाली पद्धतीचे हे लाडके नाव तिने कौतुकाने मला दिले आहे.

एकदा तर दिदीने साडी पसंत केली आणि मग तिची लहर फिरली. बाळला म्हणाली, "दुकानदाराला तू नाही म्हणून सांग." बाळची पंचाईत झाली. आता शब्द कसा बदलणार ? शेवटी आशाताई मदतीला धावून आली. तिने दुकानदाराची कशी समजूत पटवली कोण जाणे ! तो प्रसंग निभावला.

जेवणात दिदी खूप चोखंदळ आहे. जेवते अगदी थोडे, पण आवडीनिवडी जास्त. मांसाहार तिला विशेष प्रिय आहे. पण वेळप्रसंगी मिरचीत कच्चे तेल ओतून त्याच्याशी भाकरी आवडीने खाईल. रेकॉर्डिंग करून घरी यायला तिला रोज दुपारचे तीनचार वाजतात. अशा वेळी जेवण थंड होऊन गेलेले असते. मग ती थोडेसे काहीतरी खाल्ल्यासारखे करते. नाहीतर दुपारच्या जेवणाला अखिभात फाटा.

दिदी सतत उद्योगात गढलेली असते. त्यामुळे गेली अनेक वर्षे घरातली सारी व्यवस्था मीच बघते. पैसा अडका, ठेवरेव करणे, आल्यागेल्याचे स्वागत करणे, जेवणाची व चहाची व्यवस्था



खाँसाहेब बड़े गुलामअली खाँ



अब्दुल वहाब



खाँसाहेब अमीर खाँ



कुन्दनलाल सैगल

पाहणे, निरोप सांगणे, फोन घेणे ही सर्व कामे आपोआपच माझ्यावर येऊन पडली आहेत. एकदा मी एखादा निर्णय घेतला तर तो सहसा घरात कोणी बदलीत नाही. दिदीसुद्धा त्यात हस्तक्षेप करीत नाही.

क्वचित्‌कदा गमत होते. कोणाला तरी फोनवर तिच्याशीच बोलायचे असते. काम अगदी क्षुल्लक असते. अशा वेळी दिदी कामात असल्यास दिदी म्हणून मीच दोन शब्द त्या माणसाशी बोलून टाकते. फोनवर आमचे आवाज वेगळे ओळखायला येत नाहीत तो माणूस खूष होतो. खोटे बोलण्याचे पाप मात्र माझ्या पदरी पडते. पण त्याला काय करायचे?

दिदीबरोबर चित्रपटातली अनेक गाणी मी गाइली आहेत. कलावत म्हणून तर ती मोठी आहेच. पण सहकारी म्हणून ती फार मदत करणारी आहे गाण्याचे मर्म समजावून देईल, अवघड जागा स्वतः गळ्यातून काढून दाखवील, शब्दोच्चार चुकत असल्यास ते दुरुस्त करील अशी ती गाताना पावलोपावली मार्गदर्शन करते. तिच्याबरोबर गाणे म्हणायची संधी मिळणे ही आनंदाची व मानाची गोष्ट आहे.

दिदीच्या संगतीत मी खूप भटकले आहे, सब महाराष्ट्र तिच्याबरोबर हिंडले आहे. कलकत्ता, दिल्ली, मद्रास, काश्मीर, कन्याकुमारी सारे तिच्याबरोबर पाहिले आहे प्रवासात जेथे जावे तेथे तिच्या अफाट प्रसिद्धीचा व अपूर्व लोकप्रियतेचा प्रत्यय येतो.

आम्हा भावंडाना दिदीने फार ममताळूपणाने वागवले आहे. आमचे खूप लाड केले आहेत स्वत च्या आधी आमचा विचार तिने सतत केला आहे. माझ्यावर ती कधीही रागावलेली नाही. मग कठोर शब्द बोलून मन दुखवणे तर दूरच. आम्ही हवा तसा खर्च करतो त्याचा जाब ती कधी विचारीत नाही. पुष्कळदा आम्ही एखाद्या वेड्या छदात पैसे घालवतो. मला आठवते, एकदा मी नि बाळ बाजारात गेलो नि हजारो रुपयांची खूप खेळणी मुलासाठी घेऊन आलो अगदी वेड्यासारखी. घरी येताना भीती वाटत होती, काय हा खर्च? आता दिदी काय म्हणेल?

दिदी काही म्हणाली नाही, नुसती हसली मात्र





उषा मंगेशकर



# सप्तस्वर

*अभिजात शास्त्रीय गायक, नामवंत संगीत दिग्दर्शक, ख्यातनाम पार्श्वगायक, कुशल वादक आणि कलाक्षेत्रातले थोर तपस्वी यांना लताबाईंच्या कलेसंबंधी विचारले असता त्यांनी उत्स्फूर्तपणे त्यांच्याविषयी जे काही सांगितले ते हे.*

## बालगंधर्व

कुमारी लता चित्रपटसंगीतातल्या आपल्या कारकीर्दीची पंचवीस वर्षे पूर्ण करीत आहे हे ऐकून आश्चर्य आणि आनंद वाटला. या क्षेत्रातली तिची कामगिरी फार मोठी आहे. वडलांनी नाट्यक्षेत्र गाजवले. मुलगी आज चित्रपटक्षेत्रात आपला जमाना गाजवीत आहे. या प्रसंगी कुमारी लता हिला माझे अनेक शुभाशीर्वाद.

## हिराबाई बडोदेकर

चित्रपटसृष्टीत लताच्या तोडीची दुसरी गायिका नाही. कोणत्या वेळी भावनेचा अचूक परिपोष करावा याची अचूक जाणीव आणि विलक्षण भावपूर्णता यामुळे तिने म्हटलेले कोणतेही गाणे हमखास जमून जाते आणि रंगते. स्वर हाच गाण्याचा प्राण असे मी मानते. लता स्वरात इतकी बुडून गेली आहे की ती काहीही गात असली तरी ते अत्यंत सुरेल आणि मधुरच लागते.

## मास्तर कृष्णराव फुलंब्रीकर

मा. दीनानाथांची कन्या या नात्याने मी कित्येक वर्षे लताबाईंना दुरून ओळखत असलो तरी त्यांच्या प्रत्यक्ष परिचयाचा योग फार उशीरा म्हणजे 'कीचकवध' या चित्रपटाच्या गाण्याच्या वेळीच आला. गाण्याचे ध्वनिमुद्रण पुण्याला होणार होते. तरीही "मास्तर कृष्णराव संगीत दिग्दर्शन करीत असतील तर मी अवश्य येईन" असे लताबाईंचे उत्तर आले व त्याप्रमाणे त्या स्वत पुण्याला आल्या. 'उपजर झाली लेक लाडकी' 'सागु कुणा श्रीकृष्णा' इत्यादी गाणी त्यानी अत्यत चापल्याने आत्मसात केली. आणि एकेका 'टेक' मध्ये त्याचे ध्वनिमुद्रणही करुन टाकले. याच चित्रपटातले 'धुद मधुमती रात रे' हे गीत मात्र मुबईला ध्वनिमुद्रित करले गेले. लताबाई दोन तीन दिवस या गाण्याची तालीम करीत होत्या. त्यातील गधाराची तान त्यानी चटकन आत्मसात केली. या गीताचे ध्वनिमुद्रण झाल्यानर "आज आपण प्रभातची आठवण करून देणारे सगीत मला दिले आणि मी ते गाईले" असे कृत मनाने त्या म्हणाल्या. लताबाईंचे ते गुणग्राहक उद्गार ऐकून मलाही मोठा आनद झाला. हातामध्ये गीताचा कागद घेतलेला, त्या कागदावर स्वत च्या खास अशा खुणानी स्वराचे बारकावे लिहिलेले, यापेक्षा आणखी कसलेही साह्य न घेता सारे स्वर गळयातून बिनचूक काढणाऱ्या लताबाईंच्या बुद्धिमत्तेबद्दल मला विलक्षण कौतुक वाटले. तसेच चाली आत्मसात करताना त्याचा जो निरलसपणा आणि परिश्रमशीलता मला दिसून आली त्यानेही मी चकित होऊन गेलो या गुणी मुलीला ईश्वर दीर्घायुष्य देवो.

## भीमसेन जोशी

'हिज मास्टर्स व्हॉइस' कपनीचे रूपजी यानी एकोणीससे बावन्न साली माझी व लताबाईंची ओळख करुन दिली. त्यावेळी चित्रपटसगीतात त्याचे नाव अद्याप आजच्यासारखे हुकमाचे पान बनले नव्हते. तरीही त्यांच्या आवाजाची अस्सल जातकुळी त्यांच्या भविष्यकालीन प्रसिद्धीची पूर्वसूचना देत होती. त्यानतर अनेक वेळा मी त्याना भेटलो दीनानाथाच्या पुण्यतिथीच्या निमित्ताने माझे गाणेही त्याच्याकडे झाले आहे

एकोणीससे बावन्नपासून मी त्याचे गाणे आवर्जून ऐकत आलो आहे अत्यत परिणामकारक गाणे म्हणण्याची त्यांची शैली खचल अजोड आहे. कोणत्याही भाषेतील गीते म्हणताना त्या भाषेला योग्य अशा प्रकारे स्वत च्या आवाजाला वळण देणे आणि त्या त्या भावानुरूप शब्दोच्चार करणे या दोन गुणानी लताबाईंच्या असाधारण लोकप्रियतेला फार मोठा हातभार लावला आहे. त्या जरी शास्त्रीय सगीत प्रत्यक्ष गात नसल्या तरी त्याच्या ज्ञानाची भक्कम बैठक त्यांच्या गाण्याला असल्याचे त्याच्या ध्वनिमुद्रित सगीतावरून जाणत्याच्या लक्षात येईल. किंबहुना त्याच्या भावगीताना व चित्रपटातील गाण्याना अनेकदा दिलेल्या चाली या शास्त्रीय सगीताची सुरावट घेऊनच अवतरत असतात त्यामुळे आज शास्त्रीय सगीतही जनसामान्यात अधिकाधिक लोकप्रिय करण्याचे श्रेय लताबाईंचेच आहे असे म्हटल्यास त्यात कसलीही अतिशयोक्ती होणार नाही.

केवळ भारतातच नव्हे तर परदेशातही लताबाईसंबधी विलक्षण आदरभाव आणि कौतुक आहे. मी काबूलला गेलो असताना प्रत्येकाने "तुम्ही लता मगेशकरला ओळखता का? आम्हाला तिचे गाणे फार आवडते" हे वेगवेगळया प्रकारे मला ऐकवले होते.

अशा या जगप्रसिद्ध कलावतीला दीर्घायुरारोग्य लाभो हीच शुभेच्छा

हा भर्तृहरीचा श्लोक म्हणत. श्लोक म्हणताना दोघेही भान हरपून बराच वेळ कुठे तरी अदृष्टात नजर लावून बसत व काही वेळाने सावध होऊन मोठमोठ्याने हसत सुटत! या दोन व्यक्तींच्या जीवनात सातत्याने एक विरक्तीची धार मिसळलेली दिसून येई देहधर्म म्हणूनच जगल्यासारखे दोघेही वागत. हीच विरक्तीची किनार लताबाईंच्या जीवनात, वर्तनात मला नेहमीच जाणवत आली आहे. ध्वनिमुद्रणाच्या वेळी देहभान विसरुन सुराशी एकरूप होणाऱ्या लताबाई काम संपताच मनस्वी कुठेतरी दूरदूर गेलेल्या वाटतात. "माझ्या मनातले संगीत व सूर हे याहीपलिकडे झेप घेणारे आहेत" असेच जणू काही त्यांना सांगायचे असते. दृश्य व श्राव्य चमत्काराच्याही पलीकडे 'तरा मी' आहे असे सांगणाऱ्या श्री रामकृष्ण परमहंसासारखे! मला वाटते, माझ्यासारख्याने शब्दांनी हे सगळे सांगण्याचा हा प्रयत्नच व्यर्थ आहे. मला एवढेच म्हणावेसे वाटते की लक्षावधी लोकांना आपल्या संगीताने भारुन टाकणाऱ्या लताबाई या त्यांच्या संगीतापेक्षाही मोठ्या आहेत.

## हरिप्रसाद चौरासिया

सिनेमाच्या धंद्यात शिरण्याआधी म्हणजे सुमारे चारपाच वर्षांपूर्वी मी कटकला रहात होतो. लताबाईंच्या ध्वनिमुद्रिका ऐकून सारखे मनात वाटत राही की अशा महान गायिकेच्या गाण्याला साथ करण्याचे भाग्य आपल्याला कधी लाभेल काय?

देवाने ही हाक ऐकली असावी. आणि चारपाच वर्षांपूर्वी मी मुंबईस आलो. लताबाईंचा परिचय झाला त्यांच्याशी अनेकदा संभाषणाचा योगही आला. आणि आज अशी परिस्थिती आली आहे की बहुशः त्यांच्या प्रत्येक गाण्याला बासरीची साथ देण्याचे भाग्य मला प्राप्त झाले आहे.

त्यांच्या संगतीत घालवलेल्या आनंदाच्या क्षणांचा मला कधीही विसर पडणार नाही. त्यांच्या लोकविलक्षण आवाजाइतकाच–किंबहुना थोडा अधिकच–मधुर असलेला त्यांचा स्वभाव माझ्या मनात कायम ठसून राहिला आहे. त्यांच्या गाण्याविषयी माझ्या मनात कायम एक प्रश्नचिन्ह असते की ही गायिका आपल्या कलेत कुठेही कधी रेसभरही कमी पडत नाही!

आमचे वाडवडील सांगायचे की लक्ष्मी आणि सरस्वती एकत्र राहत नाहीत परंतु मला विचाराल तर लताबाई ही एकच गायिका अशी आहे की जिच्यामध्ये लक्ष्मीसरस्वतीचा संगम झालेला आपल्याला दिसून येतो

अशा देवीतुल्य गायिकेकडून मला सदैव आशीर्वाद हवा आहे.

## संध्या मुकर्जी

स्वतंत्र भारताची गानकोकिळा आणि माझी प्रिय मैत्रीण कु. लता मंगेशकर हिच्या कलाजीवनाचा रौप्यमहोत्सव साजरा होत आहे. या शुभ प्रसंगी तिचे अभिनंदन करण्याची संधी मला मिळत आहे हे मी माझे मोठे भाग्य समजते. तिच्या सोनेरी स्वराने आमचे संगीतविश्व यापुढेही सतत असेच भरून राहावे. एकोणीसशे एकावन्न साली सुप्रसिद्ध संगीत दिग्दर्शक अनिल बिश्वास यांनी दिग्दर्शित केलेल्या एका हिंदी चित्रपटासाठी लताबरोबर द्वंद्वगीत गाण्याची दुर्मिळ संधी मला लाभली होती. सूर्यप्रकाशाने उजळलेली ती सुंदर सकाळ, लताची सुखद संगत आणि तिच्याबरोबर केलेली ती गाण्याची तालीम मी कधीही विसरणार नाही आम्ही दोघींनी मिळून ते

गाणे म्हटले. गाणे ध्वनिमुद्रित झाले. त्या दिवसापासून आम्हा दोघींमध्ये जो जिव्हाळा निर्माण झाला त्याचे गाढ स्नेहात पर्यवसान झाले. आजतागायत आमची ती मैत्री कायम आहे.

संगीताच्या क्षेत्रातली लता ही एक प्रतिभासंपन्न श्रेष्ठ कलाकार आहे. तिच्या या कलासेवेबद्दलची कृतज्ञता व्यक्त करण्यासाठी जगाच्या सर्व भागातून आज तिच्यावर गौरवाची फुले उधळली जावीत असे मला मन पूर्वक वाटते.

## शिवकुमार शर्मा

कलेच्या कोणत्याही क्षेत्रात प्रथम येणारे जे होतकरू लोक असतात ते आपल्या पूर्वसूरींचा आदर्श डोळ्यासमोर ठेवतात. तथापि खरा प्रतिभाशाली कलावंत केवळ इतरांच्या अनुकरणात कधीच समाधान मानीत नाही. तो नेहमी काहीतरी नवे, अभूतपूर्व आणि अद्भुत शोधण्याच्या मागे लागलेला असतो. आणि हा शोध घेताघेताच आपल्या विशिष्ट क्षेत्रात तो खास आपली स्वतःची अशी शैली निर्माण करण्यात यशस्वी होतो

लताजी या अशा प्रतिभाशाली कलावंत आहेत. चित्रपटसंगीताच्या क्षेत्रात प्रवेश केल्याबरोबर त्यांनी त्या कलेचे त्या वेळचे प्रचलित स्वरूप पार पालटून टाकले. त्यांच्या वैशिष्ट्यपूर्ण स्वराने संगीत दिग्दर्शकांच्या कल्पकतेला जसे आव्हान दिले तसे त्यांच्या विविध स्वररचनांतही चैतन्य निर्माण केले.

लताजींचा मधुर स्वर हे त्यांचे सर्वांत मोठे वैशिष्ट्य हा स्वर स्वप्नाळू आहे, ऐंद्रिय संवेदनांना जाग आणणारा आहे, भावनेने भरपूर आहे, आणि त्यात खास बायकी असा एक ढंग, कोवळीक आणि मृदुता आहे.

भारतातील सामान्य जनतेत संगीताचा प्रसार करण्याच्या कामी चित्रपटसंगीताने फार मोठा हातभार लावला आहे. आणि गेली दोन दशके लताजींच्या अननुकरणीय अशा गोड स्वराने हे चित्रपटसंगीत अक्षरशः घराघरात पोहोचवले आहे हे लताजींचे फार मोठे कार्य आहे असे मी मानतो. भारतीय चित्रपट-व्यवसाय त्याबद्दल त्यांचा सदैव ऋणी राहील

## जितूभाई प्र. मेहता

अभिजात, सुसंस्कृत गायिका असे मी लताबाईंचे वर्णन करीन आजवर त्यांनी हजारो गीते गाइली, घराघरातून संगीताला मानाचे स्थान दिले, आणि गायकांना या समाजात मोठी प्रतिष्ठा मिळवून दिली आज सर्वत्र संगीतमय वातावरण निर्माण झाले आहे, याचे श्रेय लताबाईंनाच द्यायला हवे. गेली पचवीस वर्षे त्यांचा गीतप्रवाह अखंडित वाहतो आहे. पुढेही वाहत राहील अशी गीते आणि अशी गती यांना संगीताच्या इतिहासात कुठे तोड सापडणार नाही भाषा जरा भिन्न भिन्न असल्या तरी हृदयाची, भावनांची भाषा एकच असते. लताबाईंनी अनेक भाषांतून गीते गाइली असली तरी त्या गीतांतला अंत स्रोत भावनांचाच आहे. आणि या भावनांच्या विश्वभाषेने त्यांनी साऱ्या विश्वाशी नाते जोडले आहे

## वामनराव देशपांडे

गेली पचवीस वर्षे लाखो लोकाना सांगीतिक आनद आणि सुख देण्याचे कार्य लताबाईंनी अव्याहत केले आहे ज्या चित्रपटसगीताच्या समृद्धीला त्यांनी फार मोठा हातभार लावला आहे त्याचा अभिजात सगीतावरही कसा परिणाम झाला आहे याविषयी घरदाज संगीताचा एक उपासक या नात्याने माझे काही विचार येथ थोडक्यात मान्तो

अभिजात सगीताचे मी मुख्यत दोन भाग मानतो एक 'आकृतिमूलक' (configurative) आणि दुसरा 'भावनाशील' (emotional) चित्रपटसगीताचा असर झाला आहे तो या दुसऱ्या प्रकारच्या सगीतावर हे दुसऱ्या प्रकारचे संगीत गल्या पचवीस वर्षांत अधिक सुरेल, अधिक नाजुक, अधिक आर्त, लयकारीच्या दृष्टीने अधिक सोज्ज्वार, म्हणजे एकदरीने अधिक कलात्मक आणि विशेष म्हणजे अधिक भावनाशील झाले आहे त्यामुळे भावनाशीलता अभिजाततेची प्रतिष्ठा सांभाळील किंवा नाही हा प्रश्न विवाद्य असू शकेल पण इतकी कलात्मकता आणि भावनाशीलता या अभिजात सगीतात आणली गेली याचे बव्हशी श्रेय मी श्रीमती लता मगशकर याना देईन गल्या पचवीस वर्षात वाढत्या प्रमाणावर हजारोंच्या सख्येने गाण्यास येणाऱ्या श्रोतृसमाजाचे रजन करण्यासाठी ही कलात्मक भावनाशीलता उचितच उपकारक ठरलेली आहे विधात्यानेच हे काम श्रीमती लताबाईंना नेमून दिलेले दिसते त्यांच्याशिवाय इतर कोणाकडून हे काम सहसा झालेही नसते म्हणून अतिशय कृतज्ञताबुद्धीने या शुभप्रसंगी मी त्याना धन्यवाद देतो आणि त्याना आणि त्यांच्या इतर कुटुंबियाना दीर्घायुरारोग्य चिंतितो

## विजय तेंडुलकर

# एक मुलगी गाते

एक मुलगी गाते.
रोज गाते.
एकसारखी ती गातेच आहे.
थांबत नाही.

वेळूचे बन असते ना, त्यात वेडे वारे घुटले म्हणजे कसे भणभणत, गुणगुणत, कुजबुजत आणि कधी नुसतेच घणघणत राहते—थकले, भागले,—तशी ही गात राहिली आहे असे माझ्या मनात नेहमी येते.

मध्यरात्री हळूच जाग यावी आणि हे वारे कमल्याशा ओल्या वेदनेने रडत असल्यासारखे मळभळ वाहतानाही मी एकदा ऐकले आहे.

रात्रभर मला काही केल्या झोप येत नव्हती. वाटत होते की हे वेडे वारे कोणती शहाणी, अनिवार वेदना भागवते आहे!

असाच प्रश्न मला या मुलीच्या गाण्याबद्दल पडतो. जरा कुठेशी दिवसाकाठी स्वस्थचित्त आणि स्वयंतुष्ट असावे तर या तळच्या खोलीत शुभ्र वस्त्र ल्यायलेल्या कोणी मोठ्या मोठ्या दुःखी डोळ्यांच्या जोगिणी वाऱ्यावरून तरंगत माझ्यापुढे येऊन माझी स्वयंतुष्टता जाळू लागतात.

ते तिचे स्वर असतात. वेदनेने आणि विरक्तीने भरलेले. मुबारक हैं तुम्हे खुशियां, मुझे गमसे मुहब्बत है. अरे तुझी सुखी तुला लखलाभ, मी माझ्या वेदनेवरच प्रेम करते आहे ..माझी मनी माझी वेदना.

न ऐकण्याचा अट्टाहास लटका पडतो आणि आवडायला लागते, बेचैनी दाटते.

खुशी पार धुवून जाते.

आणि ही पोर कुठे गडप झालेली असते.

ओठ डोळे कोरडे करीत रागावून विचारावेसे वाटते, बाई ग, काय साधतेस!

मला आठवण होते एकदा मध्यरात्री रडताना ऐकलेल्या त्या एकाकी, वेड्या, मळमळत्या वाऱ्याची.

ते तरी काय साधते?
ते वाहते, दशी ही गाते.
यानेच माझी समजूत पटते.
एवढ्याने सगळे संपत नाही.
कधी उगीच जरासे बेचैन, विमनस्क असावे—एकटेच. तर ही येऊन विचारील, का रडलात? सांगा ना, का? तमाही तो हमारे दिल को भायी आप क्यूं रोये? का तुमचे अश्रू? अहो बरबाद तर माझे काळीज झाले, मग सांगा तुम्ही का रडता? की हे माझेच अश्रू तुमच्या डोळ्यातून वाहताहेत? सांगा ना तुम्ही का रडता? वगैरे हा. हे आवरा, नाही तर आम्ही देखील—
प्रयास! सारा निग्रह व्यर्थ! रडवल्याशिवाय ही पोर मुळी स्वस्थ राहणारच नाही!.
सगळ्या उरल्या सुरल्या स्वास्थ्यात शोक कालवून स्वत: आपल्या हळव्या हळव्या स्वराचे उमासे काढीत कुठे तरी आली तशी चपत्त होईल!
अरे पण का? का हे?
रान आपल्या हुंदक्यांनी भारून निघून जाण्याचा वाऱ्याला काय अधिकार, पोरी?
उत्तर नसते. गाणाऱ्या वाऱ्याचे वेडे वाहणे आपले चालूच रहाते.
कधी खूप व्यग्र असावे, कामातून डोके काढण्याला क्षणाचीही उसंत नाही. मंदूत विडे असतात.
नको असताना मुरडत, ठुमकत, ठुमकत, समेसमेवर जीव घेत हिच्या छुमछुमत्या स्वराच्या नाचऱ्या गौळणी आल्याच व्यत्यय आणायला!
सखी री पीका नाम नाम न पूछो
मै पैसे बताऊ, तो कहेते न जाऊ
नको बताऊस, काही सांगूही नकोस. पण हे जीवघेणे, सगळे गद्य व्यवहार निरस्त वेडेखुळे करणारे गाणे आधी बंद कर!
ही दुनिया व्यवहारी आहे. व्यवहार गद्यच असतात. तुझ्या गुणगुणणाऱ्या स्वरांनी काही पोटे भरत नसतात! व्यवहारात माणसाने कसे शहाणे असावे लागते, वेड तुझे तुला ठीक आहे.
वाजता वाजताच सगळे वाऱ्याच्या मुठीतून हरवते.
ही निघून गेलेली असते तेव्हा आत लाजऱ्याबुजऱ्या नववधूचे लोभसवाणे, मुग्ध विभ्रम हिच्या असीट स्वरांना विखरून चौफेर मांडलेले असतात आणि भोवती परका, नकोसा वाटणारा अपरिहार्य, रुक्ष, नीरस, व्यवहारी पसारा!

मध्येच चमकून वाटते, मध्यरात्री एकदा रानातून रडत वाहत होते ते हेच धुद वारे का!
वाऱ्याचा काही नियम नाही, हेच खरे. ते मुक्त!
येईल तिथून आणि येईल तसे येईल
कधी उलट सुलट, गिरगिरते.
'ओ सजना बरखा बहार आयी'ची उल्हसित वर्दी देत ते धावत येईल आणि 'लग जा गले फिर ये हसीन रात हो न हो' ची कातर क्षणभगुरता, हुरहुर, उदासी गात जाईल
ही रम्य रात्र ही अनीट, हवीहवीशी रात्र... कुणास ठाऊक, पुन्हा येईल, न येईल पुन्हा गाठभेट पुढल्या जन्मी होईल, न होईल नको ती आश्वासने देणे, घेणे, ते फसणे, फसवणे नकोच लग जा गले जवळ ये खूप जवळ ये आताच ये
—तर असे हे वारे, गाणारे वारे. मुक्त. लहरी. बेभरवशाचे. कोवळे, हळवे, तसेच झोंबरे, दाहक. कधी निर्भर, आनंदी आणि कधी उदास, स्फुदते, गूढ. अद्भुत गधानी भारून झपाटून कधी येणारे तर केव्हा बेचैनीने नुसतेच रिते उसासणारे. घुमणारे. क्वचित वादळी, आक्रोशते, कर्कश कधी हवेहवेसे, तर केव्हा तितकेच नकोसे.
पण वारे येत राहिले आहे आणि रानाला आता त्याची जशी सवय जडली आहे. रानातले वेळू त्याची वाट पाहतात.
आणि जेव्हा ते क्वचित येत नाही ना, तेव्हा आपल्या मुक्या मुखानी सारे रान दाटून येऊन त्याला आळवीत असते
हेही मी एकदा अपरात्रीच ऐकले आहे श्वास आवरून
तसे या गाणाऱ्या वाऱ्याचे, या अप्रतिहतपणे गात राहिलेल्या मुक्तीचे आमच्या आयुष्यात झाले आहे.
कधी ती येत नाही फार गरज असते पण तिचे स्वर उमटत नाहीत
असे अगदी क्वचित होते. होते खरी
पण तेव्हा *आमच्या* आवले रान तिच्यासाठी दाटून येते आणि तिच्यासाठी तिचेच एखादे गाणे गाऊ लागते
रातकी आयेगी बरात नाहीतर, ओ, सजना बरखा बहार किंवा ते सपनोंमे अगर मेरे तुम आओ तो सो जाऊ बीती हुई वो यादे हसती हुइ आती है लहरोंके तन्हा दिलमे आती कहीं जाती है यादोंके तन्हा तुमभी आ जाओ तो सो जाऊ
सपनोमे अगर मेरे तुम आओ तो सो जाऊ
तुम आ ओ तो सो जाऊ

वर्णन करता येणार नाही. मी स्वत: प्रसंगानुकूल चाली करतो तशाच त्या प्रसंगानुकूल व अतिशय तन्मयतेने गातोही. त्यामुळे आपल्याइतक्याच तन्मयतेने व सार्थपणे आपले गाणे दुसऱ्याच्या गळ्यातून ऐकण्याचा आनंद मला क्वचितच मिळतो. तो आनंद त्या दिवशी मला मिळाला. त्याबरोबरच एक गोष्ट जाणवली की या मुलीला परमेश्वराने केवळ उत्तम गळाच नव्हे तर आगळी बुद्धिमत्ता दिली आहे. इथे काहीतरी वेगळे, आश्चर्यचकित करणारे, देदीप्यमान प्रकटले आहे. तेव्हापासून माझी दृढ धारणा आहे की लता मंगेशकर हा परमेश्वराने घडवलेला चमत्कार आहे पुन्हा घडवतो म्हणून त्यालाही तो घडवता येईलच असे नाही.

यानंतर लताने माझी पुष्कळ गाणी म्हटली. आमचा घरोबा झाला आणि त्यातूनच तिच्या स्वभावाची आणखी एक तेजस्वी बाजू अनुभवायला मिळाली

एकोणीस एप्रिल एकोणीसशे चौपन्न हा दिवस मी कधीही विसरू शकणार नाही. त्या दिव माझ्या माझ्या एकट्याच्याच नव्हे तर माझ्या अनेक मित्रांच्या आणि त्याचबरोबर आपल्या राष्ट्रीय संग्रामातील एका महान घटनेच्या दृष्टीने फार महत्त्व आहे.

पोर्तुगीजांच्या ताब्यात अनेक शतके असलेला 'दादरा नगरहवेली' हा भाग मुक्त करण्याच्या दृष्टीने महाराष्ट्रातील काही राष्ट्रवादी तरुणांनी काही गोमंतकीय देशभक्तांच्या सहकार्याने प्रयत्न सुरू केले. अनेकांनी पायी हिंडून त्या भागाची अतर्बाह्य माहिती मिळवली. नकाशे तयार केले. हल्ला कुठून करायचा, केव्हा करायचा, बरोबर कोणकोण असायचे, सामुग्री काय काय लागेल, त्या भागात प्रत्यक्ष साथ कोण कोण देतील याचा विचार व तयारी सुरू झाली. स्वातंत्र्ययुद्धात भाग घेण्याच्या कल्पनेने सारेजण बेभान झाले होते. हल्ल्यासाठी लागणारी सामुग्री मिळण्याची संभाव्य ठिकाणे हेरून तिथे सवाने बाधली गेली. अशा सामुग्रीबरोबरच कशाहीसाठी कोणावरही अवलंबून त्या भागात राहावे लागू नये म्हणून आवश्यक तेवढा पैसा हाताशी असण्याच्या दृष्टीनेही विचार सुरू झाला. मुक्तिसंग्रामाची तयारी करणारे आम्ही सर्वजण सामान्य स्थितीतील असल्यामुळे एवढ्या मोठ्या कार्यास लागणारा पैसा खर्च करण्याची शक्यता कुणालाच नव्हती.

एके दिवशी मुंबईला आम्हा कार्यकर्त्यांची बैठक भरली आणि त्यामध्ये कल्पना निघाली की हा पैसा उभारण्यासाठी एखादा गाण्याचा वा अन्य करमणुकीचा कार्यक्रम करावा. पुढे असेही ठरले की लता मंगेशकराचाच कार्यक्रम करावा. आमच्यापैकी बहुतेक जण त्या वेळी पुण्यात राहात असल्यामुळे हा कार्यक्रम पुण्यात व्हावा हेही ठरले. या कार्यक्रमाची सर्व जबाबदारी माझ्यावर टाकण्यात आली. नाना काजरेकर व राजाभाऊ वाकणकर याना बरोबर घेऊन मी लताकडे गेलो. तिला सर्व कल्पना सांगितली. आमच्यासारखी काही तरुण मंडळी स्वत:च्या प्राणावर बेतण्यासारखे साहस देशस्वातंत्र्यासाठी करायच्या तयारीने उभी राहिलेली पाहून तिचेही मन भरून आले. ज्या तत्परतेने तिने यासाठी विनामूल्य कार्यक्रम द्यायचे मान्य केले त्यातच तिचे देशप्रेम आम्हाला दिसून आले. तिने स्वत: गायचे तर ठरवलेच पण त्याबरोबरच सी. रामचंद्र व महमद रफी यानाही घेऊन येते असे सांगितले. कार्यक्रम ठरला, पण तो कशासाठी आहे म्हणून जाहीर करायचे त्यावर विचार सुरू झाला. आमच्यापैकी बहुतेक जण 'संघीय' असल्यामुळे या प्रयत्नाकडे सरकार कोणत्या दृष्टीने पाहील याची कल्पना आम्हाला नव्हती. त्यामुळे प्रत्यक्ष हल्ला चढवीपर्यंत प्रत्येक गोष्ट अतिशय गुप्त ठेवणे अवश्य होते. लता मंगेशकरचा कार्यक्रम त्या वेळेपर्यंत पुण्यात झालेला नव्हता तिच्याबरोबर महमद रफी व ललिता देऊळकर (फडके) अशी कीर्तिवंत माणसे गाणार होती प्रसिद्ध संगीतदिग्दर्शक सी. रामचंद्र याचा व माझा वाद्यवृंद होता, मीही गाणार होतो या कार्यक्रमाला प्रसिद्धी भरपूर मिळणार, उत्पन्नही चांगले होणार हे उघड होते. अशा परिस्थितीत लोकांना हा केवळ पैसे लुटण्याचा धंदा वाटू नये व सरकारलाही काही संशय येऊ नये असे काही तरी

सोयिस्कर निमित्त सागणे भाग होते. ही अडचण ध्यानात आल्याबरोबर लता चटकन म्हणाली की, एवढा विचार कशाला करायला हवा? सुधीराच्या मुलाचा वाढदिवस साजरा करण्यासाठी मीच हा कार्यक्रम करणार आहे म्हणून सागा. तिकिटांच्या ऐवजी आपण निमंत्रणपत्रिका काढू. काही झाले तरी आपण हा कार्यक्रम करायचा व त्याचे सर्व उत्पन्न आपण योजिलेल्या कार्यासाठीच खर्च करायचे. तिचा त्यावेळचा उत्साह अजून मला आठवतो. जणू काही आमच्याबरोबर तीही हातात बंदूक घेऊन लढायला येणार आहे असा तिचा आवेश होता.

अत्यंत उत्साहाने आम्ही पुण्याला आलो. दिनांक एकोणीस एप्रिल हा कार्यक्रमाचा दिवस ठरला. पृथ्वीराज कपूर यांच्यासाठी टिळकपथावरील हिराबागेत तात्पुरत्या बांधलेल्या प्रचंड प्रेक्षागृहात हा कार्यक्रम व्हायचा होता, रात्रंदिवस सारे राबत होते. तिकिटविक्री घडाक्यात चालू होती. कार्यक्रमाचा दिवस उजाडला. सी रामचंद्र पुण्याला आले. महमद रफीही आले. सी रामचंद्रांच्या वाद्यवृंदातील वादक मंडळी मुंबईहून खास मोठी बस रिझर्व करून आली. माझ्या वाद्यवृंदाच्या तालमी झाल्याच होत्या. माझे एक मित्र परशुराम आचार्य जादूचे प्रयोग करणार होते. जिवंत बाईचे कापून दोन तुकडे करून दिला ते पुन्हा होती तशी करणार होते. त्याचीही सर्व साधने आली. साऱ्या पुण्यात ज्याच्या त्याच्या तोंडी कार्यक्रमाचीच भाषा होती. विशेष म्हणजे जिच्यावर साऱ्यांची अतोनात भक्ती ती गानदेवता लता त्या दिवशी त्यांच्यासमोर साक्षात उभी राहणार होती. तिचे स्वर्गीय गाणे त्यांना प्रथमच प्रत्यक्ष ऐकायला मिळणार होते.

लता दुपारी चारपर्यंत पुण्यात यायची होती. चार झाले. साडेचार झाले. पाच झाले. आमची उत्कंठा शिगेला पोचली. साडेपाच झाले. लताबाई आल्या का असे विचारण्यासाठी माझा टेलिफोन सारखा खणखणत होता. कोणतीही मोटार घरासमोर उभी राहिली की वाटे लताच आली. साडेपाच वाजता टेलिफोन ऑपरेटरने सांगितले की कोल्हापूरचा ट्रंककॉल आहे. मला वाटले, या शुभप्रसंगी आशीर्वाद द्यायला भालजी पेंढारकर येणार असावेत आणि ते निघाले आहेत हे कळविण्यासाठी हा फोन असावा. मी फोन घेतला, दुसऱ्या टोकावरचा आवाज भालजींचाच होता. पण त्यांचे पहिले वाक्य कानावर पडताच हातातील फोन गळून पडला. कानावर विश्वास बसेना. फोन हातात घेऊन पुन्हा विचारले तेव्हा बाबा म्हणाले, "पुण्याला येत असताना लताला मोटार अपघात झाला आहे. तिला मुंबईला नेले आहे. ती सुखरूप आहे. तुझा टेलिफोन क्रमांक तिला माहीत नव्हता म्हणून तुला कळवायला तिने मला सांगितले आहे."

मी फोन ठेवला व लगेच ऑपरेटरला मुंबईला फोन जोडायला सांगितले. दहा मिनिटात फोन बसून मिळाले. फोन प्रथम लताच्या बहिणीने घेतला आणि ती म्हणाली, "लता पुण्याला येत असताना ठाणे-पनवेल यामध्ये एका पुलावरून तिची गाडी वीसपंचवीस फूट खाली कोसळली. लता, तिची मैत्रीण नलिनी आणि ड्रायव्हर असे तिघेच गाडीत होते. भरपूर मुका मार बसून ते तिघेही बचावले. मागून एक पोलीस जीप येत होती त्यांनी त्यांना सुखरूप आणले आणि ते कसेबसे मुंबईला परत घरी पोचले." बहीण हे सांगते आहे तोच लताने रिसीव्हर हातात घेतला. तिचे पहिलेच वाक्य कानावर पडले, ते ऐकून या माउलीच्या पुढे काय बोलावे तेच समजेना. तिच्या प्रकृतीविषयी मी चौकशी करायच्या आतच तिने सांगून टाकले की सुधीर, तुम्ही काही काळजी करू नका. आपला कार्यक्रम ठरल्याप्रमाणे पार पडलाच पाहिजे. मी दुसरी गाडी घेऊन लगेच निघते. कार्यक्रम रहित करण्याविषयी मी तिला सांगायचा प्रयत्न केला पण ती ऐकूनच घेईना. कार्यक्रम रहित झाल्यास तुम्हा सर्वांना फार नुकसान येईल, लोक काय वाटेल ते बोलतील, तुमचे पुढचे सगळे बेत ढासळतील, त्यापेक्षा माझे काही झाले तरी चालेल पण मी येणारच असा हट्ट तिने धरला. मी तिला कळवळीने सांगितले की आजच्या कार्यक्रमापेक्षा तुझ्या जिवाची किंमत आम्हा सर्वांना जास्त आहे,

आम्हाला कोणी दोष देणार नाही. इकडची बाजू आम्ही व्यवस्थित सांभाळू. तू काळजी करू नकोस. तिने हे सर्व ऐकून घेतले आणि पुन्हा पहिलेच वाक्य उच्चारले "मी निघते आहे. कार्यक्रम ठरल्या प्रमाणे झालाच पाहिजे." पुन्हा एकदा कळवळून, तिच्या आईवडलांची शपथ घालून मी तिला न येण्याविषयी विनवले पण तेवढ्यात फोन बंद झाला.

लतावाईंना मोटार अपघात झाल्यामुळे आजचा कार्यक्रम रहित केल्याचे व तो पुन्हा लौकरच होणार असल्याचे आम्ही जाहीर करून टाकले तिकिटाचे पैसे परत देण्याची व्यवस्था केली. सी. रामचंद्र, महमद रफी, तसेच सर्व वादक मुबईला परत गेले. प्रेक्षकांपैकी कुणी काही गडबड केली नाही. पैसे परत घेण्यासाठी शांतपणे रांगा लागल्या. आश्चर्याची गोष्ट म्हणजे बहुसख्य प्रेक्षकानी पैसे परत न घेता पुढच्या वेळी होणाऱ्या कार्यक्रमाला यायचे ठरवले. एकदर निरवानिरव होईपर्यंत रात्रीचे दहा सव्वादहा झाले. आम्ही सगळे कार्यकर्ते एकदर आढावा घेण्यासाठी माझ्या घरी जमलो. कार्यक्रमाच्या या अशा अनपेक्षित शेवटामुळे झालेल्या निराशेपेक्षा आपल्या कार्यक्रमामुळे लता बाईंना अपघात झाला याचेच दु ख सगळ्याच्या मनात जास्त होते. तशाच वातावरणात देण्याचा हिनेव चालू होता. बाहेर सगळे सामसूम होते. साधारणपणे रात्री अकराचा सुमार असावा. बाहेर एक मोटार थांबल्याचा आवाज आला. असेल कोणीतरा म्हणून तिकडे फारसे कुणी लक्ष दिले नाही. कुणा बाहेरच्याशी काही बोलण्याच्या मन स्थितीत कोणी नव्हते. पुढच्या पायऱ्यावर हल्काशा पावलाचा आवाज झाला म्हणून दाराकडे पाहिले. तो प्रत्यक्ष लता उभी. डोळ्यावर विश्वास बसेना. तिने आमच्याकडे पाहिले. आम्ही सारे दिङमूढ झालो. लता, तू कशाला बरे आलीस म्हणत मी उठून तिच्याकडे जातो तोच ती एकदम खाली कोसळली आणि बेशुद्ध झाली. तिला उचलून आत नेले. डॉक्टराना बोलावले. त्यानी उपचार सुरू केले. साधारणपणे एका तासाने ती शुद्धीवर आली. आमच्या जिवात जीव आला

माझ्या घरी येताना तिची गाडी हिराबागेवरून आली. तिची कल्पना होती की तिथे दिव्याचा झगझगाट असेल; कार्यक्रम चालू असेल. पण तिला दिसला तो गडद अधार, शुकशुकाट. हे पाहताच तिच्या मनात एकदम एकच कल्पना आली की, लोकानी बहुधा मडप जाळून टाकला असावा. नागपूर करानी मागे एकदा असाच घोर पराक्रम तिची बाजू समजावून न घता केला होता, त्याचीच पुनरावृत्ती झाली या कल्पनेने जो असह्य ताण तिच्या मनावर पडला तेच तिच्या बेशुद्धीचे कारण होते.

आम्ही सारेजण अबोल झालो. जिचा शब्द झेलण्यासाठी देशातील थोरामोठ्यात चढाओढ लागते, जिचा स्वर एकदा तरी प्रत्यक्ष कानावर पडावा म्हणून अलोट लक्ष्मी तिच्या पायावर वाहण्यात अनेकजण आपला बहुमान समजतात आणि तरीही हे भाग्य सहसा कुणाला लाभत नाही अशी परमेश्वराने तन्मयतेने तयार केलेली प्रतिभाशाली गानदेवता मोटार अपघातात सपाटून मार लागल्यावरही पुन्हा लगेच दुसरी गाडी करून येते आणि कार्यक्रम आपल्यामुळेच रहित झाला, उध्वस्त झाला या प्रामाणिक टोचणीने बेशुद्ध होते हे प्रत्यक्ष पाहिल्यावर तिच्याविषयीची कृतज्ञता कोणत्या शब्दात व्यक्त करावी तेच कळेना.

माझ्या मनात एक कल्पना आली. मी लताची समती घेतली. रात्री एकच्या सुमारास पुण्या तील सर्व वर्तमानपत्राच्या कार्यालयात टेलिफोन करून त्याचे प्रतिनिधी माझ्या घरी पाठविण्याची विनती केली. रात्री दीडला सगळे पत्रकार माझ्या घरी जमले. लताने घडलेला सर्व प्रकार त्याना सांगितला व त्याचबरोबर आजचा रहित झालेला कार्यक्रम पुन्हा दिनाक दोन मे या दिवशी होईल हेही सांगून टाकले. लताची शारीरिक दुर्दशा साऱ्यानी प्रत्यक्षच पाहिली. बोलताना तिला सारखा दम लागत होता. अशाही अवस्थेत ती कार्यक्रमासाठी पुण्याला आली याचे त्यानी सादर कौतुक केले. दुसऱ्या दिवशी पुण्यातील सर्व वर्तमानपत्रांच्या पहिल्या पानावर ठळकपणे हे सर्व छापले गेले

लता सकाळी मुंबईला परत गेली. आम्हा साऱ्यांच्या अंतःकरणावर आपला चैतन्यमय ठसा उमटवून गेली. आदल्या दिवशी कार्यक्रम रहित झाल्यामुळे निराश झालेल्यांना स्वतःच्या कर्तव्य-तत्परतेने अमाप उत्साह देऊन गेली. तिच्याविषयीच्या कृतज्ञतेने आम्हा साऱ्यांच्या डोळ्यात पाणी उभे राहिले. पुन्हा दुप्पट उत्साहाने आम्ही कामाला लागलो.

दिनांक दोन मे या दिवशी ठरल्याप्रमाणे कार्यक्रम उत्तम तऱ्हेने झाला. महंमद रफीच काय ते येऊ शकले नाहीत. बाकीचे सारे पुन्हा आले. प्रेक्षकही तुडुंब होते. कार्यक्रम छान झाला. उत्पन्नही व्यवस्थित आले. त्या पैशाचा विनियोग व्हायचा त्यासाठी झाला.

जुलैच्या दुसऱ्या पंधरवड्यात आम्ही नगरहवेलीवर चढाई सुरू केली. दिनांक दोन ऑगस्ट एकोणीसशे चौपन या दिवशी दादरा नगरहवेलीच्या राजधानीवर, ‘सेल्वासा वर आम्ही स्वतंत्र भारताचा राष्ट्रध्वज फडकावला आणि त्यानंतर मी जर कोणती गोष्ट प्रथम केली असेल तर ती म्हणजे लताला तार केली, "सेल्वासा लिबरेटेड."

या मुक्तिसंग्रामात भाग घेणाऱ्या प्रत्येकाच्या मनात स्वातंत्र्यप्राप्तीसाठी आपण केलेल्या धडपडीबरोबरच दिनांक एकोणीस एप्रिल एकोणीसशे चौपनला लताने जे दिव्य याचसाठी केले त्याचीही आठवण सतत राहील

अशी ही लता मंगेशकर. एक सर्वश्रेष्ठ पार्श्वगायिका एवढीच तिची ओळख असणाऱ्या जगाला तिच्या स्वभावातले असे तेजस्वी पैलू माहीत नाहीत. लोकोत्तर व्यक्तींच्या जीवनाची घडण ज्या अनेक प्रकारच्या गुणावगुणांनी घडत असते त्यातल्या बऱ्या न वाटणाऱ्या भागाची लगेच जाहिरात होते, परंतु त्यांच्यातला कितीतरी चांगला भाग लोकांच्यापर्यंत पोचतच नाही.

लताच्या संबंधात येणारे सारेच जण तिच्याबरोबर नेहमी सरळपणेच वागतात असे नाही. अनेकांना या ना त्या प्रकारे आपला स्वार्थ साधून घ्यायचा असतो. अनेक लोक तिच्या चांगुलपणाचा अंत पाहतात पुष्कळदा येणाऱ्या या अशा अनुभवामुळे तीही काही वेळा अकारणच कुणाविषयी तरी अपसमज करून घेते. त्याला आणखेल अशा तुटकपणाने वागते. कधी कधी असहकारही पुकारते. काही काळाने पुन्हा ती एकदम सगळे काही विसरून प्रसन्नपणे वागायला लागते. पण तेही कायम टिकते असे नाही. असा हा ऊनपावसाचा खेळ चालू असतो.

मलाही याचा अनुभव आलेला आहे. तरीही माझ्या मनात तिच्याविषयी एकच भावना आहे. आदरयुक्त प्रेमाची तिचे मी कधी वाईट चिंतले नाही ते पाप माझ्या हातून चुकूनही घडायचे नाही. ती जेव्हा माझ्याशी असहकार पुकारते तेव्हा तिने माझ्यासाठी केलेल्या अनेक गोष्टी मी आठवतो तिचा लोकोत्तर गुण आठवतो. तिची जाज्वल्य देशभक्ती आठवतो. आणि मनाशी निर्णय घेतो की तिच्यासारख्या अलौकिक व्यक्तीला हे सारे क्षम्य आहे.

चित्रपटव्यवसायात व इतरत्रही स्वतःच्या कर्तृत्वावर अगणित पैसा आणि अलोट कीर्ती मिळवलेली अनेक माणसे मी पाहिली आहेत. सर्व प्रकारच्या चैनीत आणि विलासात आयुष्य संपवण्यापलीकडे इतर कोणताही विचार त्यांच्या मनात कधी नसतो. त्यांच्याकडे पाहिले की लताचा वेगळेपणा एकदम उठून दिसतो.

या देशात कुणाला कधी लाभली नाही अशी शुक्ल पक्षातील चंद्राप्रमाणे सतत वाढत जाणारी अपरंपार जागतिक कीर्ती आणि त्याबरोबरच अमाप पैसा केवळ स्वतःच्या गुणाने मिळवून सुद्धा ती आपल्या देशाला, धर्माला, समाजाला कधी विसरत नाही, इतकेच नव्हे तर त्यासाठी यथोचित त्याग करायलाही मागेपुढे पहात नाही.

लता मंगेशकर ही केवळ एक व्यक्ती नसून अशी एक दिव्य शक्ती आहे की जिने आपले स्वतःचेच नव्हे तर साऱ्या देशाचे नाव जगाच्या इतिहासात अमर करून ठेवले आहे.

कुमार गंधर्व

# अभिजात कलावती

कितीतरी वर्षांपूर्वीची गोष्ट. मी तेव्हा आजारी होतो. त्या आजारात एके दिवशी सहज मी रेडिओ लावला आणि अचानक एक विलक्षण सूर माझ्या कानी पडला. तो सूर ऐकल्याबरोबर हे काहीतरी विशेष आहे, नेहमीचे नव्हे असे तत्काळ मला जाणवले. तो सूर माझ्या काळजातच भिडला. मी हैराण होऊन गेलो. हा कुणाचा सूर मला काही कळेचना. मी अगदी तन्मयतेने ऐकत राहिलो. गाणे संपल्यावर गायिकेचे नाव रेडिओवरून सांगितले गेले, 'लता मंगेशकर'. नाव ऐकून मी चकित झालो. पण त्याबरोबरच मनातल्या मनात एक संगती लागल्यासारखे वाटले. सुप्रसिद्ध गायक दीनानाथ मंगेशकर यांची अजब गायकी त्यांच्याच कन्येच्या कोमल कंठातून एका वेगळ्या रूपात मी ऐकत होतो.

मला वाटते, 'बरसात' चित्रपटाच्याही आधीच्या कोणत्या तरी चित्रपटातले ते लताचे गाणे होते. तेव्हापासून लता सारखी गातेच आहे आणि मी तिचे गाणे ऐकतो आहे. लताच्या आधी नूरजहाँ या प्रसिद्ध गायिकेने चित्रपटसंगीताचा एक जमाना गाजवला होता. पण त्याच क्षेत्रात तिच्या नंतर आलेली लता तिच्यापेक्षा कितीतरी पुढे गेली आहे. कलेच्या क्षेत्रात कधी कधी असे चमत्कार घडून येतात. आजचे नामवंत सतारिये विलायतखाँ हे आपल्या सतारवादक पित्यापेक्षा कितीतरी मोठे झाले आहेत. त्यातलाच हा प्रकार म्हणावयाचा.

स्वरज्ञान वाढले आहे. तशीच सुरेलपणाची चांगली समजही त्यांना आली आहे. लयींचेही निरनिराळे प्रकार त्यांना समजू लागले आहेत आणि आकारयुक्त लयीची त्यांना जाणीव झाली आहे. सर्वसामान्य लोकानाही त्यातील सूक्ष्मता कळू लागली आहे. हे सारे कर्तृत्व लताचेच आहे. अशा रीतीने नव्या पिढीचे गाणे तिने संस्कारित केले आहे आणि सामान्य माणसाची संगीतविषयक अभिरुची घडविण्यात तिने फार मोठा हातभार लावला आहे. एकंदरीतच संगीताच्या लोकप्रियतेचे, त्याच्या वाढत्या प्रसाराचे आणि तद्विषयक अभिरुचीच्या विकासाचे श्रेय लतालाच द्यावयास हवे.

आज सर्वसामान्य माणसाला लताची एखादी ध्वनिमुद्रिका आणि शास्त्रीय गायकाची एखादी ध्वनिमुद्रिका ऐकवली तर तो लताचीच ध्वनिमुद्रिका परत करून घेऊन जाईल. या माणसाला राग कोणता, ताल कुठला हा शास्त्रीय तपशील सहसा माहीत नसतो. राग मालकंस आहे की ताल निताल आहे याच्याशी त्याला कर्तव्यही नसते. त्याला हवा असतो, जाणवतो आणि धुंद करतो तो गाण्याचा गोडवा. स्वराचे माधुर्य. आणि हे स्वाभाविकच आहे. कारण माणसात जशी माणुसकी तसे गाण्यात 'गाणेपण' हवे. आणि लताचे कुठलेही गाणे घेतले तरी त्यात हे गाणेपण अगदी शंभर टक्के सापडते.

हे प्रभावी गाणेपण हेच लताच्या लोकप्रियतेचे मुख्य मर्म आहे. लताच्या गाण्याचे आणखी एक वैशिष्ट्य म्हणजे तिच्या स्वराचा निर्मळपणा आणि निरागसपणा. तिच्या आधीची पार्श्वगायिका नूरजहाँ ही देखील एक चांगली गायिका आहे यात शंका नाही. तथापि तिच्या स्वरात मादक उत्तानपणा असे. उलट लताच्या स्वरात कोवळीक आणि मुग्धपणा आहे. लताचा जीवनाकडे पाहण्याचा जो दृष्टिकोन आहे तोच तिच्या गाण्यातल्या या निर्मळपणात प्रतिबिंबित झाला आहे असे जाणवते. संगीतदिग्दर्शकांनी मात्र तिच्या स्वरातील या निरागसतेचा घ्यावा तितका उपयोग करून घेतलेला दिसत नाही. मी स्वतः संगीतदिग्दर्शक असतो तर लताला मुक्तपणे फुलवून सोडले असते असे नमूद केल्यावाचून राहावत नाही.

लताच्या गाण्याचे आणखी एक वैशिष्ट्य म्हणजे तिचे नादमय उच्चार. तिच्या गीतामधे दोन शब्दातले अंतर स्वराची आस ठेवून फार सुंदर रीतीने भरून काढलेले असते. जणू ते दोन्ही शब्द निमुळते होऊन एकमेकात मिसळतात. सलग एकजीव होतात. ही गोष्ट फार अवघड आहे. पण लताच्या बाबतीत ती अत्यंत सहज आणि स्वाभाविक होऊन बसली आहे.

लताच्या गाण्यात शोकभावना विशेष प्रभावी रीतीने व्यक्त होते असे मानले जाते. पण मला स्वतःला ते पटत नाही. शोकरसाला लताने तितकासा न्याय दिलेला नाही असे माझे स्वतःचे मत आहे. उलट मध्य किंवा द्रुत लयीतली मुग्ध शृंगाराची अभिव्यक्ती करणारी उल्लसित गाणी लताने फार उत्कटपणे गायिली आहेत. माझ्या दृष्टीने तिच्या गाण्यात आणखी एक उणीव आहे. तथापि त्यात लताचा दोष किती आणि संगीतदिग्दर्शकाचा दोष किती हे सांगणे अवघड आहे. लताचे गाणे सामान्यतः उंच पट्टीत असते. त्यात संगीतदिग्दर्शक तिला अधिकाधिक उंच पट्टीत गायला सांगतात आणि तिला निष्कारण चिलावायला लावतात. मग त्या गाण्यात अकारणच थोडा कर्कशपणा येतो. त्यामुळे हल्ली लताच्या स्वरातली मूळची गोलाई जाऊन त्यात थोडा चिडचिडेपणा आला आहे असे मला वाटते. ती गाणी ऐकताना आपल्यालाही अस्वस्थ व्हायला होते. कपड्यात नकळत कुसे गेली म्हणजे व्हावे तसे. एक उदाहरण देऊन हा मुद्दा अधिक स्पष्ट करतो. शमशाद बेगमची 'हिम्मत' चित्रपटातली प्रारंभीची गाणी आणि अधिकाधिक उंच पट्टीत गाण्याच्या हव्यासाने तिने गायिलेली नंतरची गाणी यांची तुलना करून पाहिली म्हणजे मला काय म्हणावयाचे आहे त्याचा प्रत्यय येईल.

शास्त्रीय संगीतात लताचे स्थान कोणते असा एक प्रश्न उपस्थित केला जातो. माझ्या मते हा प्रश्नच आधी अप्रयोजक आहे. त्याचे कारण असे की शास्त्रीय संगीत आणि चित्रपटसंगीत या

दाद्रामचे तुल्नाच होऊ शक्त नाही गाभीर्य, सथपणा हा शास्त्रीय सगीताचा स्थायीभाव आह तर जल्द लय, चापल्य हा चित्रपटसंगीताचा प्रमुख गुणधर्म आहे चित्रपटसगीतातला ताल हा प्राथमिक अवस्थतला ताल असतो तर शास्त्रीय संगीतात ताल परिष्कृत स्वरूपात आढळतो चित्रपट सगीतात अर्धतालाचा उपयोग केला जातो त्याची लयकारी फार वेगळी असते सोपी असते तेथ गतीला आणि आघाताला महत्त्व आह आणि सुल्भता, लवचिकपणा या गोष्टींना तर तेथे अग्रस्थान दिले जाते

तथापि चित्रपटसगीत गाणाराला शास्त्रीय सगीताची उत्तम जाणकारी असणे आवश्यक आहे ही ब्वाजवळ नि सशय आहे तीन साडेतीन मिनिटाच्या अवधीत गायिलेले चित्रपटातले तिचे एखादे गीत आणि एखाद्या खानदानी शास्त्रीय गायकाची तीन साडेतीन तासाची मैफल या दोहाचे कलात्मक आणि आनदात्मक मूल्य सारखेच आहे असे मी मानतो एखादा विस्तृत लेख जीवनातील रहस्य विशद करात असता पण तेच रहस्य एखाद्या छोट्या सुभाषितात किंवा एखाद्या चिमुकल्या म्हणीतही सुदरपणे आणि परिपूर्णतेने प्रकट झालेले दिसते त्याचप्रमाणे तीन तासाच्या रगलेल्या मैफिलीतला गाण्याचा सारा रस त्ताच्या तीन मिनिटाच्या तबकडीवरील गाण्यातूनही पुरेपूर रीतीने आस्वादता येतो. तिचे एकक गाणे ही एक सपूर्ण कलाकृती असते स्वरलयशब्दाथाचा तेथ एक मनोज्ञ मेळ झालेला असतो आणि मैफलीची वेहोषीही त्यात सामावलेली असते तसे पाहिले तर शास्त्रीय गाणे काय किंवा चित्रपटातले गाणे काय, शेवटी रसिकाला आनद देण्याचे सामर्थ्य त्यात किती आहे यावरच त्याचे महत्त्व ठरवणे अवश्य आहे मी तर अस म्हणेन की शास्त्रीय गाणे देखील, रजकता त्यात नसेल तर अगदी नीरस ठरेल अनाकर्षक वाटेल आणि त्यात मोठीच उणीव उत्पन्न होइल गाण्याला गाणेपण येते ते केवळ शास्त्रीय वैठकीच्या पक्कपणामुळे नव्हे का तालसुराच्या निर्दोष ज्ञाना नेही न हे गाण्याचा सारा गोडवा, सारे सामर्थ्य त्याच्या रजकतेवर मुख्यत अवलबून आहे आणि रजकतच मम रसिकापुढे गाणे कसे सादर केले जात, कशा रीतीने त्याची माडणी कली जाते आणि श्रोत्याशी कसा सुसवाद साधला जातो यात सामावलेले आहे माणसाचा हाडाचा सागाडा आणि एखाद्या प्रतिभाशाली कलावताने त्याच माणसाचे केलेले पेंटिंग या दोहोत जो फरक असतो तोच गाण्याचे शास्त्रीय ज्ञान आणि त्याची स्वराच्या द्वारा कली जाणारी सुसगत अभिव्यक्ती यातही असतो तथापि आमचे अनेक शास्त्रीय गायक केवळ आपल्या शास्त्रीय ज्ञानाचा, तालसुराच्या पक्के पणाचा अभिमान बाळगतात आणि त्यातच ते धन्यता मानून राहतात रागाचे स्वर, त्याचे आरोह अवरोह आणि तानाची आवर्तने याच्या निव्वळ कसरतीतून राग उभा करता येत नाही हे ही मडळी विसरतात रजकता हा एक गाण्याचा महत्त्वाचा घटक आहे इकड दुलक्ष करून आपल्या भारदस्त शास्त्र शुद्ध वजनदार गायकीचेच कौतुक करणाऱ्या आणि परपरागत समजुतींना दुराग्रहाने कवटाळून बसणाऱ्या या खानदानी शास्त्रीय गायकानी लताच्या कलागुणांची कदर केली नाही तर त्यात खेद मानण्याचे कारण नाही कारण या मडळींना सगीताचे ममच कळले नाही अस मी निस्सकोचपणे म्हणेन शास्त्रीय गायकी म्हणजेच काय त संगीत असा आग्रह धरणाऱ्या या लोकानी गझल, दुमऱ्या, भजने यासारख्या इतर गायनप्रकाराची आजवर उपेक्षा केली आहे आपल्या रसिकतेला शास्त्रीय नियमाच्या चौकटीत बदिस्त करणारे हे लोक कवळ आरोह अवरोह घोकीत बसतात शास्त्रचर्चेच्या ठराविक आवर्तात भ्रमवात आणि गाण्याच्या खऱ्या आनदाला ते पारखे होतात अशा लोकानी चित्रपटसंगीताकडे तुच्छतेने पाहून जर नाक मुरडले तर त्याचा निषध ध्यानीही घेण्याचे कारण नाही असे मी म्हणेन गझल दुमऱ्या गाणाऱ्या बेगम अख्तरसारख्या अव्वल दर्जाच्या गायिकेला सगीताच्या क्षेत्रात मानाचे पान द्यावेच लागले तीच गोष्ट लताच्याही बाबतीत याना करावी लागणार आहे सगीताच्या क्षेत्रात लताचे स्थान एखाद्या अव्वल दर्जाच्या खानदानी गायकाइतकेच मानावे लागेल लता तीन तासाची मैफल

गाऊ शकेल का असा प्रश्न विचारणाऱ्या या संशयात्म्यांना मलाही एक प्रश्न विचारावासा वाटतो. तो असा की एखादा पहिल्या श्रेणीचा गायक लताप्रमाणे तीन मिनिटांच्या अवधीत चित्रपटातले एखादे गाणे तिच्याच कौशल्याने आणि तिच्याच रसोत्कटतेने गाऊ शकेल का? गाऊ शकणार नाही हे त्या प्रश्नाचे उत्तर त्यांना द्यावे लागेल.

खानदानी गायकांचा असाही एक दावा आहे की चित्रपटसंगीतामुळे लोकांची अभिरुची बिघडली आहे. थोडक्यात या संगीतावर त्याने 'कान बिगाड दिये' असा आक्षेप घेतला जातो. पण मी म्हणतो चित्रपटसंगीताने लोकांचे कान बिघडवले नाहीत. ते सुधारले आहेत हे माझे मत सुरुवातीलाच तपशीलवार मांडलेले असल्याने इथे त्याची पुनरुक्ती करीत नाही.

खरी गोष्ट अशी आहे की आपले शास्त्रीय गायक हे फार आत्मसंतुष्ट वृत्तीचे आहेत. संगीताच्या क्षेत्रात यांनी स्वतःची मिरासदारी स्थापन केली आहे. शास्त्रशुद्धतेच्या कर्मकांडाला त्यांनी यात्रीपेक्षा अधिक महत्त्व दिले आहे आणि पूर्वी आपल्याकडे जसे धार्मिक चातुर्वर्ण्य असे त्याप्रमाणे कलेच्या क्षेत्रातही एक कडक चातुर्वर्ण्य त्यांनी प्रस्थापित केले आहे. तथापि आपण काहीही गावे आणि ते गाणे कितीही रुक्ष, नीरस असले तरी त्यातील विद्वत्तेच्या जोरावर सामान्य लोकांना गुरकावणे ही जी त्यांची प्रवृत्ती होती तिला आता चित्रपटसंगीताने जोरदार हादरा दिला आहे. शास्त्रीय संगीताची मिरासदारी आता संपुष्टात आली आहे. यापुढे या मंडळींची संगीतक्षेत्रातली ही पंडेगिरी चालणार नाही. कारण चित्रपटसंगीतामुळे लोकांची अभिजात संगीताशीही तोंडओळख होऊ लागली आहे. त्यांची चौकस वृत्ती आणि चिकित्सकता आता वाढली आहे. केवळ शास्त्रशुद्ध पण नीरस गाणे त्यांना आता नको आहे, तर सुरेल आणि भावपूर्ण गाणे हवे आहे. ही क्रांती चित्रपटसंगीतानेच घडवून आणली आहे. समाजाच्या संगीतविषयक अभिरुचीलाच चित्रपटसंगीताने असे एक प्रभावी वळण लावले आहे की या संगीताची वाढती लोकप्रियता ध्यानी घेऊन शास्त्रीय गायकांनीही आपल्या गायकीत आणि गाण्याच्या एकंदर मांडणीत बदल करण्याची वेळ आली आहे. संगीतातले उच्चनीच भेदभाव व्यक्त करणाऱ्या गायनक्षेत्रातल्या जातिभेदांना यापुढे तेथे वाव उरणार नाही.

चित्रपटसंगीताचा लवचिकपणा हे त्याचे आणखी एक मोठे सामर्थ्य आहे असे मी मानतो. तेथील गृहीतकृत्ये, त्याच्या मर्यादा, सोयीगैरसोयी सारे काही वेगळे आहे. चित्रपटसंगीताचे तंत्रच मुळी निराळे आहे. येथे नवनिर्मितीला खूप वाव आहे. शास्त्रीय रागदारीचा जसा चित्रपटातील संगीतदिग्दर्शकांनी उपयोग करून घेतलेला आढळतो त्याप्रमाणेच राजस्थान, पंजाब, बंगाल इत्यादी ठिकाणी असलेले प्रांतोप्रांतीचे लोकगीतांचे भांडारही या गाण्यासाठी त्यांनी खूप खुले केलेले आपल्या ध्यानी येते. उत्साहाचे कौतुक करणारी पंजाबी लोकगीते, रुक्ष आणि निर्जल राजस्थानमधली पर्जन्याची आठवण करणारी गीते, दऱ्याखोऱ्यात घुमणारी पहाडी गीते तशीच ऋतुचक्राचे फेरे नादवणारी व शेतीवरील विविध कामांचा आढावा घेणारी ऋतुगीते व कृषिगीते, व्रजभूमीत रुजलेले सहज मधुर संगीत या सर्वांचा अतिशय मार्मिक व रसानुकूल उपयोग चित्रपटक्षेत्रातल्या प्रतिभाशाली संगीतदिग्दर्शकांनी करून घेतला आहे आणि यापुढेही तसा ते करीत राहतील. एकंदरीने संगीताचे क्षेत्रच अफाट आहे. तेथ अजून अलक्षित, असंशोधित आणि अदृष्टपूर्व असा खूप मोठा प्रांत आहे. तथापि याचा उपयोग चित्रपटातील लोक जेवढ्या कसोशीने करून घेत आहेत तेवढेच आमचे कर्मठ शास्त्रीय गायक तिकडे दुर्लक्ष करीत आहेत. यामुळे चित्रपटसंगीत हे दिवसेंदिवस अधिकाधिक विकास पावत जाईल. त्याच्या कक्षा रुंदावत जातील आणि त्याची लोकप्रियताही सतत वर्धिष्णू राहील.

अशा या चित्रपटसंगीताच्या क्षेत्रात लता ही आजची अनभिषिक्त सम्राज्ञी आहे. इतरही अनेक पार्श्वगायक, पार्श्वगायिका आहेत पण लताची लोकप्रियता या साऱ्याहून कितीतरी पटीने

एता

अधिक आहे. लोकप्रियतेच्या शिखरावरचे तिचे स्थान अढळ आहे. गेली पंचवीस वर्षे ती गात आहे आणि तरीही तिची लोकप्रियता अबाधित राहिली आहे. पार्श्वगायक जनमनावर सतत प्रभुत्व गाजविणे ही गोष्ट सोपी नाही. फार काय एक रागही सतत टिकत नाही. दुर्गा, नंद यासारखे राग पूर्वी वारंवार मैफलीत गाईले जात असत. आज त्यांची लोकप्रियता ओसरली आहे. बालगंधर्वांसारखा गायक महाराष्ट्रात लोकप्रियतेची परिसीमा गाठून गेला. पण महाराष्ट्राबाहेरच्या प्रांतात बालगंधर्वांची जादू जागली नाही. असे असता लतासारखी गायिका पंचवीस वर्षे सतत गात राहते, भारताच्या कानाकोपऱ्यापर्यंत तिचे गाणे जाऊन पोहोचते, भारतातच नव्हे तर भारताबाहेरच्या अनेक देशात, आफ्रिका, मध्य आशियासारख्या दूरच्या जागी देखील तिची गाणी ऐकून लोक वेडे होतात हा काय चमत्कार आहे? पण हा चमत्कार आपण प्रत्यक्ष बघत आहोत. इतर देशात अशी गायिका जन्माला आली असती तर तिचा केवढा उदोउदो झाला असता. लोकांनी तिला डोक्यावर घेतले असते. शासनसंस्थेने तिच्यावर मानसन्मानाचा वर्षाव केला असता. पण आपल्याकडचे तथाकथित विद्वान आणि सरकार ह्यांनी तिची कदर करावी तशी केली नाही. न करोत. सामान्य लोक लताच्या गाण्यावर विलक्षण प्रेम करतात!

वडिलांकडून लाभलेले स्वरवैभव सगोपून लताने आपल्या बुद्धिमत्तेने आणि परिश्रमाने त्याला अधिक कसदार, संपन्न, समृद्ध केले आहे. वडिलांच्या अकाली निधनामुळे अंगावर पडलेली कुटुंबाची जबाबदारी, एकाकीपणाने मार्ग काढताना अंगाने आलेले बरेवाईट अनुभव यांनीही लताच्या गाण्याला एक वेगळे परिमाण दिले आहे. हे परिमाण जीवनविषयक जाणिवेचे, आयुष्याच्या खोल समजाचे आहे. हे गुण जसजसे व्यक्तित्वात बाणत गेले तसे त्यांनी लताचे गाणेही प्रौढ केले.

असा कलाकार शतकाशतकातून एखादाच निर्माण होतो तो आज आपल्यामध्ये, आपल्या डोळ्यासमोर वावरताना आपण बघत आहोत हे आपले केवढे भाग्य!



समोर बसून लता रियाझ करू लागली. तिची प्रगती अजमावण्यासाठी विनायकांनी तिला चित्रपटातून गायला लावले. कंपनीचा वाढदिवस, नाट्यमहोत्सव, अशा प्रसंगी लताचे गाणे हमखास होई. अशा प्रसंगी होणाऱ्या लताच्या गाण्याची पुढे पुढे आम्हाला इतकी सवय लागली होती की मी विनायकांना म्हणत असे, "कार्यक्रम दोन तासांचा करा आमच्याकडे साऊंड भरपूर आहे." लताला ही सिनेमाची परिभाषा फार आवडे. मला आठवते, विनायक जेव्हा लताला एखादे गाणे देत तेव्हा आज तिच्या दारात घुटमळणारे कित्येक निर्माते "काय फाजील कौतुक चालल्य!" असा आरोप करीत असत. आपले कौतुक फाजील नसून वाजवी होते हे आज तिने सिद्ध करून दाखविले आहे. ह्या यशाला तिचे श्रमही कारणीभूत आहेत. लतासंबंधी बोलताना महाराष्ट्राचे सुप्रसिद्ध गायक निवृत्तिबुवा सरनाईक म्हणाले होते, "लता मोठी झाली, कारण मोठी होण्यासाठीच ती जन्मली आहे."

मी आणि लता विनायकांच्या घरीही बरोबरच राहिलेले आहोत. मी तेव्हा पाहिले आहे, कोणाचे गाणे होवो, लताने त्यावरहुकूम गाणे म्हटलेच नवी रेकॉर्ड पसत पडा, ती पार झिजेपर्यंत तिने लावलीच. घरात रेडिओ चालू असायचाच. इतरांना त्रास होऊ नये म्हणून अगदी बारीक ठेवून चहा पिताना, वेणीफणी करताना लताचे कान रेडिओला चिकटलेले असायचे.

तिचे रेडिओचे हे व्यसन आजही चालू आहे मी एकदा तिला म्हटले, "खरच लता, उद्या तुझ्या आयुष्यावर कोणी चित्रपट काढला तर त्याला रेडिओचेच पार्श्वसंगीत ठेवावे लागेल "

ती म्हणाली, "कदाचित प्लेबॅकसाठी मलाच बोलावतील!"

लताच्या यशाचे रहस्यही यातच असावे. फुलपाखरू जसा फुलाफुलातून मध गोळा करते त्याप्रमाणे लता संगीताचा मधुगंध कोठे शोधील याचा नेम नाही. अगदी बालवयापासून कंपनीतील संगीतदिग्दर्शक, गायक हे तिचे जानी दोस्त असायचे. मराठी गीतांच्या तालमी सुरू झाल्या की विनायकांचे शब्द ती मोठ्या श्रद्धेने श्रवण करी विनायक संगीतदिग्दर्शकांना सांगत, "जसा शब्दांना अर्थ असतो, तसा सुरानाही अर्थ हवा, भावना हवी, नव्हे रंगसुद्धा हवा "

विनायकांच्या या मार्गदर्शनाचा तिच्यावर एवढा परिणाम झाला आहे की पडद्यावरील गाण्यातून सोडाच, ग्रामोफोनच्या तबकड्यावरसुद्धा भावनांचे केवढे मनोज्ञ विलास ती प्रकट करू शकते ती कधी कधी फार भावनाविवश होते. "कल्पवृक्ष कन्येसाठी लावुनिया बाबा गेला" हे पद गाताना तिच्या डोळ्यातून सारखी धार लागलेली होती. "हे गाणे पुन्हा घेऊ या का?" असे वसंत प्रभूंनी तिला विचारले तेव्हा आपल्या तळहातात तोंड लपवून ती म्हणाली, "मी गाऊ शकणार नाही तोंड उघडले तर रडेन मी!"

मराठीप्रमाणेच इतर भाषातील गीते गाताना आपल्याला सहज रीतीने भावना प्रकट करता याव्यात यासाठी पहिल्यापासूनच ती खूप परिश्रम घेत होती त्या दृष्टीने नूरजहाँ ही तिची आवडती गायिका होती. 'बडी माँ' चित्रपटाच्या वेळी जेव्हा त्या दोघी एकत्र आल्या तेव्हा दोघींची जुगलबंदी होत असे ती अगदी ऐकण्यासारखी होती मराठी गाणी नूरजहाँ ज्या उत्सुकतेने ऐकत असे, त्याच उत्सुकतेने लता तिची उर्दू शायरी आत्मसात करायची. ह्या अभ्यासूपणाला उद्देशूनच नूरजहाँ म्हणाली, "लता बडी होशियार लडकी है. एक दिन वह अपना नाम जरूर रोशन करेगी!"

विनायकांच्या मृत्यूनंतर पुन्हा दुर्दैव लताच्या पाठीशी लागले. पण दुर्दैवानूनच सुदैव जन्माला येत असते ही तिची श्रद्धा आहे तिच्याच नव्हे तर आमच्याही अज्ञातवासाने एक गोष्ट ठीक झाली. ती म्हणजे लता आणि आम्ही खऱ्या अर्थाने जवळ आलो. सुखाच्या वेळी सारेच दोस्त असतात. त्याची पारख होते अडचणींच्या वेळी मला कृतज्ञतापूर्वक मान्य केले पाहिजे, माझ्या अनेक आणीबाणीच्या वेळी लताने मला धीर दिला आहे—नुसत्या शब्दाने नव्हे, अर्थाने! विनायकांच्या मृत्यूनंतर बरेच दिवस आमच्या चित्रपटाचे कोठे जमेना तेव्हा तिने एकदा विचारले "काय हो, तुमचं अडलंय कशानं?"

"सगळं तयार आहे पण वितरक म्हणतात गाणी ऐकवा."—मी म्हणालो.

"मग ऐकवा ना" लता सहज बोलून गेली. जणू काय मी गाणार होतो आणि तेव्हाचे माझे भागीदार माधव शिंदे तबला वाजवणार होते! सगळी परिस्थिती लताच्या लक्षात आली. गाणी ऐकवायची म्हणजे संगीत दिग्दर्शक आला, गायक-गायिका आले, वादक आले आणि मुख्य म्हणजे पैसे आले! ती म्हणाली, "आणा इकडे तुमची गाणी. मी संगीत देते तुम्हाला." देव पावल्याचा आनंद आम्हाला झाला. आपल्या कामाचा रोजचा व्याप सांभाळून लताने पंधरा दिवसात चाली लावण्यापासून तो ध्वनिमुद्रण करण्यापर्यंत साऱ्या गोष्टी जातीने पुऱ्या करून टाकल्या. 'रामराम पाव्हणं' या चित्रपटाची संगीतदिग्दर्शिका लता मंगेशकर आहे. आणि ते चित्र महोत्सवी ठरले याचे अर्धेअधिक श्रेयही लताचेच आहे. लताचे सहकार्य नसते तर मी निर्मातादिग्दर्शक झालो असतो की नाही हे सांगणे कठीण आहे. आजपर्यंत इतक्या अकृत्रिम आत्मीयतेने तिचे हे सहकार्य मला लाभते आहे की लता आहे म्हणूनच माझी चित्रपटाची सेवाही आहे अशी माझी भावना आहे. आमची 'वादळ' 'कांचनगंगा' ही चित्रे भागीदारीत निर्माण झाली. त्यानंतर मात्र महाराष्ट्रीय चित्र-व्यवसायाच्या दृष्टीने काही महत्त्वाची कामगिरी तिला पार पाडावी लागली म्हणूनच आमची भागीदारी काही काळ थांबली. पण आजही तिचे सहकार्य मला लाभते. मलाच नव्हे, तिच्या जवळच्या साऱ्याच माणसांना, संस्थांना तिचे सहकार्य अखंडित चालू आहे. माझ्यावर तर तिचे अनंत उपकार आहेत. अव्यवहारीपणाने मी एका फौजदारी खटल्यात गुंतलो असताना ती माझ्याकरिता वीस हजारांना जामीन राहिली होती! प्रत्यक्ष न्यायदेवताच माझ्या निरपराधीपणाची ग्वाही द्यायला अवतरली होती.

अशाच न्यायनिष्ठेने आणि सहानुभूतीने हरेक प्रांतीय आणि राष्ट्रीय कार्याला तिने मदत केलेली आहे. मराठीच्या राजधानीत मराठी चित्रपटासाठी एकही थिएटर असू नये ह्याची तिच्या मनाला अपार वेदना होते. ती म्हणते, "मिरासदारांची भर करण्यापेक्षा महाराष्ट्र सरकार थिएटर बांधून देण्याच्या दृष्टीने प्रयत्न करील तर ते मराठीवर खरे उपकार होतील!" असाच विषय चालला असताना एक थिएटर मालक तिला म्हणाले, "तुम्हीच का नाही थिएटर बांधत?" लताने एवढेच उत्तर दिले, 'आपले आशीर्वाद खरे ठरतील तर तो मी माझ्या आयुष्यातील सुदिन समजेन."

मराठी आणि महाराष्ट्र याबाबतच्या लताच्या प्रेमाची कल्पना शब्दातून सांगणे अशक्यच आहे. महाराष्ट्रधर्म हा तिचा देवधर्म आहे. आपल्या अलिशान घरातही तिने प्रथम देवदेवतांची स्थापना केली आहे. हॉलमध्ये शिवाजीमहाराजांचा पुतळा ठेवला आहे. तिच्या दैनंदिन कामाचा प्रारंभच मुळी श्रीज्ञानेश्वरा आणि तुकारामांची गाथा यांना फुले वाहून होतो.

कलाक्षेत्रात जगन्मान्य झालेली ही माझी धाकटी दीदी महाराष्ट्राचेच नव्हे तर भारताचेही भूषण आहे. शतकाशतकातून एकदाच हे असे भूषण परमेश्वरालाही निर्माण करता येत असावे. छोट्या दिदी, तू चिरंजीव हो!

एता

वसंत देसाई

# चतुरस्त्र कलाकार

माझ्याकडे पहिले उत्तम गाणे लताबाईंनी म्हटले ते विनायकांच्या 'जीवनयात्रा' या चित्रपटात 'चिडिया बोले' असे त्या गीताचे प्रारंभीचे शब्द होते आणि हा लेख मी लिहिण्यापूर्वी नुकतेच जे त्यांचे गाणे मी ध्वनिमुद्रित केले ते या वर्षाच्या जानेवारी महिन्यात सुप्रसिद्ध दिग्दर्शक विजय भट यांच्या 'रामराज्य' चित्रपटासाठी 'रैन भई सो जा रे पंछी' अशी लोरी त्यांनी माझ्या संगीतदिग्दर्शनाखाली म्हटली आहे याचा अर्थ, गेली पंचवीस वर्षे या ना त्या चित्रपटाच्या निमित्ताने त्यांची अनेक गाणी मी दिग्दर्शित करतोच आहे पंचवीस वर्षे एक व्यक्ती सातत्याने, चढत्यावाढत्या लोकप्रियतेने सतत गात आहे तिच्या यशाचा आणखी वेगळा पुरावा कशाला द्यायला हवा?

लताबाईंनी चित्रपटव्यवसायात पार्श्वगायिका या नात्याने पंचवीस वर्षांपूर्वी पदार्पण केले आज त्यांचा गौरव होत आहे वास्तविक असे गौरव समारंभ हे एखादा कलावंत आपल्या व्यवसायातून निवृत्त होताना करावयाचे असतात एका परीने तो समारंभ करून आतापर्यंत केलेल्या सेवेची त्या कलावंताला आपण पावती देत असतो लताबाईंच्या बाबतीत मात्र असे म्हणता येणार नाही आज पंचवीस वर्षांनंतरही त्यांच्याबद्दलची रसिकांची ओढ यत्किंचितही कमी झालेली नाही उलट आज त्यांच्या गाण्याला इतकी मागणी आहे की ती त्यांना वेळेच्या अभावी अनेकदा पुरी करता येत नाही आत्यंतिक कार्यव्यग्रता आणि प्रकृतीचे अस्वास्थ्य यामुळे कित्येकदा त्यांना लोकांचा रोष पत्करावा लागतो म्हणून आजचा हा त्यांचा गौरवसमारंभ माझ्या दृष्टीने, संगीताच्या भाषेत बोलायचे झाले तर, 'विलंबित अस्ताई' आहे अजून त्यांची 'बढत' आणि जलद लयीचा तराणा तर पुढेच आहे

अनेक फुलांचा गुच्छ घेऊन त्यापासून आपण सुवासिक अत्तर काढतो त्याप्रमाणे ईश्वरी कृपा, आईवडिलांचे आशीर्वाद आणि स्वतःची डोळस तपश्चर्या या सर्व गुणांची एकरूप परिणती म्हणजे लताबाईंचे आजचे व्यक्तिमत्त्व होय कोणताही माणूस जेव्हा कलेच्या प्रांगणात प्रथम पदार्पण करतो त्यावेळी त्याला काही एक आदर्श आपल्यासमोर ठेवावा लागतो प्रारंभीच्या काळात अशा आदर्शाची आवश्यकताही असते पण तोच आदर्श सतत समोर बाळगून माणूस त्याचेच अनुकरण करीत

राहिला तर स्वत चे व्यक्तिमत्त्व त्याला कधीच सापडत नाही लताबाईंचे मोठेपण जाणवते ते इथे. ज्यावेळी पार्श्वगायनाच्या क्षेत्रात त्यानी प्रथम पाऊल टाकले त्यावेळी नूरजहाँ या गायिकेचा आदर्श त्यानी आपल्यासमोर ठेवला होता. स्वत च्या घराण्याची लय कायम होतीच. पण त्याला नूरजहाँच्या गाण्याच्या पद्धतीची लताबाईंनी जोड दिली होती. पण पुढे जसजसा या क्षेत्रातला त्याचा अनुभव वाढू लागला तसतसे त्यानी 'स्वत्व' ओळखले 'लता मंगेशकर' म्हणून काही एक स्वतन्त्र शक्ती आहे हे त्यांनी जाणले आणि त्या दृष्टीने आपल्या कलेची जोपासना करण्यास, त्यासाठी परिश्रम घेण्यास त्यानी सुरुवात केली. आज तर त्यानी गाण्याची एक खास आपली अशी वैशिष्ट्यपूर्ण पद्धती प्रस्थापित केली आहे. तरुण गायकगायिकानी लताबाईंच्या पचवीस वर्षांच्या यशस्वी कार-कीर्दीपासून जर काही शिकायला हवे असेल तर ते हेच होय स्वत चे व्यक्तिमत्त्व सगळ्यानाच समजते पण ते लोकाना पटविण्यासाठी व सतत टिकविण्यासाठी काय श्रम करावे लागतात ते लताबाईंच्या उदाहरणावरुन समजावून घेण्याजोगे आहे.

लताबाईंच्या गळ्यातून शोकात्म करुणरसाची गाणी जास्त फुलतात असा समज आहे. पण माझ्या अनुभवाप्रमाणे लताबाईंची समजूतदार कलावत दृष्टी ही सर्व रसात सारख्याच रीतीने कामगिरी बजावते. आणि कोणत्याही भावनेचा वा रसाचा आविष्कार करणाऱ्या गीतातून आपला गळा त्या सारख्याच परिणामकारकतेने फिरवू शकतात. याचे उदाहरण सागावयाचे झाल्यास एकाच चित्रपटात लताबाईंनी गाइलेल्या दोन गाण्याचा मी निर्देश करीन. 'अमर भूपाळी' या चित्रपटात लताबाईंनी गाइलेले 'नको दूर देशि आज राजणा' हे शोकगीत लोकांच्या डोळ्यात जेवढ्या प्रभावीपणे अश्रु उभे करू शकते तेवढीच त्याच चित्रपटातली 'लटपट लटपट तुझं चालणं ग मोठ्या नखऱ्याच' ही लावणी एखाद्या म्हाताऱ्या पावलात सुद्धा तारुण्याची लय फिरायला लागते. असेच एक आणखी उदाहरण 'कांचनगंगा' या लताबाईंनीच निर्मिलेल्या चित्रपटातल्या गीताचे देता येईल. या चित्रपटातले 'जोग' रागामधले 'मोरी बोल बोल' हे करुणरसप्रधान गाणे लताबाईंनी जेवढ्या रसाळपणे गाइले आहे तेवढीच त्यातली 'नको बोलू रे' ही लावणी त्यानी अस्सल शृंगारिक ढगात गाइली आहे भक्तिगीते गातानाही त्याचे हेच वैभव प्रत्ययाला येते 'दो आँखे बारह हाथ' या चित्रपटातले 'ए मालिक तेरे बंदे हम' हे त्याचे गीत उत्कट भक्तिगीताचा उत्कृष्ट नमुना आहे. त्याच चित्रपटात त्यांनी गाइलेले 'सैया झूठोंका बडा सरदार निकला' ह खेळणेवालीच्या तोंडचे गाणे उडत्या मिष्किल आणि गोंधळ तारुण्याच्या मस्तीने भरलेल्या भावनेचा सुंदर रीतीने आविष्कार घडवते. देहाती गाणे कशा ढगाने गावे याचा ते गीत एक आदर्श आहे.

लतावाईच्या कलेचे मला घडलेले हे दर्शन होय. ते जेवढे हृद्य आहे तेवढाच त्याच्या उत्कट कलाप्रेमाची आणि थोर मनाची साक्ष पटविणारा दुसरा एक अनुभवही मला सांगावासा वाटतो मुंबईस येथे अपोलो बंदरात छत्रपती शिवाजीमहाराजांच्या पुतळ्याचा अनावरण समारंभ होणार होता त्या वेळची गोष्ट आहे. लाखो लोकांचा जमाव जमलेला होता मी तेव्हा सुमारे हजार मुलांचे 'शिवमंगल स्तोत्र' बसविले होते आणि त्यांच्याकडून मी ते म्हणवून घेणार होतो. ती हजार मुले तेथे शिस्तीने उभी होती. लताबाई त्यावेळी आमच्यापासून बऱ्याच दूर अंतरावर बसल्या होत्या. नामदार यशवंतराव चव्हाण, आचार्य अत्रे, गृहमंत्री बाळासाहेब देसाई ही थोर मंडळी त्यांच्या समवेत होती. पण हजार मुलांच्या प्रचंड समुदायाचे रोमांचकारी दृश्य लताबाईंनी अवलोकन केले मात्र. त्यांच्या कलासागरात स्वरांच्या ऊर्मी उठू लागल्या. शिवछत्रपतींवरील निस्सीम भक्तीने त्यात वादळ निर्माण केले. आणि त्या वादळाच्याच जणू आवेगाने लताबाई ज्या आपल्या जागेवरून उठल्या त्या तडक त्या गर्दीतून वाट काढीत माझ्यासमोर येऊन उभ्या राहिल्या आणि अचानक म्हणाल्या, "वसंतराव, मला आज गाणे म्हणायचे आहे!"

मी विस्मित होऊन त्यांच्याकडे टकमक बघतच राहिलो आणि, आपणास नवल वाटेल पण गोष्ट खरी आहे की त्यावेळी अल्लावधीत तेथल्या तेथ एक गाणे लताबाईंना बसवून, साथीदारांना लगेच तयार करून तत्काळ त्या प्रचंड जनसमुदायाला ते आम्ही सादरही केले!

लताबाईंनी गाईलेल्या सहस्रावधि गीतांतून त्यांच्या कलावंत हृदयाची साक्ष पटतेच. पण ऐतिहासिक थोर कलाकारांच्या परंपरेत शोभण्यासारखी ही वराळ कृती त्या दिवशी ज्या उत्स्फूर्तपणे त्यांच्याकडून घडली त्यातून त्यांच्या उत्कट कलाप्रेमाचा आणि थोर व्यक्तिमत्त्वाचा साक्षात्कार किती हृदयंगम रीतीने होत आहे.



हवे होते तसे आम्ही ध्वनिमुद्रित करून घेतले. गाणे सुरेख झाले आणि सर्वांना ते आवडलेही.

मध्यंतरी काही काळ गेला आणि पुन्हा अचानक तोच आवाज मा. गुलाम हैदर यांनी संगीत दिलेल्या गाण्यातून माझ्या कानी पडला. माझा कान ध्वनिमुद्रकाचा. मला तात्काळ जाणवले की आता हा आवाज ध्वनिमुद्रणाला अगदी हवा तसा तयार झाला आहे. उच्चारात जे थोडे मराठीपण पूर्वी जाणवे तेही आता नाहीसे झाले होते. यानंतर ती मुलगी वरचेवर आमच्याकडे ध्वनिमुद्रणासाठी येऊ लागली. तिला भराभर कामे मिळू लागली. आज अनिल विश्वास, तर उद्या सी. रामचंद्र, तर परवा डी. पी. कोरगावकर अशा एकापेक्षा एक सरस संगीतदिग्दर्शकाच्या दिग्दर्शनाखाली ती गाणी गाऊ लागली. सारेजण 'लता' 'लता' म्हणून तिला हाक मारात. तिच्याशी ममतेने वागत. तिचे कौतुक करीत.

एकोणीसशे अठ्ठेचाळिस साली ताडदेव येथे फेमस सिने लॅबोरेटरीत लताची गाणी ध्वनिमुद्रित झाली. 'बरसात' चित्रपटातली गाणी ती गात होती. त्यावेळी तिने ज पहिले गाणे गाईले ते 'जिया बेकरार है' हे होते. नवा हॉल, नवे रेकॉर्डिंग मशीन आणि आता अत्यंत सराईत, तल्लख झालेला लताचा आवाज. हिंदी गीतातले तिचे साफ आणि निर्दोष उच्चार. आणि 'जिया बेकरार है' सारखे वेधक गीत. त्या साऱ्याचा मेळ असा काही अभूतपूर्व जमला की त्या गाण्याचे ध्वनिमुद्रण करताना एका विलक्षण आनंदाने मी थरारून गेलो. त्याच क्षणी मी मनाशी खूणगाठ बांधली की हे पाणी काही निराळेच आहे. आतापर्यंतच्या सगळ्या ग्रेट आर्टिस्टसना मागे टाकून ही मुलगी लौकरच पुढे जाणार आणि या क्षेत्रातले सर्वोच्च मानाचे स्थान ती पटकावून बसणार तेव्हापासून तिची प्रगती मी मोठ्या आनंदाने आणि कुतूहलाने बघत राहिलो.

नंतरच्या काळात लताच्या कामाचे प्रमाण एकदम इतके वाढले की तिला अक्षरशः फुरसद मिळणे अशक्य होऊन बसले. एकोणीसशे अठ्ठेचाळीस ते अठ्ठावन या दहा वर्षांच्या काळात एक आठवडा असा गेला नाही की ज्यात आमच्याकडे लताचे गाणे ध्वनिमुद्रित झाले नाही. माझ्याकडे तिने किती गाणी गाइली असतील याची मोज्दाद तिला स्वतःला तरी असेल की नाही कोण जाणे. ती आमच्या फेमस सिने लॅबोरेटरीची जणू एक कुटुंबीय-फॅमिली मेंबर-बनली. इतके तिला येथे काम करणे अंगवळणी पडून गेले. लौकरच मराठी व हिंदी गीताच्या जोडीला बंगाली, तमीळ, गुजराती, कानडी या भाषेतली गाणीही लता गाऊ लागली. तमीळ कानडीचे अवघड शब्दोच्चार जसे तिने सहजगत्या आत्मसात केले तसा बंगाली उच्चारातला गोल गोडवाही तिने सफाईने कंठगत केला. तिने गाइलेली परभाषेतली गाणीदेखील परभाषिक व्यक्तीने गाइली आहेत असे कधी वाटत नाही. विशेषतः बंगाली भाषेतली तिची गाणी ही कोणत्याही बंगाली कलावंताला देखील तिच्याहून निर्दोष रीतीने गाता येतील असे म्हणता येणार नाही.

लताने आजपर्यंत माझ्याकडे किती गाणी गाइली असतील त्याला गणतीच नाही हे मी वर सांगितलेच. असा एकही नामांकित संगीत दिग्दर्शक नसेल की ज्याच्या दिग्दर्शनाखाली कधी ना कधी लता आमच्याकडे गाईली नाही. शंकर जयकिशन, बर्मन, मदनमोहन, हेमंतकुमार, रोशन, लक्ष्मीकान्त प्यारेलाल-संगीतदिग्दर्शक जुना असो की नवा असो, पधरापधरा वीसवीस चित्रपट ज्याच्या नावावर रुजू आहेत असा अनुभवी असो की पहिलेच संगीतदिग्दर्शन ज्याला मिळाले आहे असा अगदी नवखा अननुभवी असो, लता त्या सर्वांकडे सारख्याच हौसेने, कष्टाळूपणाने आणि प्रामाणिकपणाने गाइली आहे. या क्षेत्रात लता जसजशी मोठी होत गेली तसतशी दुसऱ्याना सहकार्य देण्याची तिची प्रवृत्ती अधिकाधिक वाढत गेली. आणि नव्या कलावंताना तिने सतत प्रोत्साहन दिले मग तो नवा गायक असो की नवा संगीतदिग्दर्शक असो. हा लहान तो मोठा असा भेदभाव तिच्याजवळ कधीच नसे.



मिनू कात्रक

मला ते दिवस अजूनही आठवतात. लता पार्श्वगायनाच्या क्षेत्रात जसजशी लोकप्रिय होत चालली तसतसा तिच्यावरचा कामाचा बोजा वाढत चालला. निर्माते, संगीतदिग्दर्शक आपली गाणी लतानेच गावीत म्हणून आग्रह धरू लागले. तिच्या घरी जाऊन धरणे धरून बसू लागले. पुष्कळदा हे लोक तिला अगदी नकोसे करून सोडीत. आणि काहीसा स्वभावातला भिडस्तपणा तर काहीशी कुणालाही शक्य तो न दुखवण्याची वृत्ती यामुळे लताही त्या सर्वांना होकार देई. सर्वांची गाणी गाई. त्या काळी स्टंट चित्रपटातली गाणीदेखील लताने गाइल्याची उदाहरणे हवी तेवढी सापडतील. कोणाला दुखवणे तिच्या स्वभावातच नाही. कोणाला 'नाही' म्हणणे जिवावर यावयाचे. यामुळे त्या दहाबारा वर्षांत लताने जिवापाड कामे केली आहेत. पण त्या श्रमाचा तिच्या प्रकृतीवर दूरगामी परिणाम झाला आहे असे मला वाटते. आजच्या तिच्या प्रकृतीच्या नाजुकपणाला व अस्वास्थ्याला तिने त्यावेळी केलेले अतिश्रम बऱ्याच अंशी कारण आहेत.

लताच्या मी ध्वनिमुद्रित केलेल्या किती तरी सुंदर सुंदर गाण्यांच्या गोड आठवणी माझ्या मनात यावेळी जाग्या होत आहेत. राजकपूरची 'संगम' पर्यंतच्या सर्व चित्रपटांची लताची गाणी आमच्याकडेच ध्वनिमुद्रित झाली. 'अनपढ' या चित्रपटातले 'आपकी नजरोंने समझा' हा पुढे अतिशय गाजलेला गझल जेव्हा तिने गाइला तेव्हा आम्ही सारेजण आनंदाने जसे काही थरारून गेलो होतो. 'अदालत' चित्रपटातले 'यूं हसरतोंके दाग' हा मदनमोहन यांनी संगीत दिलेला सुंदर गझल लताने जेव्हा गाइला होता तेव्हाही त्या गीतातल्या विलक्षण आर्ततेने आमच्या काळजांना असाच स्पर्श केला होता. 'फिल्मफेअर ॲवॉर्डस्' ज्या गाण्यांनी लताला मिळवून दिली ती तिची गाणीही येथेच ध्वनिमुद्रित झालेली आहेत. लता अमुक एक प्रकारचे गाणे आमच्याकडे गाइली नाही असे झालेच नाही. शास्त्रीय पद्धतीच्या गाण्यापासून तो गझलठुमरीपर्यंत आणि कोठीच्या गाण्यापासून तो रासगरबा गाण्यापर्यंत सर्व तऱ्हा ती आमच्याकडे सारख्याच सफाईने गाऊन गेली आहे. तिने गाइलेल्या गाण्यात उदास, आर्त, उल्हसित, खेळकर, शृंगारिक, भक्तिपर, असे सर्व 'मूडस' येऊन गेले आहेत. आणि प्रत्येक गाणे गाताना त्या त्या गाण्याचा 'मूड' लताने अचूक पकडलेला आहे.

आमच्या स्टुडिओत तर लताची गाणी मी वर्षानुवर्षे ऐकत आलो आहे. पण स्टुडिओ-बाहेरच्या जाहीर कार्यक्रमांतूनही तिची गाणी मला अनेकदा ऐकायला मिळाली आहेत. एकोणीसशे बासष्ट साली संरक्षण निधीसाठी कवि प्रदीप यांनी रचलेले आणि सी. रामचंद्र यांनी संगीतबद्ध केलेले 'ऐ मेरे वतनके लोगो' हे अप्रतिम गीत लाखो लोकांसमोर लताने गाइले आणि सर्वांची हृदये तिने गहिवरून टाकली. त्या अपूर्व प्रसंगी मी तेथे हजर होतो. तो माझ्या आयुष्यातला एक अत्यंत संस्मरणीय क्षण आहे.

इतकी वर्षे लता आमच्याकडे गाते आहे. या प्रदीर्घ काळात ती कसकशी बदलत गेली हे पाहणे मोठे मनोरंजक आहे. कलावंत म्हणून ती आज फार प्रगल्भ झाली आहे. पार्श्वगायनाचे तंत्र, त्यातल्या बारीकसारीक खुब्या तिला पूर्णपणे अवगत झाल्या आहेत. आवाजावर पूर्ण ताबा ठेवणे, त्याला योग्य ते वळण देणे, त्याची व्याप्ती कमी किंवा जास्त करणे येथपासून तो 'माइक'समोर किती अंतरावर उभे राहावे, तेथून हवे तेव्हा जवळ वा दूर असल्याचा आभास कसा निर्माण करावा इथपर्यंत या कलेतले सारे बारकावे लताने आता आत्मसात करून घेतले आहेत. या मुलीचा आवाज ध्वनिमुद्रणाच्या दृष्टीने कसा व किती उपयोगी पडेल कोण जाणे असा तिच्या बाबतीत प्रारंभी मला प्रश्न पडला होता. तोच तिचा आवाज आज ध्वनिमुद्रणाला सर्वांत सोपा आणि सर्वाधिक सहकार्य देणारा असे मान्य करण्यापर्यंत आमची मजल येऊन ठेपली आहे. यावरूनच लताची या क्षेत्रातली प्रगती ध्यानात येईल. आज तर, गाणे कसेही, कोणत्याही धाटणीचे असो, नुसता नजरेचा इशारा लताला पुरे असतो. ती या कलेत किती पारंगत झाली आहे याचे एक लहानसे उदाहरण

सागता अनेकदा एखाद्या गाण्याच्या बऱ्याच तालमी होतात पण लता अशी हुषार आहे की त्या तालमीत ती आपला दम, आपली शक्ती वतानताने खर्च करते आणि प्रत्यक्ष 'टेक' मध्ये मात्र शक्तिसर्वस्व वेचून गाते त्यामुळे ध्वनिमुद्रित गाणे हे उत्कृष्ट झाल्यावाचून राहतच नाही! आज तिच्या स्वराला इतका तोल आणि वजन आले आहे की तिचे गाणे ध्वनिमुद्रित करणे हा एक अत्यंत सुखद अनुभव होऊन बसला आहे

कलावंत म्हणून लता जशी वाढत गेली तशी हाडामासाची एक जिवंत व्यक्ती म्हणूनही ती गेल्या वीसबावीस वर्षांत बदलत गेली आहे तेव्हाची ती परकरी अल्लड पोर आता प्रौढ झाली आहे पूर्वीची कृशता जाऊन ती अंगाने जरा भरली आहे पूर्वीच्या बुजरपणाची जागा आता आत्मविश्वास युक्त हालचालींनी घेतली आहे बोलण्याचालण्यात आता अधिक मोकळेपणा आला आहे बदलल्या नाहीत अशा दोनच गोष्टी सांगता येतील एक लताच्या स्वभावातला साधा निगर्वीपणा आणि दुसरी तिचे मिष्किल हसू विनोदाची दुर्मिळ देणगी त्याला लाभलेली आहे तिच्याइतकी हजरजबाबी व्यक्ती मी दुसरी क्वचितच पाहिली असेल स्टुडिओत ती आली की वातावरण एकदम उल्हसित होऊन जाते त्यांशी गप्पा मारणे हाही एक आनंददायक अनुभव आहे या गप्पात कधी ती कोणाच्या नकला करून पोटभर हसवील. कधी नुकत्याच पाहिलेल्या चित्रपटाच्या मचमचल्या गमती सांगेल. कधी 'कुस्मुस' या नुकत्याच ऐकलेल्या इजिप्शियन गायिकेची तारीफ करील तर कधी आदल्या दिवशी पाहिलेल्या नव्या चित्रपटावर चुरचुरीत विनोदी भाष्य करील लता विनोदी आहे पण तिचा विनोद सभ्यतेच्या मर्यादा कधी ओलांडीत नाही आणि दुसऱ्या कलावंताबद्दल, गायकाबद्दल किंवा गायिके बद्दल उपहासाचे वा टीकेचे उद्गार कधीही तिच्या तोंडून निघाल्याचे मला स्मरत नाही

आज लता पार्श्वगायनाच्या क्षेत्रात अशा एका जागी उभी आहे की इथून पुढे ती किती मोठी होईल याचा अंदाजही करवत नाही ती सतत वर वर जात राहणार हे मात्र निर्विवाद तिच्याबद्दल माझ्या काय भावना आहेत हे एक लहानसे उदाहरण देऊन स्पष्ट करतो एकदा एका निर्मात्याला त्याचे गाणे आपल्या चित्रपटासाठी हवे होते त्याने लताकडून दिवस निश्चित करून घेतला पण त्या दिवशी काही तरी अडचण निघाली आणि 'टेक रद्द झाला असेच आणखी दोनतीन वेळा झाले तो निर्माता काकुळतीला येऊन मला विचारू लागला, "मी आता काय करू?"

मी त्याला सल्ला दिला, "आणखी थांबाव लागले तरी थांब पण गाणे लताचेच घ

पुढे त्या निर्मात्याला लताकडून पुन्हा दिवस मिळाला ती आली गाणे ध्वनिमुद्रित झाले ते उत्तम झाले निर्माता खुष होऊन गेला इतके दिवस त्याने वाट पाहिली त्याचे सार्थक झाले होते

गाणे ध्वनिमुद्रित झाल्यावर मी त्या निर्मात्याला एकीकडे घेऊन त्याला म्हटले,

Don t you think she was worth waiting for ?

त्याने समाधानपूर्वक मान डोलविली

हेच मी शेवटी त्याबद्दल सांगेन

She has been worth waiting for

शतकानुशतके जिची नुसती प्रतीक्षा करावी अशी ती थोर कलावंत गायिका आहे!



मिनू धात्रक

## मीना खडीकर

# कवडसे

अगदी लहानपणापासूनच दिदीची स्मरणशक्ती चांगली आहे. दिदी त्यावेळी असेल सहासात वर्षांची. सांगलीत प्रभातचा 'संत तुकाराम' लागला होता. आम्ही सर्वांनी तो चित्रपट बघितला. दुसऱ्या दिवसापासून आमच्या घरातच 'संत तुकाराम' सुरू झाला. दिदीला तुकारामाचे सर्व अभंग, संवाद तोंडपाठ झाले होते. त्यामुळे ती तुकाराम, मी जिजाई आणि आशा मगळाई अशी पात्रयोजना झाली. घरातल्या सर्व गाद्या एकावर एक ठेवून दिदी त्यावर बसायची आणि आम्ही बाकीची भावंडे 'रोपा' सारखी जमिनीवर आडवी झोपायची. नंतर दिदी 'आधी बीज एकले' हा तुकारामाचा अभंग सुरू करायची. अभंगाच्या एकेका ओळीबरोबर आम्ही हळूहळू डोके उचलून, माना उचावून, उठून रोपासारखे डोलू लागायचे. आम्हाला रोपे बनवण्याची ही युक्ती दिदीचीच. 'आमचा संत तुकाराम' बघायला बाबा व माई हे फार मोठे प्रेक्षक असायचे.

दिदी पहिल्यापासून फार चपळ. उत्साही. कुठलेही बाहेरचे काम असो, ती त्यासाठी लगेच तयार असायची. एकदा आमच्या माईला कुठूनतरी खोटे दोन आणे मिळाले. दिदीने ते पाहिले. त्याबरोबर तिने ते पैसे चालवण्याची हमी घेतली. ती आमच्या वाण्याकडे गेली. खोटे दोन आणे तिने पटकन वाण्यापुढच्या पैशाच्या पेटीत टाकून दिले. आणि दोन आण्याचा सामान घेऊन घरी आली. दीनानाथरावांची मुलगी म्हणून वाण्याने पैसे पारखून घेण्याची काळजी घेतली नाही. दिदी घरी आली आणि आपला 'पराक्रम' ऐटीत सांगू लागली. बाबांनी ते ऐकले तेव्हा त्यांनी तिला वाण्याची माफी मागून दुसरे खरे दोन आणे त्याला देऊन यायला तिला सांगितले. दिदीने हट्ट केला पण बाबांपुढे तिचे काही चालेना. शेवटी ती रडतरडत वाण्याकडे गेली. आणि त्याची क्षमा मागून खरे पैसे त्याला देऊन परत आली!

दिदीचा पूर्वीपासून राग फार यायचा. पूर्वीच्या मानाने आता ती फारच थंड झाली आहे. लहानपणी तिला कुणी रागावले किंवा तिच्या मनाविरुद्ध एखादी गोष्ट घडली की ती लगेच उठायची आणि जीव द्यायला जायची. जाताना ती आपले सर्व दागिने काढून ठेवायची आणि मगच ती जीव द्यायला

जा

नाटकाकडे गायची. मान जाताना ती माग वळून, मागल्याग कोणी बोलायला येते का हे बघत बघत जायची आमची माइ फार भित्री ती लगच दिदीच्या पाठोपाठ जाऊन तिला मनवून परत आणायची पण एक दिवस काय झाले, दिदी रागारून जाताच बाबानी दार लावून घेतले. माईलाही त्यानी तिच्या पाठोपाठ जाऊ दिले नाही दिदीने रस्त्यावर थोडा वेळ वाट बघितली. कुणीच तिला बोलवायला येईना, तेव्हा ती फार घाबरली आणि निमूट घरी परत आली दारातून तिने बाबाची, माईची क्षमा मागितली पुन्हा जीव देण्याची भीती घालणार नाही असे कबूल केले तेव्हाच बाबानी तिला आत घेतले. तेव्हापासून नतर दिदी कितीही वेळा रागावली असली तरी जीव देण्याची भीती मात्र आजतागायत तिने पुन्हा कधी आम्हाला घातली नाही!

नाटकामधून मी आणि दिदी जोडीने काम करीत असू आम्ही नाटकात काम केलेले बाबाना मुळीच आवडत नसे. पण आम्ही 'नमना'च का होईना, पण स्टेजवर जातच होतो पुढे पुढे दिदी नाटकातून लहान लहान कामेही करू लागली

एकदा आमचा मुक्काम नाशिक जिल्ह्यात नादगाव येथे होता बाबाची प्रकृती त्या दिवशी बरी नव्हती त्याच दिवशी 'नाटिका' नाटक लावले होते. दिदी त्या नाटकात वान्याचे काम करीत होती. दिदी तेव्हा फारच लहान दिसायची पण त्या दिवशीचे नाटक तिने निव्वळ आपल्या गाण्यावर ओढून नेले 'बघीतल ग्वाड पाखरू' ही लावणी तिने फारच छान म्हटली तिच्या आवाजामुळे तिच्या छोट्या वयाकडे किंवा त्याच्याशी विसगत अशा लावणीच्या शब्दाकडे लोकाचे लक्षच गले नाही.

'सौभद्र' नाटकात दिदी नारद आणि बाबा अर्जुन व्हायचे बाबापुढे ती फारच लहान दिसायची इतका लहान नारद मराठी रगभूमीवर कधीच आला नसेल 'सौभद्र' नाटकात पाहल्याच अकात दिदीला बाबासमोर जवळजवळ चारपाच गाणी म्हणावी लागायची पण 'भीती' हा शब्द लहानपणापासूनच दिदीच्या कोशात नाही त्यामुळे ती खुशाल बाबासमोर गायची इतकेच नव्ह, तर त्याच्या बरोबरीने 'वन्स मोअर' मिळवायची. ती गाऊन स्टेजवरून आत आली की बाबाच्या डोळ्यात पाणी उभे राहायचे. ते नेहमी म्हणायचे, 'माझी 'ततावावा' माझ्या पाठीमाग माझ्या सारखीच सर्वांना साभाळील'' 'ततावावा' हा दिदीसाठी बाबाचा खास प्रेमाचा शब्द बाबानी त्यावेळी तिच्याविषयी काढलेले ते उद्गार दिदीने खरे करून दाखवले आहेत बाबाच्या आपल्या वरच्या विश्वासाला तिने धोका दिला नाही

माझ्या बाबाच्या मृत्यूनतर दिदीने आम्हा सान्याना कसे साभाळले हे आता सर्वांनाच माहीत आहे बेचाळीस साली मी आणि दिदी मुबईत विनायकरावाकडे राहायला आलो आयुष्यात प्रथमच आम्ही माईला आणि भावडाना सोडून इतक्या दूर, परक्याच्या घरा आलो होतो बेचाळीस ते पचेचाळीस सालापर्यंत दिदीने सर्व प्रकारचा त्रास सहन केला पण त्याची झळ तिने मला कधीही लागू दिली नाही ती मला नेहमी सागायची, "मी काम करते आहे करीत राहीन. पण मीना, तुला जेवढे शिकायला मिळेल तेवढे तू शिकून घे एकदा आपल्या घरातून कुणा एक तरी डॉक्टर, बॅरिस्टर झालेले मला बघायचे आहे" दिदीची ही इच्छा आम्ही भावडानी काही पुरी केली नाही आम्ही पण हळूहळू चित्रपटाकडेच वळलो यामुळे दिदीला अजूनही कधी कधी आमचा खूप राग येतो आणि मग ती माझ्या आणि आशाच्या मुलाना खूप खूप शिकवायचे ठरवत!

सत्तेचाळीस साली विनायकराव गेले. प्रफुल्ल कपनी बद झाली आणि परत एकदा दिदीला कामासाठी बाहेर पडावे लागले. बेचाळीस ते सदुसष्ट सालापर्यंत म्हणजे आज पचवीस वर्षे ती सतत कामच करते आहे आमच्यासाठी, घरासाठी लोकानी स्तुती केली, निंदा केली, पण तिच्यावर कशाचाच परिणाम नाही स्तुतीने ती चढत नाही, निंदेने पडत नाही माझी दिदी हिमालयासारखी उंच आहे तिचे मन सागरासारखे विशाल आहे.



मीना खडीकर

माझे लग्न ठरल्याचे माईने तिला सांगितले, त्यावेळी तिने माईला बजावून ठेवले होते, "मीनाच्या पसंतीनेच तिचे लग्न व्हायला हवे तिच्या मनाविरुद्ध काही होता कामा नये इतकी वर्षे मी तिला सांभाळले आहे. या पुढेही माझी बहीण मला जड होणार नाही." माझे लग्न दिदीने मोठ्या थाटाने केले. घरातले पहिले कार्य म्हणून तिने ते अभिमानाने, दणक्यात पार पाडले.

दिदीच्या स्वभावातला एक अत्यंत लोभस गुण म्हणजे तिला लहान मुलांची असलेली आवड. आशाच्या व माझ्या मुलांवर तिचे विलक्षण प्रेम आहे. शॉपिंगला गेली तर प्रत्येक मुलासाठी काही ना काही वस्तू आवर्जून घेऊन यायला ती विसरणार नाही. नाताळच्या व दिवाळीच्या वेळी मुलांना गाडीत घालून ती बाजारात नेते व त्यांच्यासाठी केवढी तरी खेळणी खरेदी करून घरा घेऊन येते! लहान मुलांचा निष्कपटपणा आणि त्यांची निरागसता यामुळेच तिला मुलांबद्दल अतोनात माया वाटते घरात कोणी मूल रडत असेल तर दिदी तात्काळ त्याला जवळ घेईल. त्याची समजूत घालील व त्याचे रडे बंद करून त्याला हसवील! रेकॉर्डिंग करून घरी आल्यावर नित्शः ती अत्यंत थकलेली असते. पण अशा वेळी माझी, आशाची मुले घरात केवढाही धुडगूस घालीत असली, दंगा करीत असली तरी दिदी चुकूनही वात्सल्यासारखे दाखवणार नाही, किंवा त्यांच्या अंगावर ओरडून त्यांना गप्प बसवणार नाही. मुलांची सर्व कामे ती हौसेने करते. माझ्या मुलाचे, योगेशचे, तर तिने एकदा केस कापले होते. आणि तेही अगदी सराईतपणे! एखादे मूल छानशा 'पोज' मध्ये बसलेले दिसले की दिदी लगेच आपला कॅमेरा घेऊन येते आणि पटकन् त्याचा फोटो घेऊन टाकते. माझ्या व आशाच्या मुलांचे असे कितीतरी छान छान फोटो तिने काढून ठेवले आहेत.

दिदीच्या गाण्यासंबंधी मी काय लिहिणार? तिची बहीण म्हणून लिहीत नाही. पण तिच्या आवाजाची, गाण्याची मी फार मोठी भक्त आहे. आमचे एक स्नेही दिदीचे गाणे ऐकून नेहमी म्हणतात, "दिदी म्हणजे संगीत क्षेत्रातील 'ब्रॅडमन' आहे."

मीही तेच म्हणते



## सचिनदेव बर्मन

# महाराष्ट्रीय? नव्हे भारतीय

माझ्या पुष्कळशा स्वररचना गाण्याकरता लताबाईसारखी गायिका लाभली ही माझ्या दृष्टीने फार अभिमानाची गोष्ट आहे. आणि हीच भावना माझे सहकारी असलेले इतर संगीतकारही व्यक्त करतील याबद्दल मला यत्किंचितही शंका वाटत नाही

बॉम्बे टॉकीजच्या 'मजबूर' या चित्रपटामध्ये पार्श्वगायिका म्हणून या साध्यासुध्या मुलीला स्वर्गवासी गुलाम हैदर यांनी जेव्हा प्रथम संधी दिली तो दिवस भारतीय चित्रपटसृष्टीच्या इतिहासात केवढा भाग्यशाली ठरणार होता याची त्यावेळी कोणाला कल्पना तरी असेल काय! मी तेव्हा 'फिल्मिस्तान' मध्ये काम करीत होतो त्यावेळी आपल्याला एका नव्या गायिकेचा शोध लागला असल्याचे गुलाम हैदर यांनी मला सांगितले होते आणि कोणत्याही कलावंताविषयीचे त्यांचे मत या अंदाज अचूक खरा ठरतो हे मला अनुभवाने ठाऊक झाले होते तेव्हापासून मी लता मंगेशकर यांना पाहत आलो आहे आणि या श्रेष्ठ गायिकेची कसकशी प्रगती होत गेली ते मी कौतुकाने न्याहाळले आहे थोड्याच अवधीत चित्रपटसृष्टीच्या क्षितिजावर लता एखाद्या तेजस्वी ताऱ्यासारखी झळकू लागली आज इतकी वर्षे झाली, हा तारा तसाच झळकत आहे आणि कोट्यवधी लोकांना अपूर्व आनंद देत आहे

मी संगीतमय वातावरणात वाढलो आहे असंख्य गायकांशी परिचय करून घेण्याचे, त्यांची गाणी ऐकण्याचे भाग्य मला लाभले आहे. कितीतरी असाधारण सुंदर स्वर माझ्या कानात घुमत आहेत पण लताच्या आवाजाचा गोडवा, त्याचा लवचिकपणा केवळ अतुलनीय आहे. स्वतःची अशी खास शैली असलेल्या श्रेष्ठ दिग्दर्शकांच्या आणि गीतकारांच्या रचनांना लताइतका योग्य न्याय क्वचितच कोणी दिला असेल.

संगीताविषयी बोलणे आणि या श्रेष्ठ कलेचे गुणानुवाद गाणे हा कोणत्याही संगीतप्रेमी व्यक्तीचा हक्कच आहे एखादे मधुर गीत मनाला किती शांती आणि तृप्तता देऊ शकते, आणि एखादे स्फूर्तिदायक गीत निराशेच्या गाण्यातून माणसाला कसे वर ओढून काढू शकते हा थरारून टाकणारा

अनुभव मी कितीदा तरी घेतला आहे. लताला असा जादूचा स्वर लाभलेला आहे की तो माणसाला एकदम अंतराळात भरान्या घ्यायला लावू शकतो आणि त्याबरोबरच शोकग्रस्त मनाचे दुःखही तो हलके करतो.

आज आपला देश विलक्षण संघर्षमय परिस्थितीतून जात आहे. भाषिक प्रश्नावर काही प्रांत आपापसात भांडाईत भांडत आहेत. हे प्रांतीय मनोवृत्तीचे लोक इतके उर्मट आणि मगरूर झाले आहेत की जर एखादा जबाबदार नेता त्यांना चार समजुतीच्या गोष्टी सांगायला गेला तर त्याचे म्हणणे शांतपणे ऐकून घेण्याऐवजी त्याच्यावर दगडफेक करायलाही ते कमी करणार नाहीत, पण तेच जमाने महाराष्ट्रीय असलेल्या लताला तमीळनाडमध्ये जाऊन एखादे तमीळ गीत म्हणू द्या, हे अतिसंवेदनशील तमीळ लोक अहमहमिकेने तिला 'आपली' म्हणू लागतील! कारण तमीळ गीते निर्दोष उच्चारासह आणि खास तमीळ वैशिष्ट्यानिशी बिनचूक कशी गावीत याचे कसब लताला पूर्ण अवगत आहे. याच पद्धतीने बंगाली, भोजपुरी आणि पंजाबी लोकही तिला आपली म्हणतील. तिचे अत्यंत प्रेमाने स्वागत करतील. कारण तिला या सर्व प्रांतांच्या भाषा माहीत आहेत. इतकेच नव्हे तर त्या त्या प्रांताची प्रादेशिक गीते खुद्द तेथील लोकांइतक्याच सहजतेने, विनासायास लता गाऊ शकते. तेव्हा एवढ्यातेवढ्या कारणानेही प्रक्षुब्ध होणाऱ्या, अत्यंत तीव्र प्रांतीय मनोवृत्तीच्या लोकांना आपल्या भाषणांनी शांत करण्याचे जे अवघड कार्य प्रत्यक्ष नेत्यांनाही जमणार नाही ते ही साधी निगर्वी मुलगी केवळ त्या लोकांची गाणी गाऊन सहजपणे साधू शकेल आणि त्यांचे शाश्वत प्रिय लोकांत ती परिवर्तन घडवून आणील!

मक्का, झगझगाट, जाहिरातबाजी यांच्या या युगातही लता मंगेशकर अत्यंत साधी, प्रसिद्धिपराङ्मुख राहिली आहे. असाधारण कीर्ती, मोठा नावलौकिक आणि विपुल वैभव प्राप्त झालेले असूनही लता ही कोणत्याही सर्वसामान्य माणसासारखी साधीसुधी राहाते, बोलते, वागते हा तिचा वेगळा मोठेपणा आहे!



गोपाल नीलकंठ दांडेकर

# समर्पिता

साल असावे पंचेचाळीस किंवा शेहेचाळीस. सुधीर फडके त्यावेळी पुण्यास स. प. महाविद्यालयाच्या शेजारच्या पर्वतीरस्त्यावर रहात असत. दिदीला सर्वप्रथम पाहिले ते त्या घरात. चित्रपट कुठला ते स्मरत नाही, पण फडके यांचे संगीत रचीत होते. पदे गावून घ्यायची होती दिदीकडून. गप्पा मारीत बसलो असता कुणी सांगितले, की लता मंगेशकर आल्या आहेत.

एकदम जुने अनुबंध जागे झाले. लहानपणी वडिलांचे बोट धरून कै. दीनानाथांचा रंगमंचावरला अभिनय पाहिला होता. 'रणदुंदुभी 'नाटकात तेजस्विनीचा वेष लेऊन ते जेव्हा रंगभूमीवर पाऊल घालीत, तेव्हा हर्षाने थरारून टाळी पिटलेली स्मरली. काय ते रूप! कसा तो अभिनय! कशी वाक्याची फेक! श्रोत्यांची अंगे रोमांचित करून टाकणारे कसे ते गाणे!

त्या स्वरगंधर्वाची ही कन्या कशी असेल! कशी दिसेल!

मोठ्या कुतूहलाने बैठकीत पाऊल घातले. एक लहानगे रूपडे दिसले. मुद्रा कै. दीनानाथांशी जवळीक सांगणारी. वर्ण सावळा. आपल्याच आकृतीत ते रूपडे हरवून गेलेले. मस्तकावर असलेल्या भरपूर रेशमाराच्या दोन वेण्या घातलेल्या.

पण जे जाणवले ते इथेच संपले नाही. रिकाम्या वेळी मनाशी चाळा करीत बसे, की मीरा कशी असेल? जनी कशी? दोघीही वर्णाने सावळ्यागोरळ्या असतील. कारण? सावळ्या सख्याच्या त्या उपासिका. शरीरे कृश असतील. अशीच आपापल्या अस्मितामध्ये हरवून गेलेली.

जन्मभर झुजल्या असतील. प्रपंचातले उणे दुणे त्यांनी पाहिले असेल. साहिलेही असेल. क्वचित् स्वतःच्याच वर्तनाचे घाव त्यांच्या अंगावर वाजले असतील.

आणि मग तो दिव्य क्षण उगवला असेल. त्याच्यासाठी ताबडतोबी झाली असेल. त्याच्या जीवनात उजाडले असेल. त्याच्यासाठी इतक्या बहुतहु जन्माची पायपिटी केली, ते निधान त्याच्या हाती लागले असेल. या झुजातल्या खुणा त्याच्या अंगावर उमटल्या असतील, हे तर खरेच. पण पाहाणाराचे लक्ष त्याच्या मुद्रामोवतीच वेधून राहात असेल.

त्या मुद्रावर थक्क करून टाकणारा समर्पित भाव असेल. तिथे असेल थोडके कारुण्य. काही असेल हरिचरणी मिठी घालण्याचा निश्चय. आता होओ हवे ते! येथून बाजूस सरणे नाही. हा जो बहुता काळीचा नवनीतचोर हाती लागला आहे; त्याच्या चरणी घातलेली मिठी आता सोडणे नाही, असा उत्कट समर्पणाचा निर्धार त्या मुद्रावर माइला असेल.

मीरा—जनींची व्यक्तिचित्रे मला जाणवली होती, ती ही अशी. सुधीरबाबूजींच्या बैठकीत पाऊल घालताक्षणी ध्यानी आले, ही इथे जी कोण बसली आहे, ती देखील त्याच जातीची अभिशिता आहे. त्याच समर्पिताशी नातेगोते जुळलेली.

त्या जशा तेजस्विनी, तशीच ही ज्योतिष्मती—भस्माने झाकलेली. पहिल्या क्षणी मुद्रेवर काहीच वेगळेपण प्रत्ययास येऊ न देणारी. साधी, काहीशी अगतिक वाटणारी. पण हे भस्म बाजूस सारले तर! तर मग ही चोरा मायडाची आई आहे. त्या पिलांना धक्का लावायला जा, फाडून खाईल. आपले सर्वस्व हिने त्या चोरासाठी समर्पित केले आहे. चोरालाही हाती धरून नीट वाटेला लावून द्यायला धडपडत्ये आहे. त्याच्या कुशलामध्ये आपले कुशल पाहत्ये आहे.

आणि ही चोरं आपापल्या वाटांनी निघाली की मग ही काय करील!

त्यावेळी उपयोगी येईल, म्हणून तर जनी मीरेच्या समर्पणभावाची शिदोरी सवे घेऊन ही आली आहे. त्या क्षणी इच्यासाठी गिरिधराच्या घराचे द्वार उघडलेले असेल!

घर साडेअकरापर्यंत जागत बसले. घड्याळात बारा टोले पडले तरी गाडी नाही, तेव्हा मात्र मने हादरली गचीत गाडीची वाट पाहात सगळ्या उग्या मुग्या उभ्या राहिल्या. नाना कुक्सनाची झळमटे भवताली गोळा होऊ लागली. देवाला नवस सुरू झाले. शेवटी एक वाजला, तेव्हा दिदीने थरथरत्या स्वरात हाक मारली, "जयसिंग, गाडी काढ!"

माईंनी स्वर सामाळीन विचारले, "कुठे निघालीस?"

"त्याला शोधायला. घाबरू नकोस, एकटी नाही जात."

"मग?"

"उपाला घेऊन जात्ये—"

आणि उपाताईंचे पोलादी सरक्षण घेऊन दिदी रात्री एकच्या पुढे मुंबईहून निघाली!

बाळाला शोधायचे होते कुठे? तर मुंबई ते तळेगाव या रानावनांतून धावत चाललेल्या शभर मैल लाबीच्या रस्त्यावर. वेळ रात्रीची. त्या अवेळी राष्ट्रीय हमरस्त्यावर ट्रक बेफामपणे धावत असलेले. ड्रायव्हर शुद्धीवरही नसायचे. रस्त्यावरील टावरानाचा ताबा प्रहर रात्र उलटल्यावर ग्रामोद्योगी मडळीकडे असायचा. सुरे, बाटल्या, कोण्या गोष्टीची उणीव नाही. अशा त्या रस्त्यावरून या दोघी हुरहुरत्या मनानी भावाच्या गाडीचा शोध घेत चालल्या!

ठाणे गले, मुंब्रा गले, दारुड्यानी गजबजलेली टावराने गेली, आणि रात्री अडीच वाजता पनवेल आले. बाळच्या गाडीचा पत्ता नाही. प्रत्येक गाडी निरखताहेत. पण एकीसारख्या हजार गाड्या. ओळख पटावी कशी?

रडवेली दिदी पनवेलच्या पेट्रोलपपावर थाबली. तिथे फोन होता. मुंबईला ट्रक लावून वाट पाहात बसली. शेवटी एकदाचा फोन खणाणला.

"मी ल्ता बोलत्येय—"

"मी—माई—"

"बाळ?"

"पोचला घरी! त्याची तुमची चुकामूक झाली. तू कुठून बोलत्येस?"

"पनवेलहून—"

गाडी फिरवून दिदी पहाटे चारच्या सुमारास मुंबईस पोचली. सोमवारचे व्रत उरकून बाळ वाट पाहता पाहता पगला होता. त्याच्या डोक्यावर हात ठेवला, आणि मग दिदीने अथरुणावर अग टाकले.

असे तीनतेने वाटत असे, की या दिदीला कुठेतरी एखादे दृढ आलबन सापडले असले पाहिजे. एरवी प्रसिद्धीचे अन् लोकप्रियतेचे हे लोटच्या लोट अगावरून जात असता एखादा माणूस केवळ खुळावून गेला असता.

एके दिवशी अचानकपणे पत्ता लागला. हे लोकप्रियतेचे चपेटे ज्या महापुरुषाच्या आश्रयाने दिदी सोसत्ये आहे, त्याचे नाव कळले.

बाळाकडून समर्थभक्त देवाचे समर्थविचार घेऊन आलो—अभ्यासासाठी. पुस्तकाची पहिली पृष्ठे उलटायचे कारण पडले नाही मधले सदर्भ हवे असत, तेवढ्यापुरता तो तो भाग उघडला की माझे काम भागत असे. पण एकदा पुस्तकावर नाव कुणाचे आहे हे पाहण्याचा पुकाचा चाळा करू गगो वाटले होते, की बाळाने हिरव्या शाईने झोकेदार अक्षरात आपले नाव घातले असले पाहिजे. बाळाचे थोडे तिरके, अतिशय देखणे हस्ताक्षर नुसते पाहत बसणे, हेही एक सुखच आहे. मुखपृष्ठ उलटले, तो आत अक्षरे दिसली—

"श्रीरामचंद्राच्या कृपेने—ज्ञानेश्वराच्या लेखणीने—समर्थांच्या वैराग्याने—शिवाजीमहा

राजाच्या तरवारीने--पवित्र झालेल्या या मंगल महाराष्ट्राचा तुला कधीही विसर न पडो हा आशीर्वाद"

आणि खाली सही होती—

"शिवदासी

१९-१०-५५

चि. हृदय,

१९ व्या वाढदिवसानिमित्त"

*शिवदासी !*

शिवदास्याबद्दल मनी केवढा गौरव ! दास्यच पत्करायचा असेल तर तो हा असा पत्करावा. तो श्रीमन योगी असा अलौकिक योग्यतेचा पुरुषोत्तम होता, की भल्याभल्यांनी त्याचे दास म्हणून मिरवण्यात धन्यता मानावी ! ते एक भावनिक समाधान असते. वयावादळाच्या लाटा भवताली आदोळत असता मनाला आधार वाटत राहतो, की चिंतेचे काय कारण? त्याचे दास म्हणवितो, त्याने तर याहून अधिक विराटरूप अगावर झेलून त्याचा भार सहज वाहिला होता !

दिदींचे हे शिवदास्य केवळ कौतुकापुरते नव्हे, याचा प्रत्यय येण्याजोगी एक दोन वरी निमित्ये घडली. शिवराय मंडळाने दादरच्या हेटकरी महाजन वाडीमध्ये शिवछत्रपतिविषयक प्रदर्शन भरवले होते. काही दुर्गांच्या प्रतिमा, छायाचित्रे, शिवजीवनातले चित्ररूप केलेले काही प्रसंग, शिवकालीन शस्त्रे, असा नाना परी यत्नपूर्वक मिळवून मांडल्या होत्या. अनेक जणांनी रात्रंदिवस कष्ट केले होते. मात्र त्यांच्या त्या श्रमाचा परिहार करता येईल, असे मंडळाजवळ काही नव्हते. पाचसातशे रुपये खर्चावेत, तेव्हा शिवछत्रपतींच्या नावाला साजेसे कृतिक करता आले असते.

एकदम विचार आला, की दिदींजवळ हात पसरावा. शब्द टाकताक्षणी दिदी मूठभर नोटा घेऊन बाहेर आली. आणि कार्यकर्त्यांच्या मुद्रा उजळून निघाल्या. पावती नेऊन देऊ लागता ती म्हणाली,

"करायची काय पावती ? घरच्या मामासाठी कुणी पावत्या का फाडीत बसते ?"

ज्या वेडाने जनी मीरा झपाटल्या होत्या, त्या दिशेने हे पाखरू भरारू लागले आहे! तिथवर झेप घ्यावी, जिथवर त्या दोघी पोचल्या होत्या त्याही तर प्रापंचिक कर्दमातून वर उठल्या होत्या. तर मग आपल्यालाही ऐहिक व्यापाची खंत मानायचे कारण नाही. तुकारामाने भरवसा देऊन ठेवला आहे—

मागे झाले नको पाहो । पुढे जमान आम्ही आहो ॥

जामीनकी त्या महावैष्णवाने स्वीकारली आहे, तेव्हा आता द्यावे स्वत ला झोकून त्या महा समुद्रामध्ये!

दिदीचे देवघर दृष्ट लागेल इतके साजरे आहे. श्रीमगेशाच्या प्रतिमेचे दर्शन घेतल्याविना ही माणसे घराबाहेर पाऊलही घालीत नाहीत दैनिकी पूजेसाठी एका सत्त्वशील ब्राह्मणाची नेमणूक केलेली आहे.

निमित्त काय होते, ते स्मरत नाही. मात्र एकदा देवाची आरती करायचा प्रसग मजवर आला. ही भावडे झाझ वाजवू लागली. आरती म्हणत असता सहज मागे वळून पाहिले–दिदी डोळे झाकून उभी आहे. तिच्या मुद्रेवर त्या क्षणी जो भाव होता, त्या अनुभवासाठी साधकाना वर्षानुवर्षं श्रमावे लागते त्या भावसमाधीत दिदी बुडून गेली होती.

पुन्हा एक प्रसग. एका सायकाळी सहज देवघराचे दार लोटले दिसले, की देवासमोर दिदी बसली आहे. नुकते स्नान केले आहे बनारसी पाढरी साडी नेसली आहे. लाबसडक केस पाठीवर मोकळे सोडले आहेत. भाळी बहुधा चदन माखले असावे समोर गीताग्रथ आहे ती गीतापाठ करते आहे पाठाशी अशी समरस होऊन गेली आहे, की मी दार उघडून आत पाऊल घातले, याचेही भान नाही!

देवासमोर दीप तेवतो आहे. उदबत्ती जळते आहे तिच्या धुराची वलये दिदीभवती घोटाळ ताहेत. त्याच्या गूढ आवरणात ती हरपू पाहते आहे–जशी गीतापाठात हरपली आहे तशी!

हे कशाचे चिन्ह!

पण याहूनही नेटका प्रत्यय आला तो दिदीच्या एका नव्या ध्वनिमुद्रित गीतामध्ये

जोगी मत जा हे मीरेचे दर्दभरे गीत. बाळाने त्याला नवी चाल लावली, आणि दिदीने ध्वनिमुद्रित केले मोठी सुबक चाल. हृदयास स्पर्श करणारी बाळ म्हणाला,

"एक नवे गीत ऐकवतो"

त्याने रेकॉर्डप्लेअरवर टेप लावली, आणि दिदीचा आर्त स्वर कानी पडला—

"अरे जोगी, नको रे जाऊस! शरीर जाळून त्याची चिमुटभर राख उरली; हवी तर ती आपल्या अगास फास, पण जाऊ नकोस!"

अगातून जणू वारा धावून गेले हाच तर तो स्वर! थेट त्या सावळ्यापर्यंत पोचणारा जो कसलाही अडथळा मानीत नाही. गीत सुरू होते अचानक थाबून दिदीने अति करुण स्वरात घातलेली साद ऐकली—

"जोगी ऽऽ!"

ज्या मधुर मत्तीसाठी साधक देव पाण्यात घालून बसतात, तिचा ईषत् स्पर्श या हाकेला झाला आहे या एकाच समर्पित स्वरासाठी योगी जन्मजन्माचे गर्भवास सहन करात असतात

तलत महमूद

# दिलदार सहकारी

एकोणीसशे सत्तेचाळीसअठ्ठेचाळीस साल असेल. मी कलकत्त्याला होतो तेव्हाची गोष्ट. 'हिज मास्टर्स व्हॉइस' या ग्रामोफोन कंपनीद्वारा माझ्या पुष्कळ ध्वनिमुद्रिका प्रकाशित होत होत्या. त्यांपैकी 'तस्वीर तेरी दिल मेरा—' या गझलाने तर मला विशेषच नावलौकिक मिळवून दिला होता. या सुमारास एक अत्यंत सुरेल, मुलायम आणि दर्दभरा असा नवाच आवाज अधूनमधून माझ्या कानावर पडू लागला होता. हा आवाज आणि त्यातला गोडवा काही वेगळाच होता. विशेषत या आवाजातल्या 'आयेगा, आयेगा, आयेगा आनेवाला' या गीताने तर मी अगदी भारावून गेलो होतो. त्यामुळे या आवाजातले प्रत्येक गीत मी मोठ्या आवडीने आणि उत्सुकतेने ऐकत होतो. त्या सुमधुर आवाजाचा मी विलक्षण चाहता बनलो श्रीमती लता मंगेशकर यांची व माझी पहिली ओळख ही अशी झाली. त्यावेळी मी त्यांना प्रत्यक्षात पाहिलेही नव्हते. परंतु त्यांची गीते ऐकून ही एक अत्यंत गुणी आणि असामान्य गायिका आहे असे मी तेव्हाच अनुमान काढले होते.

लताजींचा आणि माझा प्रथम परिचय झाला तो दिवसही मला चांगलाच आठवतो. नशीब काढण्यासाठी मी कलकत्त्याहून मुंबईला आलो होतो मला एकोणीसशे एकुणपन्नास साली पहिलीच संधी लाभली ती अनिल विश्वास यांच्या संगीत निर्देशनाखाली 'आरजू' या चित्रपटासाठी पार्श्वगायन करण्याची. अनिल विश्वास यांच्या घरीच लताजींच्या प्रत्यक्ष परिचयाचा योग आला. पांढऱ्या शुभ्र पोषाखातील त्या अत्यंत साध्या, सडपातळ बांध्याच्या गायिकेकडे मी काही क्षण पाहतच राहिलो होतो. जिच्या आवाजाने मी कलकत्त्याला असताना अनेकदा भारावून गेलो होतो ती साक्षात माझ्यापुढे उभी होती. लताबाईंचे मोजकेच बोलणे, विनम्र वागणे आणि दुसऱ्या कलावंताच्या कलेची कदर करणारी गुणग्राहक वृत्ती यामुळे त्यांच्याविषयीचा माझा आदर द्विगुणित झाला. "यांचा प्रत्यक्ष परिचय आज झाला असला तरी यांचा आवाज माझ्या कानी अनेकदा पडला आहे खरेच, हे फार सुरेल गातात!" या त्यांच्या उद्गारांनी तर माझ्या अंगावर मूठभर मास चढले. कारण त्यावेळी मी नवीन होतो. नावारूपाचा मार्ग काढीत होतो. तर लताजींनी अल्पावधीतच विलक्षण जम

असमला होता. त्याच्या नानाचा बराच बोलबाला झाला होता. अशा परिस्थितीत त्याचे उत्तेजनपर शब्द मला फार मोलाचे वाटले यात नवल ते काय?

त्यानंतर अनिलदाच्या घरी वारवार आमच्या भेटी होऊ लागल्या. लताजी अनेकदा आपल्या गाडीतून मग कधी नग स्टॉपपर्यंत तर कधी रेल्वे स्टेशनपर्यंत पोचवू लागल्या. त्यावेळी स्वत ची गाडी ठेवण्याची माझी परिस्थिती नव्हती. अशा वेळी त्याच्या तोंडून अनेक गायकाची प्रशसा ऐकायला मिळे. स्वत बद्दल मात्र त्या चुकूनही कधी एक शब्दही काढत नसत. वास्तविक हा वेळ पावेतो त्यानी बरेच कर्तृत्व गाजवले होते. म्हणूनच लताजी गायिका म्हणून मला जितक्या थोर वाटतात त्यापेक्षाही माणूस म्हणून त्या मला आभाळाएवढ्या श्रेष्ठ वाटलेल्या आहेत.

त्या वेळेपासून गेले दीड तप आमचा सतत एकत्र काम करण्याचा आणि एकत्र गाण्याचा योग येत आहे. या अवधीत आम्ही गाइलेली अनेक द्वद्वगीते लोकप्रिय झाली आहेत विशेषत त्यातील करुणरसप्रधान अशा द्वद्वगीतानी तर जनमनाची चागलीच पकड घेतली आहे. 'दिलमें समा गये सजन, फूल खिले चमन चमन' (सगदिल), 'तेरी चमकती आखोके आगे ये सितारे कुछ भी नही' (छोटे बाबू), 'गया अधेरा हुवा उजाला' (सुबह का तारा), 'दिल दिल से कह रहा है' (परछाई), 'तुम्हीं तो मेरी पूजा हो' (सोहागन) यासारखी आमची कितीतरी द्वद्वगीते चागलीच गाजली. अगदी अलीकडे आम्ही 'जहाँ आरा' या चित्रपटासाठी मदनमोहन याच्या सगीत दिग्दर्शनाखाली एकत्र गाइले आहोत. 'दाग' या चित्रपटातील एकच गीत मी दिलीपकुमारासाठी तर लताजी निम्मीसाठी गाइल्या. गीताचे शब्द आहेत 'ऐ मेरे दिल कहीं और चल'. हे गीत लोकप्रियतेचा नवाच उचाक प्रस्थापित करून गेले. आपण म्हटलेलेच गीत लताजींच्या तोंडून ऐकणे हा एक नवाच अनुभव होता.

लताजींच्या आवाजाबद्दल आणि गायकीबद्दल वेगळे काय बोलावे? अत्यत कठीण ताना आणि अवघड हरकतीही त्याच्या गळ्यातून लीलया निघतात. प्रत्येक सूर अगदी सचा आणि सुरेल असल्याने ऐकण्यास अतिशय आनददायक होतो. शास्त्रीय संगीताची त्याची जाणकारी इतकी की कोणतीही चीज आपल्या गळ्यात त्या सहजपणाने खेळवू शकतात—पेलू शकतात त्यामुळे चित्रपट क्षेत्रातील या पार्श्वगायिकेने शास्त्रीय सगीताच्या गाढ्या व्यासगी पडितानाही अनेकदा विस्मयचकित करून सोडले आहे. लताजींची ग्रहणशक्ती आणि निरीक्षणशक्तीही वाखाणण्याजोगी आहे. तसा गोड गळ्याच्या गायिका अनेक. पण भावपूर्णतेने गाऊन रसपरिपोष करण्याचे सामर्थ्य गळ्यात असणाऱ्या त्यापैकी फारच थोड्या. त्यामुळेच लताजींचे महत्त्व विशेष. अवघ्या तीन मिनिटाचे त्याचे गीतही रसिकाच्या हृदयावर विलक्षण परिणाम करून जाते.

मी लखनौचा, माझी मातृभाषा उर्दू. गीत गझलाच्या आवडीमुळे उर्दू साहित्याचा आणि विशेषत काव्याचाही मी थोडाफार अभ्यास केलेला पण लताजींचे उर्दू शब्दाचे उच्चार ऐकून मीच काय, उर्दूचे गाढे पडितदेखील थक होतात. उर्दू भाषेचा ढग त्याच्या गळ्याने बरोबर आत्मसात केला आहे. हे केवळ उर्दूपुरते नाही, तर ज्या ज्या भाषेतली गीते त्या गाइल्या आहेत त्या सार्याच भाषाच्या बाबतीत असे म्हणता येईल. प्रत्येक भाषा अवगत करून घेण्याचा त्यानी कसोशीने प्रयत्न केला आहे

एकदरीने कलावतांबद्दल आणि त्यातही विशेषत आपल्या सहकाऱ्यांबद्दल त्याना आदर आणि अभिमान वाटतो कलाकाराचा अपमान झालेला त्याना कधीही सहन होत नाही. या सदर्भात मला एक प्रसग आठवतो आहे. 'मेहरबानी' या चित्रपटाच्या गीताचे ध्वनिमुद्रण चालले होते. मी तेव्हा या क्षेत्रात नवाच होतो त्या दिवशी प्रथम माझ्या स्वतन्त्र गीताचे ध्वनिमुद्रण झाल्यावर मग माझे आणि लताजींचे द्वद्वगीत ध्वनिमुद्रित व्हावयाचे होते. पण तीन चार वेळा तालीम होऊनही

माझे गीत संगीतदिग्दर्शकाच्या मनासारखे जमत नव्हते. काय चुकत होते हे मलाही नीटसे कळत नव्हते. मी काहीसा नाराज आणि निराश झालो होतो. इतक्यात लताजी तेथे आल्या. त्याना पाहताच संगीत दिग्दर्शक महाशय चटकन मला म्हणाले, "तुमचं गीत राहू द्या आता बाजूला. मागाहून ध्वनिमुद्रित करू ते. अगोदर द्वंद्वगीत आटोपून घेऊ." लताजींना त्या संगीतकाराच्या बोलण्यातला कुत्सित भाव चटकन समजला. त्यानी अगोदर माझेच गीत झाले पाहिजे असा आग्रह धरला. आपल्या एका सहकाऱ्याचा असा अपमान झालेला त्याना सहन होईना. शेवटी मीच त्याना आग्रहपूर्वक सांगितले की आपल्याबरोबर गाइल्यावर मला आपोआपच स्फूर्ती येईल आणि त्या स्फूर्तीमुळे माझे गाणेही नक्तर जमून जाईल. तेव्हा कुठे त्या गायला तयार झाल्या. माझ्यासारख्या नवख्या कलाकाराच्या भावनांचीही त्यानी ही जी कदर केली त्याचे मला विशेष मोल वाटले!

पार्श्वगायकाच्या रॉयल्टीप्रकरणातही त्याच्या स्वभावाच्या या तेजस्वी पैलूचे दर्शन झाले. मी तेव्हा पार्श्वगायकाच्या संघटनेचा चिटणीस होतो. लताजींना रॉयल्टी मिळत होती पण सर्वच गायक कलाकाराना तिचा फायदा मिळावा या शुद्ध नि स्वार्थी हेतूने त्यानीही कंबर कसली होती. आणखी काही बड्या व्यक्तींनी योग्य ती साथ दिली असती तर ते प्रकरण निश्चितच धसाला लागले असते. पण शेवटी दुहीमुळे घोटाळा झालाच. या प्रकरणात लताजींना बराच मनस्ताप सहन करावा लागला, पण सहकाऱ्यासाठी त्यानी हे सारे शांतपणे सहन केले. लताजी आज आपल्या कलाजीवनाचा रौप्यमहोत्सव साजरा करीत आहेत. याच जीवनाचा हीरकमहोत्सवही असाच वैभवाने साजरा होवो!



गोपाळकृष्ण भोबे

# हा जादूगार गळा

जेव्हा लता मंगेशकर हे नाव ठराविक मर्यादेपलीकडे अन्य कुणाच्या माहितीत नव्हते तेव्हा मी त्यांना पाहिलेले आहे आणि आज त्या कीर्तिशिखरावर असतानाहि मी त्यांना पाहतो आहे. त्यांना मी नाटकात पाहिले आहे. गाण्याच्या बैठकीत गाताना पाहिलेले आहे. त्यांच्या चित्रपटातील भूमिका पाहिलेल्या आहेत. त्यांचे ध्वनिमुद्रण होताना पाहिलेले आहे, पण त्यांचा माझा परिचय मात्र अल्प आहे. तथापि संगीताच्या दुनियेत वावरण्याचा मला वारंवार योग येत असल्याने जे काही लताबाईंबद्दल मी ऐकले, त्यावर आधारित अशी त्यांची एक काल्पनिक व्यक्तिरेखा मात्र माझ्या दृष्टीसमोर कित्येक दिवस वावरत आहे.

"लताबाई, अगर आज आप नहीं गायगी तो मेरे भविष्य का क्या हाल होगा? मेरा भविष्य आपके हाथमें है! मेरा नाम होना आपके हाथमें है!" असे एक संगीत दिग्दर्शक कळवळून सांगतो, तर एक निर्माता म्हणतो, "लताबाई, अगर अपने 'ना' कह दिया तो मेरी जिंदगी ही खतम हो जायेगी!" एका चित्रपटातील भूमिकेसाठी लाखो रुपये मोजणारी अभिनेत्री आपल्या अटी सांगताना निर्मात्याला म्हणते, "पार्श्वगायिका म्हणून लताबाईंचीच निवड केलीत तरच मी काम करीन, ही माझी पहिली अट!" आणि भांडवलदार म्हणतात, "अमुक कलावंत, अमक्याचं कथानक, आणि लताबाईंची इतकी गाणी असतील तरच आम्ही भांडवल देऊ."

असे शेकडो उद्गार काढलेले, त्या क्षेत्रात वावरणारे लोक सांगतात. दोन्ही कानांची पाळी पकडून लताबाईंचे आभार मानतात.

काही दिवसांपूर्वीची गोष्ट. गेली बावीस वर्षे 'फिल्म लायनी'त असलेला एक वादनकार मित्र भेटला. नेहमीच पाठीशी बाघ लागल्यासारखा तो घाईत असायचा. आज तो बराच वेळ माझ्याशी बोलत उभा राहिलेला पाहून मी म्हटले,

"मित्रा, आज तुला इतका बोलायला वेळ कसा काय मिळाला रे!" त्यावर तो म्हणाला, "गेले पंधरा दिवस बसून आहे गड्या!" मी चेष्टेने म्हटले, "असं कधी झालंय! शक्यच

नाही!" त्यावर त्याने सांगितलेले कारण ऐकून मात्र मी थक्क झालो. तो म्हणाला होता, "लताबाईंचं स्वास्थ्य ठीक नाही म्हणून सगळी ध्वनिमुद्रणे बंद पडलेली आहेत!" "इतर पार्श्वगायिका नाहीत का?" असे मी म्हणताच तो हसला आणि म्हणाला, "आहेत, डझनांनी आहेत,. पण कहां राजा भोज और कहां—लताबाई ती लताबाई! आमच्या व्यवसायातली सम्राज्ञी ती!" आणि माझा तो मित्र लताबाईसंबंधी बोलत राहिला. सारखा बोलत राहिला.

"असा नोकदार, सुरीला आवाज...अहाहा. दुनियेत शोधून सापडायचा नाही असा आवाज. तिच्या सुरावर आम्ही आपली वाद्यं लावून घ्यावीत. संगीतदिग्दर्शक पाव टक्का चाल सांगतो, पण लताबाई त्यात स्वतःचा पाऊण टक्का घालून त्या चालीचं असं शंभर नंबरी सोनं करतात, की तो संगीतदिग्दर्शक अगदी प्राथमिक असला तरी त्याचं नांव होते. आज एका चित्रपटाचं संगीत निर्देशन करायला दीड लाख रुपये मागणारा तो आपला हा—तसा स्वभावानं अत्यंत गरीब—ज्यावेळी पहिल्यानंच संगीत दिग्दर्शक म्हणून तो उभा राहिला, त्या वेळची गोष्ट. त्यानं दिलेली पहिलीच चाल जेव्हा आम्हा वृंदवादकाना दाखवली त्यावेळी ती पोरकट चाल ऐकून आम्ही पोट धरून हसलो. लताबाई आल्या. त्यांनी ती चाल एकवेळ ऐकली. त्यांना काय कणव आली कोण जाणे. पण आपल्या दर्दभरी आवाजांत त्यांनी ती चाल अशी म्हटली, कीं तिचं झालेलं ध्वनिमुद्रण ऐकून आम्ही देखील थक्क झालो. मागाहून त्याच एका गाण्यावर तो चित्रपट तगला. तीच चाल सर्वतोमुखी झाली."

"कित्येक वेळां असं होतं कीं, लताबाईंना वेळ नसतो. आणि एखाद्या नवीन संगीत दिग्दर्शकाच्या कळवळीच्या विनंतीला त्यांनी शब्द दिलेला असतो. सारे म्यूझिशियन लोक डोळ्यांत तेल घालून वाट बघत बसलेले असतात. त्यानाही दुसरीकडे कामं असतात. ही वेळ साधून दुसऱ्या ध्वनिमुद्रणाचं काम करायचं असतं. आणि मग लताबाई घाईघाईने येतात. तो नवा दिग्दर्शक भिडस्तपणामुळे त्याना चाल सांगायला कचरतो. मग लताबाई काय करतात की तो गीत लिहिलेला कागद त्या हातात घेतात. वाद्यवृंदाला एक दोन वेळा चाल वाजवायला सांगतात आणि निर्देशकानं लावलेल्या मूळ चालीपेक्षा सुरेख असे कांहीतरी म्हणून टाकतात. तो पोरसवदा निर्देशक थक्क होतो!"

मी माझ्या मित्राला फुटपाथच्या कोपऱ्यावर बोलत उभा न करता इराण्याकडे घेऊन गेलो. स्थानापन्न झाल्यावर हलूच मी पुढचा प्रश्न केला—"काय रे, इतर बाबतीत बाई कशी आहे? की आपलं काम भलं आपण भलं अशा वृत्तीची!"

"मी सांगतो तुला, ही बाई स्वभावाने अतिशय हळूवार आहे; तितकीच ती अतिशय मानीही आहे. अपमान तिला जरा देखील सहन होत नाही. केवळ आपल्या व्यवसायातील सहकाऱ्यांचा देखील. एकदा काय झालं, की एका सज्जन संगीत दिग्दर्शकाचा एका निर्मात्यानं म्युझिशियनांच्या समोर जबरदस्त अपमान केला. कारण अगदी क्षुल्लक होतं. त्या निर्मात्याचं तें उद्धट वागणं आम्हा कुणालाही आवडलं नाही. पण आम्ही काही करूं शकत नव्हतो. लताबाई अजून आल्या नव्हत्या. दुसरीकडचं काम आटपून त्या रात्री दहाला येणार होत्या. अपमान असह्य होऊन तो संगीत दिग्दर्शक बिचारा एका कोपऱ्यात कपाळाला हात लावून बसला होता. आम्हाला तोंड दाखवणं त्याला जड होत असावं.

इतक्यात घाईघाईनं लताबाई आल्या. त्यांनी संगीतदिग्दर्शकाची चौकशी केली. मी त्यांना एका बाजूला नेऊन घडलेली सारी हकीगत सांगितली. त्यांना काय वाटलं कोण जाणे. त्या एकदम मागे फिरल्या आणि स्वतःच्या गाडीत बसून तडक घरीं गेल्या. निर्मात्यांना ही गोष्ट कळली तेव्हां त्यांनी धावाधाव केली. घरी फोन केले. पण दाद लागेना. शेवटी तो निर्माता स्वतः लताबाईंच्या घरीं गेला. लताबाईंनी त्याला चक्क सांगितलं, "म्युझिशियनांच्या समोर मी असताना त्या संगीतदिग्दर्शकाची माफी मागा, तरच मी येईन. नाहीतर तुम्ही परत जाऊं शकता. तुमचं माझं पटणं शक्य नाहीं."

लता

त्या दिग्दर्शकाने सर्वांसमक्ष त्या संगीत दिग्दर्शकाची माफी मागितली आणि हा सगळा प्रकार आटोपून रात्री दोन वाजता ध्वनिमुद्रणाला सुरवात झाली. असा आहे बाईंचा दरारा!"

आम्ही चहाचा घोट घेतला आणि बोलणे पुढे चालू झाले.

"बाईंच्या हळुवार मनाची गोष्ट सांगतो. एका गाण्याचे ध्वनिमुद्रण चालू होते. गाणं गझल पद्धतीचं होतं. साथीला असलेल्या तबलजीनं अशी अप्रतिम साथ केली की आम्ही सगळेच खूष झालो. निमायासकट सगळ्यांनी एकमुखाने त्याची तारीफ केली. पण नुसती तारीफ! झालं. ध्वनिमुद्रण ऐकून आम्ही बाहेर आलो आणि आपापल्या रस्त्याला लागायची तयारी करू लागलो. पण लताबाई त्या तबलावादकाची चौकशी करत होत्या. तो त्यांच्याजवळ आल्यानंतर त्या म्हणाल्या, "वाहवा! बहोत सुंदर बजाया आपने. ये लीजिये!" असं म्हणून त्यांनी त्याच्या हातावर काहीतरी ठेवलं. आम्ही पाहिलं. त्या गेल्यावर आम्ही चौकशी केली. त्या तबलजीच्या हातावर त्यांनी शंभर रुपयांची नोट बक्षीस म्हणून ठेवलेली होती."

मी म्हटले, "काही वर्षांपूर्वी कुणाशी त्यांच्या वडिलांची पुण्यतिथी साजरी करायचा संकल्प केला. आणि ती माणसं त्यांच्याकडे वर्गणी मागायला गेली. त्यांनी त्यांना रिक्तहस्ते तर परत पाठवलेच, पण पुण्यतिथीच्या कार्यक्रमालाहि त्या हजर राहिल्या नाहीत! मी चांगलं असं ऐकलं हो, खरं खोटं देव जाणे!"

"त्यांच्या वडलांची पुण्यतिथी साजरा करणारी ही माणसं कोण होती, त्यांचा अधिकार काय होता, याचा तू विचार केला आहेस का? मध्यंतरी पुण्यतिथ्या साजऱ्या करणं हा एक व्यवसाय होऊ पहात होता. कलावंत बिचारे आमंत्रण येतं, की भिडस्तपणानं आणि समाजाचा रोष होऊ नये म्हणून मुकाट्यानं येतात, फुकट कार्यक्रम देतात, आणि पुण्यतिथ्या साजऱ्या करणारे ठेकेदार आपले खिसे गरम करतात. लता मंगेशकरांच्या वडलांची पुण्यतिथी साजरा करण्याचा या सोमाजी गोमाजींना काय अधिकार होता? ते दीनानाथांचे शिष्य होते की अनुयायी होते, की सहकारी होते, होते कोण? त्यांनी आधी चौकशी केली असावी. पुण्यतिथी साजरी करणाऱ्यांची मनीषा अजमावली असावी आणि नंतरच नकार दिला असावा. आणि कुणीही बोलावलं की उठसूट जायला, असं वागायला ती काय मामुली बाई आहे!"

"काय रे, लताबाईंच्या शास्त्रीय संगीताच्या ज्ञानाबद्दल तुझं काय मत आहे?"

"गेल्याच वर्षाची गोष्ट. एका चित्रपटात नायिकेला शास्त्रीय संगीत शिकवण्याचा प्रसंग होता. पार्श्वगायिका अर्थातच लताबाई होत्या. उस्तादाच्या आवाजासाठी दिल्लीहून मुद्दाम एका घरंदाज गवय्यांना बोलावून आणलेले होते."

"तालीम सुरू झाली. त्या गवय्यांनी 'मियांच्या मल्हारा'तील आलापी सुरू केली व आरोहाअवरोहाची एक अवघड अशी पल्लेदार तान घेऊन ते पुन्हा षड्जाला थांबले. त्यांनी लताबाईंना इशारा केला. लताबाईंनी तानदतोब त्या बिल्पतीच आणि तानेच अनुकरण केलं अन् तारसप्तकाच्या मध्यमावरून आंदोलन घेऊन त्या षड्जाला अशा रीतीनं भिडल्या की आम्हा सर्वांच्या काळजाचं पाणी पाणी झालं. तो गवय्या सद्गदित होऊन म्हणाला, वहावा! क्या बात है! कैसी मुलायम बिजली जैसी तान और कैसी सुरीली मीठी आवाज! इस षड्ज ने तो मेरे उम्रभर के रियाज को पानी में मिला दिया! वाहवा!"

माझ्या मुखं मित्रानं लताबाईंचं गुणगान करून माझ्या त्यांच्याबद्दलच्या विचारांना अधिक गती दिली. एक असामान्य व्यक्तिरेखा मनात साकार होऊ लागली. जागृतीतले अठरा तास दाही दिशांत गुंजून राहिलेला तो आवाज. समाजाच्या सर्व थरांतील लोकांना मोहून टाकणारा तो आवाज कैफ चढवू लागला. मी त्यांची गाणी आठवू लागलो. शेकडो गाण्यांनी गर्दी केली. कुठले चांगले, कुठले वाईट हा

निर्णय लागेना. एकात हा सूर गोड आहे तर एकात ही मींड चांगली आहे. एकात ही हरकत चांगली आहे तर एकात अत्यंत कठीण अशी गिरकीची तान आहे. एकात उत्तम बेहलावा आहे तर एकात सगमगीत पक्का आहे. काही ठिकाणी उत्कृष्ट शब्दोच्चार, काही ठिकाणी ठसका, रसपरिपोषासाठी काही ठिकाणी अस्खलितपणा, लाघवीपणा इत्यादी गुणविशेषांनी नटलेली, बेताल माणसानाहि तल्लीन मान हलवायला लावणारी ती श्रुतिमधुर गाणी त्यांचं वर्गीकरण करणे मला कठीण जाते.

कुठे कोमल 'ऋषभ' काळजाचे पाणी करतो, तर कुठे 'गांधार' विस्मित करतो. कुठे कोमल निषाद इतक्या योग्य प्रमाणात लागतो की वाटते इतरे गाणे ऐकले पण असा प्रमाणबद्ध कोमल निषाद क्वचित ऐकायला मिळाला. रागदारी मूर्तिमंत होऊन डोळ्यासमोर उभी राहाते. दरबारी, सोहा, अडाणा, जौनपुरी, मल्हार, सारंग, शुद्धसारंग, जयजयवंती, बागेश्री, ललत, तोडी, भैरव, मालकंस, भैरवी, आणि सगळे थाट इथे गोळा झालेले आहेत.

या गळ्यातील आवाज नुसताच गोड आणि स्वरेल नाही तर त्याला नैसर्गिक वजनही आहे. सर्व स्वरालंकारात रसयुक्त भावना आहेत, व त्यांचा उपयोग कसा करायचा हे योजनाचातुर्यही त्यांनाही जवळ पूर्णांशाने आहे. मान करुण आणि शांत रसात त्या विशेष तन्मय होतात. तो त्यांचा स्थिरच असावा. पूरब, पंजाब, महाराष्ट्र, दक्षिण इत्यादि प्रांतातल्या गायकीतील पद्धतीची सर्व वैशिष्ट्ये, गेय संगीतातील नखरा वगैरे गुणांचा आविष्कार त्यांच्या गळ्यातून सहजरीत्या होतो किंबहुना पाश्चात्य संगीत आणि लोकसंगीत यात देखील त्यांच्या गळ्याने उच्च प्रतीची किमया करून दाखविलेली आहे.

'तीन्ही सांजा सखे मिळाल्या' ही कविवर्य तांबे यांची कविता म्हणताना 'देई वचन तुला' हे कडवे संपवताना मुरड घालून घेतलेली ती भावमधुर तान! किंवा त्यातल्या 'कर करी धरिला' म्हणताना तारसप्तकातील ऋषभाची आस दाखवून घेतलेली तान त्यात जी विलक्षण आवेगाची, भावनेची जाणीव प्रतीत होते तशी दुसऱ्या कुणाच्या गळ्याने कितीहि चांगले अनुकारले तरी होणे शक्य नाही!

नित्य नवी उमेद उत्पन्न करणारा, थक्क करणारा असा हा अद्‌भुत जादुगार गळा.



स्ता

नर्गिस

# सुरांची राणी

संगीतकार शंकर जयकिशन माझ्याजवळ लताची स्तुती अनेक वेळा करीत असत. शंकर तर म्हणत असे की अशा मधुर आणि सुरेल आवाजाची गायिका आपल्या तरी पाहण्यात दुसरा नाही. त्यामुळे लताचे गाणे ऐकण्याची आणि तिला भेटण्याची उत्सुकता कितीतरी दिवस मी मनात बाळगून होते. 'बरसात'चे चित्रण चालू असताना बरसातची ध्वनिमुद्रित झालेली गीते त्याने मला ऐकवली आणि परमेश्वराने ह्या गायिकेच्या गळ्यावरून मधाची बोटेच फिरवलेली आहेत असे मला वाटले. ती लताची गाणी अंतःकरणापासून निघत होती म्हणूनच काळजाला जाऊन भिडत होती. ही पोरगी लोकप्रियतेच्या अत्युच्च शिखरावर जाऊन बसणार असे भविष्य माझ्या मनाने तेव्हाच वर्तवले होते.

आजचे लताजींचे धवल यश, अमाप वैभव आणि त्यांना लाभलेली अमाप जागतिक कीर्ती पाहताना एक आवाज केवढे आधिपत्य गाजवू शकतो याची प्रतीती येते. त्यांचे हे स्थान हिरावून घेण्याचे सामर्थ्य असलेली गायिका जन्माला यावयास कित्येक युग लागतील. ही अतिशयोक्ती नाही. 'प्रतिलता', 'सवाई लता' बनवण्याच्या घोषणा मी ऐकते तेव्हा मला हसू येते. पार्श्वगायिका अनेक असतील, नवनवीन उद्यालाही येतील, आणि तरीही लता मंगेशकर या लता मंगेशकरच राहतील. हा आवाजच वेगळा, त्याची जातच आगळी. 'प्रतिलता' बनण्याची स्वप्ने ज्यांना रंगवायची असतील त्यांनी ती अवश्य रंगवावीत, पण ती स्वप्ने साकार होणार नाहीत ही मात्र काळ्या दगडावरची रेघ आहे!

लतांनी 'बरसात'मध्ये प्रथमच माझ्यासाठी गाइल्या. तेव्हापासून रजतपटावर आलेल्या माझ्या शेवटच्या चित्रापर्यंत त्या सदैव माझ्यासाठी गात होत्या. 'कुछ दिन पहिले एक हसका जोडा' हे माझ्या अभिनयातून साकार झालेले त्यांचे गीत खूपच गाजले होते. त्यावेळी मला त्यांच्या गीताचा होणारा आनंद काही वेगळाच असायचा. आता मी संसार, पती, मुले यांच्यामध्ये रमून गेले आहे. त्यांची गाणी रेडिओवर ऐकण्यावरच समाधान मानावे लागते आहे आणि तरीही नुकताच एक गमतीदार अनुभव मी घेतला तो सांगण्यासारखा आहे.

राज खोसला यांच्याकडे आम्ही दोघे जेवायला गेलो होतो. नव्या दमाचे संगीतकार लक्ष्मीकांत

प्यारेलाल हेही तेथे आले होते. या जोडीने एका नव्या चित्रपटासाठी लताजींचे एक वेगळेच गीत ध्वनिमुद्रित केले होते. लताजी आपल्या आवडत्या नरजहाँच्या ढगाने ते गीत गाइल्या आहेत. त्या दोघानी ते गीत मला ऐकवले. मी डोळे मिटून अगदी तन्मयतेने ते गीत ऐकले आणि ते सपताच माझ्या छोट्या मुलासारखे नाचावे—नागडावे असे मला वाटू लागले. समारंभ संपून घरी पोहोचावयास रात्रीचे बारा वाजले, पण तरीही त्या गीताची मनावरील धुंदी काही उतरेना. घरात पाऊल टाकताच अगदी न राहवून मी फोनकडे धावले. वाघडी निवातपणे झोपली होती. मी माझे नाव सांगून 'लताजींना उठवा' असे काकुळतीने म्हटल्यावर कोणीतरी त्याना उठवले असावे. लताजींनी फोन कानाला लावला आणि मी एकटी अखंड पधरा वीस मिनिटे देहभान हरपून त्या गीतावर त्यांच्याशी बोलत राहिले. उचबळून आलेल्या भावनाना शब्दाची नेमकी वाट दिसत नव्हती. मी कशी वेहोष झाले आहे हेच बहुधा मी पुन्हा पुन्हा ऐकवले असावे. अजून ही धुंदी मी अनुभवते आहे.

बरसातची गीते पडद्यावर साकार करताना मला कधी सायासच पडले नाहीत. गीताचे सूर कानी आले की आपोआपच त्या प्रसगातील भावना मनात उमटायला लागत आणि अभिनयातून दाखवता येत. त्यांचा आवाजही माझ्या आवाजाशी जुळतो आहे असे वाटायचे. देह वेगळे असतील पण अन्तःकरणाचे नाते आहे असे वाटायचे.

लताजींच्या पहिल्या भेटीचा प्रसंग मला आठवतो आहे. 'आवारा' चित्रपटातील एका गीताचे ध्वनिमुद्रण ताडदेवच्या फेमस सिने लॅबोरेटरीत चालले होते. मी प्रत्यक्ष ध्वनिमुद्रण चालू असताना ते गीत ऐकावे अशी शंकर जयकिशन याची इच्छा होती. मी गेले तेव्हा वादकासह गाण्याची तालीम चालू होती. मी रेकॉर्डिस्ट मित्र कावक याच्या शेजारी जाऊन बसले. तेथून मला लताजींची फक्त पाठमोरी आकृती दिसत होती पाढऱ्या शुभ्र वस्त्रातील ती कृश मूर्ती पाहून मनात आले, "एवढासा जीव पण आवाजाना जोप काही वेगळाच आहे!" गीत मुद्रित झाले आणि आम्ही एकमेकींना भेटले पण वर्षानुवर्षे त्यांच्या आवाजावर वेहोष होऊन मी प्रेम केले होते त्या लताजींशी प्रत्यक्षात मात्र काहीच बोलता आले नाही. मी त्यांचा प्रेमभराने हात दाबला फक्त. खरे म्हणजे मला त्याना कितीतरी सांगायचे होते. त्यांची गीते पडद्यावर साकार करताना मी अनुभवलेल्या अनंतविध भावना त्याना ऐकवायच्या होत्या. परंतु त्यापैकी काहीच मी सांगू शकले नाही—अशी ही पहिली भेट. आज त्या औपचारिक परिचयाचे गाढ मैत्रीत रूपांतर झाले आहे. त्या माझ्या कुटुंबियांपैकी एक बनल्या आहेत. माझे पती सुनील दत्त लताजींना आपली बहीण मानतात. बहीणभावडाच्या प्रेमामुळे दरवर्षी येणाऱ्या रक्षाबंधनाच्या सणाला माझ्या घरात एक वेगळेच महत्त्व प्राप्त झाले आहे

लताजी जशा माझ्यासाठी तशाच इतर नायिकासाठीही गायल्या आहेत. प्रत्येक वेळी असे वाटते की हा आवाज, ही म्हणण्याची पद्धती या गायिकेशी अगदी जुळते आहे. हेच त्यांच्या यशाचे एक रहस्य असावे चतुर आणि सर्वांगीण तयारी असलेली गायिकाच अशा विविध ढगानी गाऊ शकेल. आपल्या गीतातून गीत गाणाऱ्या स्त्रीचे व्यक्तित्व, व भावना, प्रसंग, वातावरण त्या उभे करतात. प्रसन्न करण्याची, आतुर करण्याची, व्याकुळ करण्याची अशी वेगवेगळी शक्ती त्या सुरात आहे. त्यामुळे त्यांनी करुण गीते पडद्यावर आणताना डोळ्यातून आसवे यावीत म्हणून मला कधी ग्लिसरीन वापरावे लागले नाही. 'आग' चित्रपटाच्या वेळी 'राजा की आयेगी बरात' हे त्यातील माझे आवडते गीत चित्रणाच्या वेळी मी ऐकले आणि दुःखाने भारावलेल्या अतःकरणानेच कॅमेऱ्यापुढे जाऊन उभी राहिले. साऱ्या प्रसंगाच्या कल्पनेने आणि त्या आर्त सुरानी मला कितीतरी वेळ हुदके येत होते. ते चित्रण संपले तराही माझ्या मनावरचा तो परिणाम पुसला गेला नव्हता. आणि आज इतकी वर्षे उलटली तरीही मी तशीच आसवे गाळीत ते गीत ऐकते

लता

असाच लताजींच्या आवाजाचा प्रभाव 'मदरइंडिया'च्या चित्रणाच्या वेळी मी आणखी एकदा अनुभवला आहे. 'मेरे लाल आजा' हे गीत एक वृद्ध माता म्हणते आहे असे चित्रपटात दाखवायचे होते. मला, वृद्ध माता गीत म्हणते ही कल्पनाच कशीशी वाटली आणि मी तसे मेहबूबसाहेबाना बोलूनही दाखवले. गीत ध्वनिमुद्रित झाले होते. 'नौशाद'ची स्वररचना श्रुतिमधुर होती परंतु गीताला अनुरूप जागा नसल्याने ते फुकट जाईल असे वाटत होते. गीत वगळायला मेहेबूबसाहेब फारसे राजी नव्हते. शेवटी चित्रण संपले आणि संपूर्ण चित्रपट पाहताना कळले की ते गीत हास्यास्पद न होता थिएटरमध्ये अनेक हृदयें भारून टाकणारा परिणाम निर्माण करीत आहे. लताजींच्या आवाजाचा हा प्रभाव आहे!

आपल्या देशातील आबालवृद्ध लताजींच्या रसपूर्ण गायकीवर जसे संतुष्ट आहेत तसेच अनेक परदेशी लोकही त्यांच्याबद्दल कमालीचं कुतूहल बाळगून आहेत. भारतात जेव्हा परदेशी शिष्टमंडळे येतात तेव्हा त्यांचा आग्रह असतो, "लताच्या गाण्याचे कोठे ध्वनिमुद्रण असेल तर सांगा, आम्हाला त्यांना प्रत्यक्ष गाताना ऐकायचे आहे!"

लताजींची ही लोकप्रियता नटांच्या लोकप्रियतेसारखी क्षणिक न ठरता वयोमानाबरोबर वाढतच गेली आहे. आणि ह्या लोकप्रियतेबरोबर एक व्यक्ती म्हणूनही त्या उंचावतच गेल्या आहेत. मित्रांसाठी त्यांनी काय काय केले आहे ते त्यांचे त्यानाच माहीत—किंवा त्यानाही माहीत नसावे! दुसऱ्याच्या दु:खाने त्यांच्या डोळ्यातून आसवे गळलेली आहेत, त्याप्रमाणे दुसऱ्याच्या सही सही नक्ला करून त्यांनी आम्हाला पोटभर हसवलेही आहे. त्यांची मैत्री माझा आधार आहे आणि त्यांचे गाणे हा माझा विसावा आहे.

तुम जिओ हजारो साल, साल के दिन हो पचास हजार!



वसंत जोगळेकर

# दीनानाथरावांची मुलगी

पंचवीस वर्षे एखादा व्यवसाय प्रामाणिकपणे करणे आणि
त्या व्यवसायात अत्युच्च मान आणि कीर्ती मिळविणे ही
साधारण गोष्ट नव्हे. हे भाग्य फार थोड्या व्यक्तींच्या
नशीबात असते कलेच्या क्षेत्रात तर ही गोष्ट दुर्मिळच
असते कारण कालानुसार ज्ञान वाढते, अनुभव मिळतो पण शरीर थकत असते त्यामुळे ज्ञान आणि
अनुभव असूनही माणूस हळूहळू आपले स्थान गमावीत असतो सृष्टीचा हा नियम आहे पण काही
व्यक्ती अशा असतात की काळ जातो तसतशा त्या अधिकच तेजाने तळपत राहतात आणि आपले
उच्च स्थान त्या सतत टिकवतात या अशा अलौकिक व्यक्तींमधे आज प्रामुख्याने अग्रेसर असलेली
व्यक्ती म्हणजे लता मंगेशकर ही लता मंगेशकर व्यक्ती म्हणून कशी आहे ते मी सांगणार आहे
तिच्या संगीताबद्दल तर आपणा सर्वांचेच एकमत आहे

लताची माझी ओळख झाल्याला आज पंचवीस वर्षे झाली आहेत या पंचवीस वर्षांचा सहवास
सुखाचा आहे कारण या दीर्घ कालावधीत आम्हा दोघांचे एकदा देखील भांडण झालेले नाही चित्रपट
व्यवसायात गैरसमज आणि भांडण व्हायला कारणच हवे असते असे नाही आजूबाजूचे लोक ते काम
इमानेइतबारे करतात पण एकमेकांबद्दल विश्वास आणि आदर असला तर मात्र त्यांची कामगिरी
सफल होत नाही आजपर्यंत तरी झाली नाही पुढचे कोणी सांगावे ?

एकोणिसशे बेचाळीस हा सन नक्की तारीख आठवत नाही, पण महिना आठवतो, तो मार्च
असावा स्थळ पुण्याच्या सरस्वती स्टुडिओतील माझे ऑफिस मी त्यावेळी 'किती हसाल
मराठी चित्रपट दिग्दर्शित करत होतो हा माझा दिग्दर्शक म्हणून पहिला चित्रपट होता एक दि
दुपारी मराठी रंगभूमीवरील प्रसिद्ध नट अविनाश माझ्या ऑफिसम ये आले त्यांच्याबरोबर ?
बारा वर्षांची फ्रॉक घातलेली एक मुलगी आली होती त्या चित्रपटात एका लहान मुलीची भू
होती आणि त्यासाठी मी मुलीच्या शोधात आहे असे मी त्यांना सांगितले होते ते मला म्हण
"वसंतराव, हिचं नाव लता हिच्याबद्दल मी तुम्हाला सांगितले होते गाते अतिशय उत्तम
त बोलत होते आणि मी त्या छोट्या मुलीकडे पहात होतो तिचा रंग सावळा होता केसाला तप

लता

लताल्यामुळे ते चण्व बसले होते. ती टगणी होती. रोड होती. एक गोष्ट मात्र माझ्या नजरेत भरली. ती म्हणजे तिचे स्मित. फार लाघवी हसली ती पोरगी. तिचे डोळेही विलक्षण सुदर होते. त्यात आत्मविश्वास होता. अविनाश बोलत होते "आणि ही कोण आहे, माहीत आहे? दीनानाथरावाची ही मोठी मुलगी."

दीनानाथरावांचे नाव ऐकल्याबरोबर मला शाळेतले दिवस आठवले. बलवत संगीत मडळी आमच्या गावी आली होती आणि मी त्याची बरीच नाटके पाहिली होती. त्याची लतिका, तेजस्विनी, कालिंदी ही कामे मला अजूनही आठवतात. त्यावेळी गाण्यातले मला फारसे काही कळत नव्हते. पण लोक त्याना आठ आठ वन्समोअर द्यायचे यावरून ते फार मोठे गाणारे होते एवढे मात्र कळले होते. लताकडे मी आता आपुलकीच्या नजरेने पाहू लागलो तेवढ्यात तिने एक गाणे म्हटले आणि मग तर मला ती सुदरच दिसू लागली. तिचे खरे रूप मी पाहिले. आणि त्या दिवसापासून ती मला सुदरच दिसते. ती मला खूप आवडली आणि तिचे पहिले गाणे दोन दिवसानी आम्ही ध्वनिमुद्रित केले. मी तिच्याजवळ उभा होतो. गाण्याच्या ओळी होत्या. "नाचू या गडे खारी मनी हौस भारी" चित्रपटासाठी गाइलेले हे तिचे पहिले गाणे होते. दुर्दैवाने लता त्या चित्रपटात काम करू शकली नाही. कारण थोड्याच दिवसात दीनानाथरावांचे देहावसान झाले आणि तिच्या डोक्यावरील पित्याचे प्रेमळ छत्र नाहीसे झाले.

फार लहान वयात लताला कुटुबाची जबाबदारी उचलावी लागली. ती स्वत लहान होती तरी तिच्या इतर भावडात ती वडील होती. विनायकराव त्यावेळी पुण्याला होते. तेही दीनानाथरावाचे भक्त होते. त्यानी लताला आपल्या छत्राखाली घतले. आणि थोड्याच दिवसात ती आणि तिची आई व भावडे तिच्याबरोबर कोल्हापूरला विनायकरावाच्या नवीन सुरू केलेल्या प्रफुल्ल पिक्चर्समध्ये दाखल झाली. थोड्याच दिवसात मीही प्रफुल्लमध्ये दिग्दर्शक म्हणून सामील झालो. आणि 'चिमुकला संसार' या चित्रपटाची जबाबदारी माझ्यावर सोपवण्यात आली. या चित्रपटात लताला एक भूमिका होती. पुन्हा आमचा दोघाचा एकत्र काम करण्याचा योग आला. परकरपोलक्यात वावरणारी ही मुलगी सर्वांची आवडती झाली. ती प्रेमळ होती. वडील मडळींचा मान ठेवणारी होती. लाघवी होती. तिच्या गाण्याबद्दल तर प्रश्नच नव्हता आणि अभिनयात मुद्रा तिचा समज वाखाणण्याजोगा होता लताने एकदाही री टेक केलेला मला आठवत नाही 'प्रफुल्ल'ने दीनानाथरावाची पुण्यतिथी साजरी केली त्यावेळी कोल्हापूरच्या पॅलेस थिएटरमध्ये आम्ही एक कार्यक्रम केला होता. लताने 'मैं क्या जानू क्या जादू है' हे सैगलचे गाणे आणि 'शूरा मी वदिले' ही गाणी म्हटली आणि प्रेक्षकाकडून टाळ्या मिळवल्या. आर्थिकदृष्ट्या लता त्यावेळी काळजीत असायची पण तिच्या तोंडून त्याबद्दल एक शब्दही कधी निघाला नाही किंवा तिने कोणाजवळही कधीच काही मागितले नाही. इतकी ती त्या वयातही स्वाभिमानी मुलगी होती. लहान वयात तिचे पितृछत्र नाहीसे झाले होते. तिच्यावर दु खाचा डोंगर कोसळला होता. पण या लहान मुलीने आपले दु ख आपल्या हृदयात लपवून ठेवले. आणि चेहऱ्यावर हसू आणले. आजपर्यंत तेच हसणे तिच्या चेहऱ्यावर तसेच आहे.

त्यानंतर 'प्रफुल्ल' सोडून मी मुंबईला आलो आणि शेचाळीस साली 'आपकी सेवामें' या चित्रपटासाठी पुन्हा लताने पार्श्वगायिका म्हणून माझ्याबरोबर दोन गाणी ध्वनिमुद्रित केली. पार्श्वगायिका म्हणून ही तिची सुरुवात होती लताच्या आयुष्याला स्थैर्य येण्याची चिन्हे दिसत होती पण त्या स्थैर्याची चाहूल लागते न लागते तोच पुन्हा एक अघटित घटना घडली. विनायकरावांचे देहावसान झाले. पुन्हा लताची वणवण सुरू झाली कुटुबाची जबाबदारी, ज्वळ संचय नाही, अशा परिस्थितीत वडलांच्याकडून चालत आलेला गाण्याचा वारसा तिच्या मदतीला धावला. लताच्या अगी हिंमत होती, प्रामाणिकपणा होता, दु ख पचवण्याची शक्ती होती. विलक्षण आत्मविश्वासाने

ती पुढे निघाली, ती मागे न पहाण्याचा निश्चय करूनच. आणि त्यानंतर तिने मागे पाहिलेच नाही. तिचे पाऊल पुढेच पडत राहिले. तिने पार्श्वगायनात प्राविण्य मिळवण्याचा निर्धार केला. सुरवातीला अवहेलना वाट्याला आली. पण ती ध्येयापासून जरा देखील ढळली नाही. आणि थोड्याच दिवसात चित्रपटातील नायक आणि नायिकांपेक्षाही ती जास्त लोकप्रिय झाली. पैसा तिच्या पायावर लोळण घेऊ लागला. तिची कीर्ती भारताच्या बाहेर देखील दरवळू लागली. लता मंगेशकर हे नाव प्रत्येक घरात आदराने आणि आपुलकीने उचारले जाऊ लागले.

पण लता मात्र दुर्दैवाच्या तडाख्यामुळे अंतर्मुख बनली होती ती तशीच राहिली. तिचे व्यक्तिमत्व बहरले पण ती जास्तच अंतर्मुख बनली. तिच्या या स्वभावामुळे तिच्याबद्दल क्वचित गैरसमज निर्माण झाले तरी देखील ती गप्पच राहिली. माणसाच्या चांगुलपणावरील तिचा विश्वास ढळला नाही. कुटुंबाची जबाबदारी तिने पार पाडली. भावंडांचे संगोपन केले. आईला सुख दिले. कन्या म्हणून असलेली आपली जबाबदारी तिने यशस्वीपणे पार पाडली आहे. तिची सर्व भावंडे आज समर्थ झाली आहेत. लताच्या कष्टांचे आणि मेहनतीचे सार्थक झाले आहे.

लता अतिशय हुषार मुलगी आहे. तिला शिक्षण घेता आले असते तर त्या क्षेत्रात देखील तिने असाधारण यश मिळवले असते याबद्दल मला खात्री आहे. कामाच्या रगाड्यात सापडली असूनही वृत्तीने ती विद्यार्थिनीच राहिली आहे. निरनिराळ्या भाषा तिला अवगत आहेत. संतवाङ्मयाचा तिचा व्यासंग दाडगा आहे तसाच उर्दू शायरीचाही. जे कार्य ती हाती घेते त्याच्याशी ती पूर्ण समरस होते आणि ते कार्य यशस्वी करण्यासाठी अहोरात्र मेहनतही करते. संभाषणात लता चतुर आहे आणि तिची विनोदबुद्धीही तल्लख आहे.

तिच्या अंतर्मुख स्वभावामुळे आणि कोणालाही शक्य तोवर न दुखवण्याच्या वृत्तीमुळे तिच्या-बद्दल गैरसमजही भरपूर आहेत. तिच्याबद्दल विशेष आस्था आणि आपुलकी नसलेले काही लोक आज तिचे चाहते आहेत. काही लोक आज तिचे शत्रू झाले आहेत. ती वरकरणी हसतमुख असली तरी तिच्याबद्दल उठणाऱ्या अफवा आणि गैरसमज तिला मनातून अतिशय कष्टी करतात. मग ती स्वतःलाच त्रास करून घेते आणि त्यामुळे तिच्या प्रकृतीवर त्याचा परिणाम होतो.

लता एक निकोप आणि स्वच्छ मनोवृत्तीची व्यक्ती आहे. तिला समजून घेण्याचा प्रयत्न केला आणि स्वार्थ नसला तर ती एक अत्यंत विश्वासू मित्र आहे. या मंगेशकर कुटुंबातले सर्वच लोक कलावंत आहेत. प्रेमळ आहेत. तसेच लहरीदेखील आहेत. आशा भोसले हे नाव देखील लताच्या बरोबरीने लोकप्रिय आहे. ही मुलगी लतापेक्षा वेगळी आहे. लता अंतर्मुख (introvert) आहे तर ही बहिर्मुख(extrovert) आहे. राग आला तर आशा स्वतःला त्रास करून घेत नाही. ती लगेच बोलून मोकळी होते. उषा देखील गाते. गाण्याबरोबर तिला चित्रकला देखील अवगत आहे. मीनाही गात असे, पण आता ती गृहिणी झाली आहे. धाकटा बाळ अतिशय सज्जन मुलगा आहे. तो उत्तम गातो आणि शिवाय तो उत्कृष्ट संगीतदिग्दर्शक आहे. माई आपल्या कर्तबगार मुलांचे कौतुक प्रेमळ-पणाने पाहात आहेत, त्यांना प्रोत्साहन देत आहेत, त्यांची दृष्ट काढीत आहेत. सर्वत्र आबादीआबाद आहे, सुख आहे, समाधान आहे.

सर्वजण आयुष्याची वाटचाल करीत आहेत आणि सर्वांच्या पुढे आहे ती मुलगी. जिच्या डोळ्यांत विलक्षण आत्मविश्वास आहे, चेहऱ्यावर लाघवी स्मित आहे, हृदयात प्रेम आहे आणि गळ्यात दिव्य गोडवा आहे,—जिची माझी पंचवीस वर्षांपूर्वी ओळख झाली आणि अजूनही ती ओळख कायम आहे, ती दीनानाथरावांची मुलगी लता.

जयश्री गडकर

# माझा आदर्श

गेल्या सव्वीस जानेवारीला भालजी पेंढारकर यांच्या 'तांबडी माती' या चित्रपटाचा मुहूर्त कोल्हापूरच्या 'जयप्रभा' स्टुडिओत झाला. लताबाई त्या समारभाला उपस्थित होत्या. प्रत्यक्ष कॅमेन्यापुढे जाण्यापूर्वी मी भालजींच्या—बाबांच्या पायाला स्पर्श केला आणि त्यांच्या पलिकडेच उभ्या असलेल्या लताबाईंना नमस्कार करण्यासाठी खाली वाकले. लताबाई मागे सरकत म्हणाल्या, "अहो, माझ्या कसल पाया पडता! आपल्या आई आज इथ आल्या आहेत. त्यांचा आशीर्वाद घ्या म्हणजे झाल. आईच्या आशीर्वादात सर्वांचे आशीर्वाद असतात."

मी त्यांना नमस्कार करून म्हणाले, "आईचे आशीर्वाद माझ्या पाठीशी आहेतच, पण मला आपलेही हवे आहेत. आज माझ्या चित्राच्या मुहूर्ताला आपण उपस्थित राहिलात—केवढ माझ भाग्य!"

नमस्कार करताना माझे लक्ष लताबाईंच्या पायातील सोन्याच्या साखळ्याकडे गेले होते आणि मनात विचार येऊन गेला होता, बाई मोठ्या भाग्यवान आहेत गळ्यात सरस्वती आहे, पायाशी लक्ष्मी लोळण घेते आहे!

लताबाईंच्या आणि माझ्या गाठीभेटी तशा पुष्कळ वेळा झाल्या असतील परतु त्यांच्या आणि माझ्या गप्पा गप्पा झाल्या आहेत असे मात्र कधीच घडले नाही. त्यांची भेट व्हावी आणि एरवीच्या माझ्या बडबडण्याला खीळ बसावी असेच घडत आले आहे. लहानपणापासून मी त्यांच्या गाण्याची चाहती. त्या सुरानी अनेकदा मला हसविलेले—रडविलेले. परतु प्रत्यक्षातील लताबाईंची भेट नेहमीच आदरयुक्त भीतीने भारावलेली!

रजतपटावर त्यांची गीते म्हणताना त्या गाण्यानी निर्माण केलेल्या भाववृत्ती साकार करण्याची धडपड मी माझ्याकडून करते. ही धडपड लताबाईंनाही मान्य झाल्याचे अलिकडच्या त्यांच्या एका लेखावरून मला कळले आणि मला फार आनद झाला. माझ्या श्रमाचे चीज झाले असे वाटले. पण खरे म्हणजे हे श्रेयही माझे नाही, त्यांचेच आहे. त्यांची गाणी ऐकली की तशी स्फूर्ती येते, योग्य

हावभाव होऊ लागतात, ओठांची हालचाल, अंतःकरणाला जाऊन भिडलेल्या भावनेने अगदी योग्य दर्शन होऊ लागते. हा केवळ माझाच अनुभव नाही तर त्या ज्यांच्या ज्यांच्यासाठी गातात त्या सान्यांचा आहे.

लताबाईंच्या लहानपणातील गोष्टी सांगताना माझी आई अद्यापही रंगून जाते. माझ्या वडलांनी दीनानाथांच्या गाण्याच्या मैफलीत अनेक वेळा तबल्यानी साथ केलेली. त्यांनीही लताबाईंना लहानपणापासून पाहिलेले आहे. ते अनेकदा लताबाईंच्या स्मरणशक्तीच्या आणि सूक्ष्म निरीक्षण शक्तीच्या आठवणी सांगतात. हे ऐकताना मी मनोमन एखाद्या देवतेप्रमाणे त्यांची पूजाच बांधीत असते. अनेकदा मला वाटते की, लताबाई कळत नकळत अगदी लहानपणापासून माझ्या समोरचा एक आदर्शच होत्या. त्या माझे मोठे श्रद्धास्थान आहेत. म्हणूनच त्यांच्या माझ्यामध्ये एक भीतियुक्त अंतर नेहमीच राहात आलेले आहे.

थोड्याच दिवसांपूर्वी महाराष्ट्र राज्याकडून 'उत्कृष्ट अभिनेत्री' म्हणून मला पारितोषिक मिळाले. लताबाईंनी अभिनंदनासाठी मला फोन केला. खूप कौतुक करून 'असाच नेहमी यशस्वी व्हा' असा आशीर्वाद दिला. मी मात्र आभाराच्या दोन शब्दांखेरीज काहीच बोलू शकले नाही. फोन बंद केल्यावर शेजारीच उभी असलेली माझी आई म्हणाली "वेंधळीच आहेस, अग, त्यांचं पण नाही का अभिनंदन करायचं! त्यांनाही खूप बक्षिसं मिळाली आहेत." बावरलेल्या माझ्या मनाला माझी चूक कळली पण ती दुरुस्त करण्याचे धाडस मला अजून झालेले नाही! हे असेच आमचे नाते आहे!

चित्रपटांतील अनेक आठवणी माझ्या मनात जाग्या आहेत. 'मोहित्यांची मंजुळा' मध्ये संगीतकार 'आनंदघन' यांचे 'बाई बाई मन मोराचा कसा पिसारा फुलला' हे गीत लताबाईंनी गाइलेले आहे. मला ते रजतपटावर माझ्या कुवतीप्रमाणे साकार करावयाचे होते. प्रत्यक्ष चित्रणाच्या दिवशी माझी प्रकृती अगदीच नरम होती. पण त्या दिवशी ते चित्रण व्हायलाच हवे होते. मी थोड्याशा नाखुषीतच ते गीत ऐकायला लागले आणि काही क्षणांतच माझ्यातील निरुत्साह पार नाहीसा झाला. एका वेगळ्या धुंदीतच मी कॅमेऱ्यापुढे उभी राहिले. ह्या उलट त्याच चित्रपटातील 'निळ्या आभाळी, कातरवेळी' ह्या गीताने खरोखरच मला व्याकुळता आली आणि चित्रणाचीही ऊर्मी उरली नाही. 'अदालत' ह्या चित्रपटात माझ्या आवडत्या अभिनेत्रीचे—नरगीसचे नाम आणि लताबाईंचा आवाज एकत्र आलेला आहे. 'उनको यह शिकायत है की हम कुछ नही कहते' हे गीत नर्गिसच्या तन्मयतापूर्ण अभिनयाने आणि लताबाईंच्या आर्तस्वराने असे म्हटले गेले आहे की हृदयाच्या तारा पिळवटून जातात. 'अनारकली,' 'हम लोग' या चित्रपटांतून त्यांनी गाइलेली गीते अशीच अविस्मरणीय आहेत. ती मला इतकी आवडलेली आहेत की अभावितपणाने सहज गुणगुणायला लागावे आणि मग जाणवावे की अरेच्या, ही तर लताबाईंची पद्धती, लकब! खरोखरच कलावंत व्हावे तर लताबाईंच्यासारखे!

'शाहीर परशुराम' ह्या चित्रपटात एक असा प्रसंग आहे की शाहीर परशुराम खूप आजारी असताना त्यांच्यावर मनोमन प्रेम करणारी बकुळा परमेश्वराला विनवणी करते, "देवा, माझं उरलेलं आयुष्य घे पण शाहिरांना बरं कर." मध्यंतरी लताबाईंना अचानक विषबाधा झाल्याचे कळले तेव्हा मी माझ्या कुलदैवतासमोर असाच पदर पसरला होता. "अनेक श्रांत जीवांना आणि अवघ्या विश्वाला मोहिनी घालणारा हा आवाज आसमंतात असाच दुमदुमत राहू दे" अशी प्रार्थना केली होती. तीच आज ह्या मंगलप्रसंगी फिरून करते.

हृदयनाथ मंगेशकर

# दिदी

एकोणीसशे एकेचाळीस किंवा बेचाळीसचे ते वर्ष असावे दिदीला 'सजनी' स्पर्धेमध्ये पहिले बक्षीस मिळाले होते राजेवाडीकराच्या चाळीत राहत असू आम्ही त्या वेळी 'पूना गेस्ट हाउस' समोरची ही चाळ अजूनही त्याच स्मृती उराशी बाळगून उभी आहे

एकदा दिदीचे अभिनंदन करायला आपटे नावाचे एक गृहस्थ आले होते घराच घळ ते दिदीचे कौतुक करीत होते जाताना "लता आता, पेढे हवेत हां!" असे वारवार म्हणत जिना उतरत असताना एकदमच ते घसरले धाडदिशी आपटले बिचारे ज्या दिदीचे ते अभिनंदन करायला आले होते तीच ओरडली, "आपटे आपटले आपटे आपटले!"

त्यानंतर हे गृहस्थ त्या रस्त्यावरून कधीही जाताना दिसले की आम्ही पाचहीजण एकदम ओरडत असू, "आपटे, पेढे मिळाले का? आणखीन पेढे हवेत का? आपटे आपटले"

भारताचेच नव्हे तर साऱ्या जगाचे मन जिंकणारी ही गायिका नेहमीच अशी निरागस आहे अशी खोडकरही आहे

कोणा एका व्यक्तीने तिला फार छळले की ती त्याच्यावर कसा राग काढते! ती व्यक्ती घरातून परत जाऊ लागली की ही तिच्या पाठीमागून तोंड वेडेवाकडे करीत चालते त्या व्यक्तीने मागे वळून पाहिले की ही एकदम पुन्हा गंभीर चेहरा करते त्याची पाठ वळली की हिच्या खोड्या परत सुरू होतात

एखाद्या व्यक्तीला एकच शब्द वारवार उच्चारण्याची सवय असेल तर त्या व्यक्तीशी बोलताना तो शब्द ती इतक्या वेळा, इतक्या वेगवेगळ्या पद्धतीने उच्चारते की आजूबाजूच्या माणसाची हसता हसता पुरेवाट होते, पण हिच्या चेहऱ्यावरची एक रेषाही हलत नाही

एकोणीसशे त्रेचाळीस किंवा चव्वेचाळीसचे वर्ष असावे ते आम्ही सारेजण कोल्हापुरला पेंढारांच्या घरात राहत होतो दिदीला 'प्रफुल्ल' मध्ये नोकरी लागली होती वय वर्षे चौदा फक्त घरात आम्हा सहा तोंडे खाणारी कमावणारी ती एकटीच त्यातच मला बोन टी बी झालेला दारिद्र्याचे यथार्थ दर्शन आमच्या घरात होत असे मी आणि उषाताई सगळ्यात लहान म्हणून दिदीचे आम्ही

अधिक लाडके होतो. पण दारिद्‌र्यामुळे आमचे कौतुक तिला करता येत नसे. आणि तिला तर खूप वाटे की बाळाला नवीन कपडे शिवावे, उषाला फ्रॉक शिवावा, माईसाठी एखादी चांगली साडी घ्यावी, पण परिस्थितीमुळे काहीएक शक्य होत नसे. उलट बाबांचे नाटकातले जुने शालू फाडून दिदीला परकर, पोलका शिवावा लागत असे.

पण एके दिवशी तिने कमाल केली. आपली इच्छा तिने वेगळ्या पद्धतीने पुरी केली. कै. विनायकरावांच्या चित्रपटात लहान मुलांसाठी सत्राशी कपडे शिवले होते, निळ्या आणि पांढऱ्या रंगाचे. त्यातून दोन जोड्या दिदीने विनायकरावांच्याकडून मागून आणल्या. आम्ही ते अंगाला न येणारे कपडे घालून किती आनंदित झाले होतो, याची कल्पना त्या परिस्थितीत गेल्याशिवाय येणार नाही. दिदीचे ताठ आनंदाने नुसते फुलून गेले होते. दिदीचा तो चेहरा माझ्या नजरेपुढून कधी हलणार नाही.

'माझं बाळ' या चित्रपटात एक प्रसंग होता. अनाथाश्रमाची मुले मदत मागत आहेत. त्याच्या ताडी एक समूहगीत होते. आम्ही पाचहीजण त्या गीतामध्ये आहोत. शालिनी पॅलेस समोर ते चित्रण होते. दुपारच्या कडक उन्हामध्ये आम्ही पाच भावंडे चित्रणासाठी उभी होतो खरच, आम्ही त्या दृश्यातल्याइतकेच अनाथ होतो. सारे जग आमच्यावर उलटल्याचा भास होत असे. पण दिदीचे हात फार मजबूत ठरले आमचे सारे विश्व तिने इकडून तिकडे नेले. सान्या चित्राचे रंग बदलले. एकोणिसशे शेहेचाळीसची लता आणि एकोणीसशे अठ्ठेचाळीसची लता मगदाकर यांच्यात प्रचंड फरक होता. सगळेच काही बदलले होते. पाठीशी होता नुसता अंधकार, दुःखे, उसासे; तर पुढे नुसता आनंद, उत्साह आणि उमेद.

दिदीच्या आमच्या बाबतीतील उत्साहालाही मर्यादा नव्हती. आम्हाला कुठे ठेवू आणि कुठे नको असे तिला झाले होते. परिस्थितीने दाबलेल्या तिच्या सान्या इच्छा वर उफाळून आल्या होत्या आज बाळासाठी सूट, तर उषासाठी फ्राक, तर माईसाठी हार काय घेऊ आणि काय नको असे तिला झाले होते दोन दिवसात तिने कपड्या–दागिन्यानी आम्हाला नुसते मढवून टाकले आमचे लाड करण्याची स्वत ची सारी हौस तिने भागवून घेतली. पण स्वत साठी मात्र तिने एकही वस्तू हौसेने घेतली नाही. ती कधी हुरळून गेली नाही की मावली नाही. स्थितप्रज्ञासारखी स्वत कडे आणि बदलत्या परिस्थितीकडे पाहात राहिली ती. एकच परकर पोलका सहा महिने कसा वापरावा लागतो हे तिला माहीत होते मला वाटते ती हे कधीच विसरू शकणार नाही म्हणूनच इतके अफाट नाव कमावूनही तिला गर्व नावाची गोष्ट माहीतच नाही

दिदीचे उर्दू शिक्षक मला नेहमी सांगतात, "बाल, तुम्हे पता है, बाई आज पचीस साल एक जगा क्यु कायम है? वो अपनी जगाह जानती है, जो जर्रा जिस जगा है, वही आफताब है!"

उर्दूवरून आठवले, आमच्या दिदीची एक गमत आहे. जर कोणी बंगाली माणूस तिला भेटायला आला तर "की खोबोर दादा" म्हणून पहिली पधरा वीस मिनिटे ती इतके छान बंगाली बोलते, की तो माणूस आश्चर्यचकित होतो कोणी पजाबी आला तर "सासरी गल महाराज" म्हणून सरळ पजाबीत ती संभाषण सुरू करते, आणि उर्दूबद्दल तर प्रश्नच नाही. दिदी उर्दू बोलू लागली की चांगल्या 'खानदानी' आश्चर्यात पडावे इतके तिचे उच्चार शुद्ध असतात. उर्दूचे प्रसिद्ध शायर मजरूह सुल्तानपुरी तर "हमारी गजलमे सिर्फ लताजीही कुछ फर्क कर सकती है" असे सांगून मोकळे होतात दिल्ली लखनौचे मुसलमान तर "ये मुसलमान लडकी अपने आपको क्यू मराठी कहलाती है? कुछ समझमे नही आता ये तलफुज्ज सिवा मुसलमानके हो ही नही सकती" असे म्हणताना मी प्रत्यक्ष ऐकले आहे इतके तिचे उर्दू खर प्रभुत्व आहे

आणि हे असे चारपाच भाषा सहज बोलता येणे, एका रिहर्सलमध्ये सबध गाणे पाठ होणे,

उदन्याही भापेन गाणे म्हणणे, सहजगत्या नोटेशन करणे, चाल शवणे, ताना, मुरक्या, खटके सहज तालात बसविणे, हे सारे त्या विधात्याकडून निरा ची अति नाजूक अशी प्रतिभा लाभली आहे त्यामुळे होते. संगीतदिग्दर्शकाचे सूर आणि कवीचे शब्द घेऊन दिदी ज्यावेळी गाते त्यावेळी संगीतदिग्दर्शकाचे सूर व कवीचे शब्द ज्या एका सुत रसाला–सुगाला, दु गाला, प्रीतीला, भक्तीला स्पर्श करू शक्त नाहीत, त्या रसाला हिचा स्वर सहज स्पर्श करून येतो

पण तिच्या स्वरामध्ये जी अतीव आर्तता भरून राहिली आहे ती तिला समाजाकडून मिळाली आहे. दिदीचे मन अगदी पारिजातकाच्या फुलासारखे आहे. एकदा दिल्लीहून येत असताना तिने मोटारीत रेडिओ लावला. बडे गुलामअलींचे गाणे होते. वय आणि आजारामुळे खासाहेब आता गाऊ शकत नाहीत. दिदीने त्याचे उत्तम गाणे पूर्वी ऐकलेले. आता ते सरळ सहज गाऊ शकत नाहीत हे पाहून ती अगदी हमशाहमशी बेशुद्ध पडेपर्यंत रडली वारवार एकच पुरपुरायची, "अरेरे, एवढा मोठा कलाकार आता गाऊ शकत नाही. जागा डोक्यात आहे पण गळ्यातून निघू शकत नाही. देवा, असा प्रसंग का आणतोस रे?" तिच्या स्वरातील आर्तता तिच्या याच संवेदनाशील मनामुळे अधिक आर्त झालेली आहे. कलाकार या शब्दाची अस्सल ओतीव मूर्ती आहे ती

दिदीचे बालपण प्रतिकूल परिस्थितीशी झगडण्यात गले. गुलामगिरी आणि महायुद्ध याच्या कात्रीत सापडलेले ते विश्व होते. कलावंताच्या भोवतालची परिस्थिती त्याला इतके चांगले घडवीत असते की स्वत प्रयत्न करूनही तो तसा घडू शकणार नाही. जीवनातील बदलणाऱ्या मूल्याचा कलाकाराच्या व्यक्तिरेखावर असा परिणाम होतो की एखाद्या शिल्पकाराने हातात हत्यार घेऊन साऱ्या दगडाचा देव केला आहे असे वाटते. कलावनाचे नाजूक, परागाप्रमाणे कोमल असलेले मन सामाजिक जीवनात उठणाऱ्या वादळापासून स्वत चा बचाव करू शकत नाही ते एकीकडे कोमेजून जाते आणि त्याच वेळी नवीन कलाकार मन जन्म घेऊ लागते रात्री फुलणारी बहरलेला प्राजक्त सकाळी पार रिता होतो पण वातावरण गंधाने मग्न गलेले असते. कलावंताच्या हृदयात फुललेली फुलेही अशीच भोवतालच्या वादळात गळून पडतात, पण त्याचा सुगंध कोणीही हिरावून नेऊ शकत नाही. सकाळचा रिता प्राजक्त रात्री परत फुलतो, कलावंताचे रिते मनही असेच फुलते. पण या घडामोडीत त्याच्या कलासक्त आत्म्यावर अनेक आघात झालेले असतात, त्याच्या जीवनाची मूल्ये बदलून गेलेली असतात आणि तरीही कलासक्त आत्मा मात्र तितकाच मुग्ध, तितकाच निष्पाप असतो त्याला हे सारे सहन होत नाही. तो आक्रदून उठतो तीच त्या कलावंताची कला. हीच दिदीच्या स्वरातली आर्तता

एकदा मैफलीत भैरवी रंगात आली होती. बडे गुलामअली ठुमरी म्हणत होते. तो शेजारी कुणीतरी रेडिओ लावला आणि "कदर जानेना हो कदर जानेना" हे दिदीचे गाणे लागले. खासाहेबानी स्वरमंडल खाली ठेवले म्हणाले, "माशाल्ला इसे कहते है सही सूर! अब मै और नही गाऊंगा" रंगलेली मैफल समाप्त झाली.

हिच्या स्वरातली आर्तता इतकी विलक्षण आहे की म्हाताऱ्या माणसानी–अगदी वृंदावनातल्या साधूनी तिच्या पायाखालची माती डोक्याला लावताना मी प्रत्यक्ष पाहिले आहे.

एकदा मी अमीर खासाहेबाना विचारले, "खासाहेब, दिदीके गानेके बारेमे आपकी क्या राय है?" बराच वेळ ते गप्प बसले, नतर अगदी भावनावश होऊन म्हणाले, "हमने बरसो रियाझ किया, खाक किया! जो बात हम तीन घंटेमे पैदा करते है, वो सिर्फ तीन मिनटमे पैदा करती है! चाल, क्या दीवाने गालीब फिर लिखा जायेगा? तो फिर लता जैसी आवाज खुदा भी फिरसे कैसी पैदा करेगा?"

मोठमोठ्या गायकानी जिचे श्रेष्ठत्व मान्य केले आहे अशी आमची दिदी कधी कधी अगदी गमतीदारपणे वागते एकदा महाराष्ट्रातील सर्व तीर्थक्षेत्रे पाहण्यासाठी तिने एक सफर काढली आणि

पंधरा दिवसांत सर्व महाराष्ट्र पाहिला. सफरीला निघण्यापूर्वी कुणीतरी तिच्या डोक्यात भरवून दिले होतें की अशा प्रवासात उपाशी राहावे लागते. कधी कधी झाडाखाली झोपावे लागते...आणि एके दिवशी सोळापूरच्या दिदीने खरोखरच आम्हा सर्वांना एका झाडाखाली झोपण्यास सांगितले. हॉटेल मिळत असूनही हिने आग्रह धरला की आजची रात्र झाडाखालीच काढायची. पण अंधार पडल्या-वर ती स्वतः मात्र घाबरली. तिने मोटारींत बसून रात्र जागवली. पण यावरून ती भित्री आहे असा कोणीही गैरसमज करून घेऊ नये. नंबळ खोऱ्यात रात्रभर प्रवास केला तिने. आमच्या सगळ्यांच्या तोंडचे पाणी पळाले त्या रात्री. पण ही शांत बसून होती. "डाकू मला काय करणार!" म्हणून मलाच उलट प्रश्न केला.

कधी कधी ती साड्या विकत घेण्यासाठी जाईल. शंभर साड्यांतून एकदोन साड्या विकत घेईल मग घरी आल्यावर "इतक्या महाग साड्या मी कशाला घेतल्या!" म्हणून डोक्याला हात लावून बसेल! पण 'जयप्रभा स्टुडिओ'साठी महिना पाच हजारांची झीज सोसावी लागते, याकडे मात्र तिचे लक्षही जाणार नाही. "स्टुडिओ विकून टाक. तू कशासाठी हा तोटा सोसतेस!" असा प्रश्न तिला कुणी केला की ती एकच उत्तर देते. "तो स्टुडिओ मराठी माणसांचा आहे." आणि मग तिचे ते प्रसिद्ध मिष्किल हास्य. त्या हास्यातून सारे भाव प्रकट होतात.

अशा या निष्पाप दिदीवर एकदा कठीण प्रसंग आला होता. चारपाच वर्षांपूर्वी दिदी शयनसने आजारी होती. वर्षभर तिचे रेकॉर्डिंग बंद होते. "लताचा आवाज गेला" म्हणून वर्तमानपत्रांत बातम्या यायच्या. दिदी एकटीच घरी पडून असायची. अशातच दिदीने एके दिवशी रेकॉर्डिंग ठेवले. मी दिदीबरोबर गेलो. रेकॉर्डिंग सुरू झाले. पण पहिल्या ताणाभरात मनासारखा आवाज लागेना. मी अतिशय निराश झालो. मनात सारखे विचार येत, "दिदीने गाणे सपले का?" मग थोड्या वेळाने ती ठीक गाऊ लागली. मला हायसे वाटले. प्रत्येक टेकनंतर ती माझ्याकडे बघायची. तिचे ते विलक्षण बोलके डोळे मला सारे काही सांगायचे. मी मान डोलावून "सारं काही ठीक आहे. तू गा" म्हणून सांगत होतो. एकदाचे रेकॉर्डिंग संपले. तोच कोणीतरी मुद्दाम खुसपट काढले, "आणखी एक टेक घ्या. हा टेक बरा नाही." दिदी पार दमली होती. परत आवाज लागणे शक्य नव्हते. घाबरून ती इकडेतिकडे पाहातच राहिली. वास्तविक ती अशा जागेवर आहे की ती सहज सांगू शकत होती, हा "टेक उत्तम आहे. मी आता गाणार नाही." पण ती तसे सांगणार नाही याची मला पूर्ण कल्पना होती. संगीतदिग्दर्शकाचे पूर्ण समाधान होईपर्यंत ती गात राहणार हे मला माहीत होते. हे ओळखूनच खुसपट काढण्यात आले होते हेही मला ठाऊक होते. मी पटकन पुढे झालो आणि म्हणालो, "अब और टेक लेनेकी जरूरत नही. चलो दिदी."

आमच्या दिदीच्या असंख्य मित्रमैत्रिणी आहेत. पण तिच्या विशाल हृदयाची कल्पना फारच थोड्यांना आहे. तिच्या विश्वव्यापी कलेचे रहस्य तिच्या इतक्याशा प्रेमळ निःस्वार्थी हृदयात सामावलेले आहे. अत्यंत पवित्र अशा तिचा आत्मा या संसारात अडकला आहे.

वृंदावनधामी श्रीकृष्णमंदिरात श्रीकृष्णाची मूर्ती बघून दिदी खूप रडली. इतकी की मी घाबरून गेलो. आजूबाजूच्या लोकांनी टिंगल केली. पण त्यांना काय माहीत की कृष्णाची मूर्ती बघताना ती कुठल्या विश्वात हरपली होती?

दिदी पवित्रात्मा आहे. खरे म्हणजे तिला प्रार्थनेची मुळा आवश्यकता नाही.

"जा मैं सर बसजदा हुआ कभी तो जमीं से आने लगी सदा
तेरा दिल तो है सनम आशना तुझे क्या मिलेगा नमाजमें"

(तुझे हृदयच एक मंदिर आहे. प्रेमविश्व आहे, तुला प्रार्थनेने काय मिळणार?)

माझी दिदी ही अशी आहे.

लता

राजाराम हुमणे

# स्वरांचे लेणे

गोमंतकाच्या निसर्गरम्य भूमीवर पाऊल टाकल्याबरोबर प्रथम योग आला तो मंगेशीच्या दर्शनाचा. पचपच उघ काल्ची पळ. मंदिराकडे जात असतानाच कुणातरी प्रवेशद्वाराजवळ असलेले एक घरकुल दाखविले आणि सांगितले, "हे लता मंगेशकरचे घर." मंगेशीच्या मन्दिरातील पवित्र वातावरण, अरुणोदयाची घटिका, ते इवलेसे घर आणि स्वरकिन्नरीची स्मृती! त्या चंद्रमौळी घरातून, त्या धूसर वातावरणात एक स्वराची लकेर उठल्याचा आभास झाला–"घन श्याम सुंदरा श्रीधरा अरुणोदय झाला" होनाजी बाळाच्या त्या 'अक्षर' भूपाळीला अमर करणाऱ्या स्वराची लकेर!

ती लकेर विरते न विरते तोच दुसरी लकेर उठली. सूर्य उगवण्यापूर्वीच सूर्यास्त झाला आणि मध्यान्हरात्रीच्या कृष्णच्छायेत मन गुरफटून गेले. उजाड ओसाड, भयाण भेसूर, निर्जन-नीरव 'महल'तून 'आयेगा कोई आयेगा' असे आर्त स्वर काळजाला येऊन भिडले आणि मग एका मागून एक अनंत स्वरलहरी, सहस्रावधी लहरी वनात आणि कानात गुंजू लागल्या. ल्यीच्या लक्षावधी लहरी एकामागून एक मनावर येऊन आदळू लागल्या आणि सुरांच्या 'बरसाती'ने माझे मन भिजून चिंब झाले.

स्वराच्या सामर्थ्याने कोट्यवधी मने जिंकणाऱ्या लताचे कुलग्राम मंगेशी असावे हा केवढा योगायोग. याच गोमंत पर्वताच्या पायथ्याशी पार्वतीने कर्पूरगौर नीलकंठाला आपल्या कंठसामर्थ्याने आणि पदलालित्याने जिंकले होते. त्याच मातीला जणू पुन्हा कंठ फुटला आणि निराश मनानाच नव्हे तर वैतागलेल्या विरागींना सुद्धा आपल्या रंजक रागिणींनी दिलासा देणारी लता जन्मास आली.

लताबाईंची शकडो गाणी माझ्या मनात रुंजी घालतात. परंतु माझे मन अधिक भारावून जाते ते भास्करराव ताम्ब्यांच्या कविता त्यांच्या सुरातून ऐकताना. 'जन पळभर म्हणतिल हाय हाय' किंवा 'मावळत्या दिनकरा' या सारख्या कवितांतील ताम्ब्यांच्या साऱ्या भावना जणू स्वराची लेणी चढवून समृद्ध होतात. लताबाईंचे सूर तर समर्थ आहेतच. परंतु स्वरात कुठलीही कविता सजीव होते त्याचे कारण वेगळेच आहे. आणि ते म्हणजे लताबाईंची काव्यात्म वृत्ती. लताबाईंच्या कवितागायनाला

इतका रसरशीतपणा कसा येतो हे कोडे लताबाईंची आणि माझी घनिष्ठ ओळख झाली तेव्हाच उलगडले. लताबाईंनी केवळ ध्वनिमुद्रिका खपवयाच्या म्हणून काही या कविता कुठूनतरी पैदा केलेल्या नव्हत्या. ताब्याची समग्र कविता वाचल्यावर त्याच्या अंत:करणाला भेदून गेलेल्याच कविताच त्यानी गायनासाठी निवडल्या. लताबाईंसारखी अहोरात्र कामात व्यग्र असलेली बाई कवितावाचनात मग्न होऊन जाते हे कुणाला सांगूनही खरे वाटायचे नाही. कविता वाचण्याचे लताबाईंना मनस्वी वेड. ताने, कुसुमाग्रज, बा. भ. बोरकर आदींच्या अनेक कविता त्याना मुखोद्गत आहेत. कवीच्या भावनाशी समरस होण्याइतकी काव्यात्म वृत्ती लताबाईंजवळ आहे म्हणूनच त्याच्या स्वरात कविता सजीव होते, भावना साकार होतात आणि कविकल्पना मूर्तस्वरूप धारण करतात.

पार्श्वगायनाच्या क्षेत्रात 'स्वराच्या राण्या' अनेक. परयात ज्या चार चार राण्या असतात या क्षेत्रात दुसऱ्यातिसऱ्या सुद्धा 'राणी'चा मान आणतात. परतु लताबाई 'स्वरसम्राज्ञी' ठरल्या ते त्या 'हुकुमाची राणी' आहेत म्हणून नव्हे–निसर्गाने त्याना अलौकिक स्वरमाधुर्य दिले म्हणूनहि नव्हे–तर गीतातील किंवा कवितातील भावना आकलन करण्याइतकी असामान्य काव्यात्म वृत्ति त्याच्याजवळ आहे म्हणून. त्यातील भावना सौंदर्य टिपण्याइतकी सौंदर्यदृष्टि त्याच्याजवळ आहे म्हणून. लताबाईंच्या स्वरातच सौंदर्य आहे असे नव्हे तर त्याच्या जीवनातच सौंदर्य आहे. तसे नसते तर आचरेकरासारख्या श्रेष्ठतम चित्रकाराच्या चित्रकृती त्याच्या घरात दिसल्याच ना.

लताबाईंना मी प्रथम पाहिले ते रुपेरी पडद्यावर. 'पहिली मगळागौर' मध्ये एक 'परकरी पोर' म्हणून. ही पोर एक थोर पार्श्वगायिका होईल असे त्यावेळी कुणाच्या स्वप्नात सुद्धा आले नसेल. परतु पडद्यावर नाचणारी ही पोर पडद्यामागे जाऊन गाऊ लागली आणि भारतीय चित्रपटसृष्टीत अभूतपूर्व पराक्रम करणारे 'आठवे आश्चर्य' जन्माला आले. देवकीच्या आठव्या कन्येप्रमाणे! त्यानतर लताबाई देवदुर्लभ झाल्या. त्याचा आवाज ऐकावा आणि भावपूर्ण नेत्राची दूसरी गधर्वकन्या मनश्चक्षुपुढे उभी करावी; या खेळात अनेकाप्रमाणे मीहि समाधान मानू लागलो. परतु योगायोग असा की लताबाईंशी माझा प्रत्यक्ष परिचय झाला. त्याच्या घरा मी येऊजाऊ लागलो. त्याच्याशी मनमुराद गप्पागोष्टी करू लागलो. एक मोकळ्या गळ्याची नि मोकळ्या मनाची, खुल्या दिलाची आणि खुल्या आवाजाची गायिका मी अगदी जवळून पाहिली. जागतिक कीर्ति लाभूनहि निगर्वी, निरभिमानी राहिलेली. लताबाईंना पाहिल्यावर मी मग म्हटले, "तर लता लता म्हणतात ती ही." पण अतर्मन मात्र म्हणाले, "लता नव्हे, कल्पलता"



मजरूह सुलतानपुरी

# या शतकाचा स्वर

"ह्या लता मंगेशकर. एक नव्या, अत्यंत सुरेल, कसदार आवाजाच्या गायिका" या शब्दांत सुप्रसिद्ध संगीतदिग्दर्शक नौशाद यांनी अठ्ठेचाळीस साली लताची आणि माझी ओळख करून दिली. आता या घटनेला वीस वर्षे उलटून गेली आहेत. आज आपल्या या खंडप्राय देशात लताचे नाव आबालवृद्धांना इतके परिचयाचे झाले आहे की तिची ओळख अशी करून देण्याचे कारणच पडत नाही.

पुष्कळ काळपर्यंत लोकांचा असा समज होता की कवी गीतरचना करतो, संगीत दिग्दर्शक आपल्याजवळील आकर्षक सुरावटीतून त्या गीताला अधिक सुंदर बनवतो आणि मग पार्श्वगायकाचे काम एवढेच उरते की त्या ओळी त्याने जरा मनाशी घोळवायच्या आणि कवीचे शब्द व दिग्दर्शकाचे सूर त्याने आपल्या गळ्यातून लोकांना ऐकवायचे. ह्या साऱ्या व्यवहारात स्वतंत्र प्रतिभेचा असा काही भागच नसतो. हे कदाचित पूर्वीच्या जमान्यात खरे असेल परंतु लता मंगेशकरच्या उदयानंतर मात्र मुळीच खरे नाही.

लताबाईंचा उदय होण्यापूर्वी सैगल आणि नूरजहा यांचा आवाज साऱ्या चित्रपटसृष्टीत घुमत होता. ते दोघेही थोर कलावंत होते. आजही त्यांच्या आवाजाचा खूप मोठा चाहता वर्ग आपल्यामध्ये आहे. परंतु त्यांच्याही काळात पार्श्वगायन ही एक नवनिर्मिती आहे असे वाटले नव्हते. चित्रपटात एखाद्या व्यक्तिरेखेचे स्थान कोणतेही असले आणि तिचा स्वभाव कोणत्याही प्रकारचा असला तरी सैगल आणि नूरजहा आपापल्या विशिष्ट धाटणीनेच सर्व गाणी गात आणि त्या त्या व्यक्तींतील, प्रसंगातील भाववृत्तींची विविधता झाकळून टाकीत. लता मंगेशकरच्या नवनिर्माणक्षम प्रज्ञेनेच प्रत्येक भूमिकेतील कमीअधिक सखोलता आणि वेगळेपणा प्रथमतः व्यक्त केला. तिने आपल्या आवाजातील जादूच्या साह्याने असे दाखवून दिले की चित्रपटातील एखादी भूमिका ही केवळ कवी लेखकाच्या शब्दांतून साकार होत नसते तर तिच्या मुलायम स्वराच्या एखाद्याच आरोहअवरोहानेही ती मूर्त होते. निरनिराळ्या भूमिकांची बदलती भावस्थिती ही केवळ मुद्राभिनयातून किंवा आंगिक अभिनयातूनच कळते असे नाही तर लताच्या स्वरातील अप्रतिम कंपनेही ती व्यक्त करू शकतात. सुरांचा आणि

शब्दोच्चाराचा विविधतापूर्ण आविष्कार हा लताचा अगदी खास विशेष आहे. लता मंगेशकरने पार्श्व गायनाला एका स्वतंत्र कलेचा, नवनिर्मितीचा दर्जा प्राप्त करून दिला आहे. ही तिची चित्रपटसृष्टीला लाभलेली सर्वांत मोठी देणगी आहे हे आज सर्वांनीच मान्य केलेले आहे.

लताचा आणखी एक विशेष आहे कवीने निर्माण केलेल्या शाब्दिक प्रतिमांचा आशय, संगीतदिग्दर्शकाने सांगितलेल्या सुरावटीच्या आणि त्याने कल्पिलेल्या रचना यांच्या बाहेर न जाताही ती अधिक समर्थपणे प्रगट करीत असते. हे ती कसे करू शकते याचे मला नेहमी गूढ वाटत आले. कधी ती एखाद्या शब्दाला अशी बिलगून बसते—जसा काही त्या शब्दाचा वियोग तिला सहनच होत नाही. कधी ती एखादा शब्द असा सोडून देते की वाटते एखादे नुकतेच हातातून सुटलेले कबूतर डौलदार भराऱ्या घेते आहे. कधी ती सवालाच्या झटक्यातच एखादी ओळ म्हणते तर कधी ती एखादी ओळ अशी कुजबुजते की प्रणयातील गूढरम्यता सूचित व्हावी. कधी कधी तर ती अशा अनोख्या पिळवटलेल्या आवाजाने गाते की वाटते, ही हरवलेले आत्मतत्त्व ह्या ओसाडी ओसाडीतून शोधते आहे.

आमच्या चित्रपटसृष्टीत स्वराची इतकी विविधता असलेला, इतका चपळ आणि इतका जादूने भरलेला आवाज यापूर्वी कधीच प्रकटला नसेल. हा मधाळ आणि सोनसुरा स्वर, हा निळ्या नभाशी नाते सांगणारा आणि गुलाबी छटा घेऊन आलेला स्वर, हा आत्म्याची व्यथा आणि जीवनाची मुक्त निर्भरता प्रकटवणारा स्वर, हा या शतकाचा स्वर आहे.

आमचे जीवन आनंदी आणि उत्साही असावे यासाठी लताला दीर्घायुष्य लाभावे!





माइ, आशा, लता, दीनानाथ मीना

# लता-छायापट



दीनानाथ पुण्यतिथी, १०६६
मीना लता, उषा, रविशंकर भीमसेन जोशी शिवकुमार शर्मा वसंत देसाई, हृदयनाथ



१ सेनापती बापटांसह



क्रिकेटपटूंचे स्वागत

नाडकर्णी, गुप्ते, वाडेकर, मांजरेकर, देसाई, उम्रीगर, आशा, कॉन्ट्रॅक्टर, बोर्डे, लता.

चित्रलेखा

# आणखी एक गाणे

ताडदेव येथील फेमस सिने लॅबोरेटरी. रस्त्यापासून काहीशी आत असलेली, बाहेरून अगदी साधी, अनाकर्षक वाटणारी ही इमारत चित्रपटव्यवसायाचा एक महत्त्वाचा घटक आहे. चित्रपटातल्या गाण्याचे ध्वनिमुद्रण येथे होत असते. तसा मुंबईमध्ये ध्वनिमुद्रणाच्या सोयी इतर ठिकाणीही आहेत, मेहबूब स्टुडिओ, राजकमल कलामंदिर, बॉम्बे लॅबोरेटरी येथेही चित्रपटातली गाणी ध्वनिमुद्रित होतात पण फेमस सिने लॅबोरेटरीतली कामाची वर्दळ काही वेगळीच. एक रविवारचा दिवस वगळला तर येथे रोज दोन दोन तीन तीन गाणी ध्वनिमुद्रित होतात. बाहेरच्या मोठ्या रस्त्यावर रहदारी वाहत असते. गाड्या जात येत असतात. लोकांचे नित्याचे व्यवहार चालू असतात. आणि येथे या इमारतीत हर्ष, शोक, प्रणय, वात्सल्य, आनंदाची उत्फुल्लता, क्रीडेचा निर्भर उन्माद—नाना भावनांचा आविष्कार करणाऱ्या, नाना भाषांतल्या गाण्यांचे फिल्मच्या अरुंद पट्टीवर स्वरमुद्रण होत असते. नियमितपणे, निवांतपणे, वर्षानुवर्षे हे काम येथे होत आहे.

चौदा फेब्रुवारी एकोणीसशे सदुसष्ट. सकाळचा नऊसाडेनऊचा सुमार. 'मेरे हमदम मेरे दोस्त' या चित्रपटातल्या एका गाण्याचे आज फेमस सिने लॅबोरेटरीत ध्वनिमुद्रण होत आहे. संगीत दिग्दर्शन करणार आहे चित्रसृष्टीत सध्या आघाडीवर असलेली लक्ष्मीकांत प्यारेलाल ही तरुण कलावंतांची जोडी. आणि गाणार आहे लता मंगेशकर.

फेमस सिने लॅबोरेटरीची इमारत तशी सोयिस्कर नाही पायऱ्या चढून वर जाताच समोर एक छोटी खोली लागते. तिच्या शेजारी तेवढ्याच आकाराची दुसरी खोली आहे. येथील प्रमुख ध्वनिमुद्रक मिनू कात्रक व त्यांचे सहकारी येथूनच गाणे ध्वनिमुद्रित करतात. या खोलीला लागून दुसरे मोठे दालन आहे. येथून गायक गायिका मायक्रोफोनसमोर उभे राहून आपली गाणी गातात. या दालनामागे एक खूप मोठा हॉल आहे. येथे वादक बसतात गाण्याला जशी साथ हवी असेल त्याप्रमाणे वाद्यांची आणि वादकांची संख्या कमी जास्त होत असते.

ध्वनिमुद्रण जेथे केले जाते ती खोली अगदी छोटी आहे. कोपऱ्यात ध्वनिमुद्रणयंत्र आहे.

तेथे कानक बसले आहेत. त्याच्या शेजारी त्याचे सहकारी ध्वनिमुद्रक मन्साळी आहेत. तेथेच जवळ दाटीवाटीने तीन खुर्च्या ठेवल्या आहेत. त्यातल्या एका खुर्चीवर अमरकुमार बसले आहेत ते 'मेरे हमदम मेरे दोस्त' चित्रपटाचे दिग्दर्शक आहेत. त्याच्याशेजारी बसले आहेत ते मजरूह सुल्तानपुरी, प्रसिद्ध कवी. आज ध्वनिमुद्रित व्हायचे आहे ते गाणे त्यांच्या लेखणीतून उतरले आहे. खोलीच्या उरलेल्या अर्ध्या भागात एक प्रचंड यंत्र उभे आहे. त्यावर असंख्य अगम्य स्क्रू, बटणे आहेत. या यंत्राशेजारी कानक याचे दुसरे सहकारी कुमार परुळेकर उभे आहेत. सलीम हे त्यांचे आणखी एक सहकारी जवळपास आहेत.

खोलीत आणखी कितीतरी माणसे आहेत. कानक यांच्यासमोरच ही खोली आणि गायक गायिका जेथून गातात ती खोली यांना विभागणारी भिंत आहे. या भिंतीत मध्यभागी एक खिडकी-वजा चौकट आहे. तीत एक अखंड काच बसवली आहे. या काचेतून ध्वनिमुद्रक आणि गायक-गायिका एकमेकांना पाहू शकतात. ध्वनिमुद्रणाच्या यंत्रासमोर, या काचेखाली भिंतीशी एक कोच आहे. त्यावरही माणसे अगदी ठेचून बसली आहेत. ही सारी मंडळी आली आहेत लताचे गाणे ऐकण्यासाठी. लता आज वर्षानुवर्षे गात आहे. जवळजवळ रोज तिची गाणी ध्वनिमुद्रित होत असतात. आणि तरीही 'लताचे रेकॉर्डिंग' ही चित्रपटसृष्टीतली एक महत्त्वाची घटना असते. तो एक Event असतो. त्यामुळे तिचे रेकॉर्डिंग असले की ते ऐकण्यासाठी ध्यावरच्या उत्तमोत्तम तंत्रज्ञापासून तो परदेशी पाहुण्यापर्यंत आणि चित्रपटनिर्मात्याच्या नातेवाईकापासून तो रेकॉर्डिंग आणि लताही कुतूहलाने बघायला येणाऱ्या सर्वसामान्य माणसापर्यंत अनेकजण येत असतात. आज ही मंडळी तशीच येथे गोळा झाली आहेत.

कलाक्षेत्रात ज्यांचे नाव वर्षानुवर्षे गाजत आहे असे अनेक प्रतिभाशाली वादक कधीकधी लताच्या रेकॉर्डिंगच्या वेळी साथीला हजर असतात. सुप्रसिद्ध सारंगीवादक रामनारायण, संतूरवादक शिवकुमार, बासरीवादक हरिप्रसाद चौरासिया, व्हायोलीनवादक गजानन कर्नाड यांच्यासारखी बडी कलाकार मंडळी येथ साथ करताना अचानक बघायला मिळतात. आजच्या गाण्याला भरगच्च साथ असली पाहिजे. कारण वादकांची संख्या खूप मोठी आहे. आज कितीतरी देशीविदेशी वाद्यांचा येथे मेळावा भरलेला आहे. मँडोलीन, व्हायोलीन, व्हीयोला, चेलो, डबलबेस अशी अनेक वाद्ये त्यात आहेत. ढोलकपासून तो तबल्यापर्यंत कित्येक तालवाद्ये येथे दिसत आहेत. नुसती व्हायोलिन्स पंचवीस ते तीस तरी असतील. व्हायोलिनवर गजानन कर्नाड आहेत. शिवकुमार संतूर वाजवीत आहेत. सतार, स्पॅनिश गिटार ही वाद्येही साथीला आहेत. हॅमण्ड ऑर्गनची योजना केलेली दिसत आहे. फोनवर मनोहरी आहेत. संगीत दिग्दर्शकाचे मदतनीस श्याम काबळी व्हायब्रोफोन वाजवीत आहेत. सुप्रसिद्ध तबला व ढोलकवादक अब्दुल करीम हे आज येथे उपस्थित आहेत. चंदू घर्ग बासरी वाजवीत आहेत. त्यांच्या जोडीला हरिप्रसाद चौरासियाही आहेतच.

गप्पा मारील. आज तिच्याबरोबर तिच्या दोन मैत्रिणी आल्या आहेत. त्यांच्याशी ती आता हसून हसत काही बोलते आहे.

गेली वीस वर्षे लता येथे येते आहे. रोजच्यारोज गाणी ध्वनिमुद्रित करते आहे. अगदी छोट्या मुलीपासून तो या वयापर्यंतची तिची वाटचाल याद या स्टुडिओने पाहिली आहे. नव्या अनोळख्या गायिकेपासून तो चित्रपट सृष्टीतल्या आजच्या सर्वश्रेष्ठ पार्श्वगायिकेपर्यंत तिची होत गेलेली उत्क्रांती, तिच्यामध्ये झालेली अनेक परिवर्तने येथील भिंतीभिंतींना ज्ञात आहेत. इथे असलेला प्रत्येक वादक, या स्टुडिओतला अगदी सामान्य मदतनीस, इथला हरकाम्या नोकर देखील लताच्या चांगला परिचयाचा आहे; तिला इथे घरच्यासारखेच मोकळे, अनौपचारिक वाटते.

आजचे गाणे कवी मजरूह सुल्तानपुरी यांनी लिहिले आहे. लता स्वत: त्या नोटपेपरवर ते गाणे लिहून घेते. प्रत्येक गाण्याच्या शिरोभागी 'श्रीकृष्ण' असे लिहायला ती कधी चुकत नाही. त्याचप्रमाणे प्रत्येक गाण्याचे स्वत:च्या हस्ताक्षरात लेखन करून घेतल्याशिवायही ती राहत नाही. गाण्यांतील विशिष्ट शब्दावर, विशिष्ट जागावर खास स्वत:च्या अशा तिच्या खुणा केलेल्या असतात. 'स्वराचे आघात,' हेलकावे सुचित करणाऱ्या. लताखेरीज इतरांना त्याचा अर्थही कळणे अशक्य. त्या केवळ तिच्यासाठीच असतात. गाण्याचे शब्द आणि या खुणा एवढे गाताना तिला पुरेसे असते.

आजच्या गाण्याचे संगीत देत आहेत लक्ष्मीकांत प्यारेलाल. आजची एक अत्यंत लोकप्रिय जोडी. 'दोस्ती' चित्रपटाला यांनी दिलेले संगीत लोकांना फार आवडले. आणि तेव्हापासून हे सतत आघाडीवरच राहिले. यावेळी ते दोघे लताजवळ उभे आहेत. दोन्ही मुले तिशीच्या आतली आहेत. पांढरा तरकिरी पँट, पांढरा शर्ट घातलेला सावळासा, अबोल, गंभीर मुद्रेचा तरुण आहे तो प्यारे. हा उत्तर प्रदेशातला आहे. दुसरा काळी पँट आणि मरून रंगाचा मॅनिला घातलेला गोरागोमटा, देखणा, हसतमुख तरुण आहे तो लक्ष्मी. हा महाराष्ट्रीय आहे. हे दोघेहीजण अगदी छोट्या वयापासून वादकांच्या ताफ्यात काम करीत होते. त्यावेळी प्यारे व्हायोलीन वाजवत असे आणि लक्ष्मी मँडोलीन वाजवत असे. लता त्या वेळेपासून त्यांना ओळखते आहे नव्हे, त्यांना प्रथम चित्रपटसृष्टीत प्रवेश आणि कामे तिनेच मिळवून दिली आहेत. आणि आता हे दोघे संगीत दिग्दर्शक झाल्यापासून त्यांची कितीतरी गाणी तिने गाइली आहेत.

प्यारे एक खुर्ची ओढून घेऊन लताच्या पुढ्यात बसतो आणि समोरच्या हार्मोनियमवर तिला गाण्याची चाल वाजवून दाखवतो. लता डोळे मिटून स्वर समजावून घेते. मनातल्या मनात ते घोळवते. लक्ष्मी बाजूला बसून ऐकतो आहे.

लाऽला ला ए ला
चलोऽऽसजना जहाँतक घटा चले
लगाकर मुझे गले

'मुझे'वर सुंदर मींड आहे. 'चलोऽऽ' लता लक्षपूर्वक ऐकत आहे. प्यारे सांगतो. लता गाऊ लागते,

चलोऽऽ सजना जहाँतक घटा चले

बाहेर वाद्ये तिला साथ करू लागतात.

प्यारे सबंध गाणे गाऊन दाखवतो. त्याचा आवाज दाणा आहे. प्रारंभ रागांत असलेले हे गीत त्याच्या स्वरात गमतशीर वाटते. त्याचे गाणे गाऊन होताच लता पुन्हा एकदा दोनदा त्यांच्या

स्वरात स्वतःशीच गुणगुणल्यासारखे करते. आणि मग ती चाल ती हुबेहूब आपल्या गळ्यातून उमटवते. मध्येच मान वाकडी करून ती एक सुरेख आलाप घेते. लक्ष्मी पुढे झुकून स्वतःला सुचलेल्या एक दोन ताना तिला सांगतो. बाहेरच्या दालनात कोणीतरी ओरडते, "Quiet Please". बाद्ये पुन्हा सुरात मिळवली जात आहेत. त्याचा गोंगाट चालू आहे. माणसे आपसात बोलत आहेत. पण या तिघांना त्याचा उपद्रव होत नाही. त्यांना त्याची चांगली सवय झाली आहे.

मध्येच फोटोग्राफर येऊन फोटो घेऊन जातो. आणखी कोणी तरी येऊन लताला अभिवादन करून जातो. पँट, बुशशर्ट, हातात भारी घड्याळ, सिगरेटचे टिन, काडेपेटी. डोळ्याला काळा गॉगल. हा कोण असेल ? प्रोड्यूसर ? डिग्दर्शक ? स्नेही ? एक सामान्य पाहुणा ? काही कळत नाही.

लता त्याच्याशी दोन शब्द बोलते. हसते. पुन्हा ती हातातल्या गाण्याकडे वळते.

अद्याप गाण्याची चाल तिला समाधानकारक वाटत नाही. ती काहीतरी सूचना करते. चालीत थोडा बदल सुचवते. तशी तान घेऊन दाखवते. प्यारे खूष होऊन म्हणतो,

" वाहवा ! बहोत अच्छा ! "

लक्ष्मी लगेच त्याची सरगम बसवतो.

लता काहीतरी विनोद करते. लक्ष्मी आणि प्यारे हसतात. मध्येच उठून लता बाहेर जाऊन आपल्या ड्रायव्हरला सांगून येते. तिला कॉफी हवी आहे. सकाळी नऊलाच आलेली असल्यामुळे ती जेवून आलेली नाही. कॉफी येते. लता कॉफी घेते. कॉफी घेतल्यावर तिला जरा तरतरी येते. मध्येच प्यारे उठतो आणि दोन्ही दालनांना विभागणाऱ्या दारात उभा राहून वादकांना सूचना देतो. पार्श्वसंगीत सारखे घुमत राहाते. दरम्यान व्हायोलीनवादक गजानन कर्नाड आत येतात. लता त्यांच्याशी बोलते. गाण्याच्या 'नोटेशन'मध्ये ती काही दुरुस्त्या सुचवते. तालात बसविण्यास अवघड अशा एक दोन जागासंबंधी काही सूचना देते. त्या सूचनांबरहुकूम वाद्यांच्या स्वरात बदल केला जातो.

गाण्यातल्या एका आलापाबद्दल लता अद्याप साशंक आहे. तिला तो आलाप पसंत नाही. ती लक्ष्मीला म्हणते,

"तो आलाप बरा वाटत नाही. लक्ष्मी, हा ऐक तू."

आणि ती आपल्या मनासारखा आलाप घेते. पुन्हा चर्चा. पुन्हा विचारविनिमय. पुन्हा बदल. अगदी बारीक बारीक सूचना देखील मोठ्या आस्थेने विचारात घेतल्या जात आहेत. गाण्याचे सौंदर्य वाढवणे परिणामत, वाढत आहे. आता वाद्यांची लय वाढते. वाद्यांचीच नव्हे, साऱ्या वातावरणाची जणू लय वाढली आहे गायिका, संगीत दिग्दर्शक, वादक, साऱ्यांनाच एका अनिवार वेहोषीने झपाटून टाकले आहे. नवनिर्मितीची बेहोषी. सारीजणे गाण्याशी समरस, एकतान झाली आहेत. गाणे उत्कृष्ट व्हावे याखेरीज दुसरे काहीही कोणाला सुचत नाही.

सुदर सपनो की है मंझिल कदम के नीचे
गुर्मद किसको इतनी देखे जो मुडके पीछे
तुम चलो हम चले सावनकी हवा चले
चलोऽऽ सजना

स्टुडिओंत मागून येऊन 'माइक' नीट लावून जातो. माइकजवळ एक लाकडी स्टँड आहे. हा गायकांना गाताना हात टेकण्यासाठी. खाली सतरंजी हिरवी सतरंजी. माइकमागे एक लाल मखमली. दोन्ही भिंतींना लागून दोन लाल कोच. भिंतीवर सरस्वतीची छोटी तसबीर. तिला फुलांचा हार. दुसऱ्या भिंतीवर कॅलेंडर. बाहेरच्या खोलीतून मधल्या काचेआडून हे दृश्य पाहिले तर चित्रासारखे दिसते. काचेआडच्या खोलीतली ही माणसे ॲक्वेरियममधल्या माशांसारखी फिरताहेतसे वाटते.

लता माइकसमोर येऊन उभी राहते. स्टँडवर दोन्ही कोपरे टेकून हातातल्या गाण्याच्या कागदावरून एकदा अखेरची नजर फिरवते. मिनू कात्रक तिला इशारा देतात.

गाणे ध्वनिमुद्रित करण्यासाठी बहुधा रेकॉर्डिंग मशिनमध्ये तीन ट्रॅक्स असतात. एका ट्रॅकवर गायिकेचा आवाज मुद्रित होतो. एकावर तंतुवाद्यांचा स्वर मुद्रित होतो. आणि एकावर वाद्यांचा स्वर मुद्रित होतो. प्रथम सारे आवाज स्वतंत्र घेऊन ठेवतात. त्यासाठी वेगळ्या मशिनवर वेगळी टेप लावलेली असते आणि मग त्या प्रमाणात जे वाद्य, जे स्वर हवे असतात ते या वेगळ्या टेपवर मिसळून घेतले जातात. हे 'मिक्सिंग' यथाप्रमाण करण्यावरच ध्वनिमुद्रकाचे सारे कौशल्य अवलंबून असते. मिनू कात्रक हे गेली अनेक वर्षे रेकॉर्डिस्टची जबाबदारी सांभाळीत असल्यामुळे या कामातील त्यांचे कसब वेगळे सांगायला नको.

बाहेरच्या खोलीतले रेकॉर्डिंग मशिन सुरू होते. आत लाल दिवा लागतो. गाण्याची 'अनाउन्समेंट' केली जाते.

"मेरे हमदम मेरे दोस्त, साँग नंबर फोर. टेक वन"

मशिन सुरू झाले आहे. टेप गुंडाळली जात आहे. आतल्या खोलीतली माणसे आता बाहेरच्या खोलीत, जेथ गाणे ध्वनिमुद्रित होते तेथे येऊन बसली आहेत वादकांना इशारा दिला जातो. वाद्यमेळ सुरू होतो. आणि अचूक त्यात मिसळलेला आवाज एकू येतो. लताचा आवाज. वर्षानुवर्षे न चुकता, न थकता मनपसंत काम देणाऱ्या यंत्राइतकाच तो आजही विश्वासार्ह, प्रामाणिक आहे. पहिले शब्द लताने गाइल्याबरोबर माणसे थरारतात नि स्तब्ध होतात वर्षानुवर्षे लताची अक्षरशः शेकडो गाणी ध्वनिमुद्रित केलेले मिनू कात्रक देखील गाण्याला दाद दिल्यावाचून राहात नाहीत.

सुदर सपनोकी है मंझिल कदमके नीचे
गुर्मद किसको इतनी देखे जो मुडके पीछे
तुम चलो हम चले सावनकी हवा चले
चलोऽऽ सजना जहाँतक घटा चले

शब्द न शब्द सुरा स्वच्छ. भावपूर्ण. पाण्याच्या धारेइतका प्रवाही. वाद्यमेळाच्या साथीतूनही वेगळा जाणवणारा. विलक्षण सुरेल. टोकदार.

उत्तमी धुद डोळे मिटून उभा आहे. तो गाण्याची गंमत घेत आहे. क्षणेवर तो ठेक्याने मान हलवतो

धडकन तुम्हारे दिलकी    उलझी हमारे हदमे
तुम्हरे तनकी छाया    काजल बनी पलकने
एक है वो बदन    आंचलके तले तले

दुसरे कडवे सपते. प्यारेचा चेहरा समाधानाने उजळून निघाला आहे. आपल्याला हवे होते तसे गाणे झाल्याचा आनंद त्याच्या सभोवती सुगानरोबर मिसळून दरवळत आहे.

पथरीली राहोंमे    तुमसंग मैं झूम लूगी
खावोगी जब ठोकर    छोटोसे चूम लूगी
प्यार का आजसे    हमसे सिलसिला चले

गाणे कडव्याकडव्यानून पुढे सरकत जाते. सपते. पहिल्याच 'टेक'ला गाणे हवे तसे ध्वनिमुद्रित झाले आहे. पण केवळ योगायोगाने. क्वित्येकदा कोठेतरी काहीतरी चुकते. बिनसते. आणि एकेका गाण्याचे दहा दहा, पधरा पधरा टेक सुद्धा होत राहातात. सकाळी नऊला सुरू झालेले रेकॉर्डिंग रात्री दहा वाजता किंवा दुसऱ्या दिवशी पहाटे सपल्याचीही उदाहरणे आहेत. अशा वेळी गायकाची, वादकाची, ध्वनिमुद्रकाची, सान्याचीच कसोटी लागते. सहनशीलता ममाणाबाहेर ताणली जाते. पण ही माणसे तितकीच जिद्दीची असतात. न चुकता पुन्हा पुन्हा, ताणन ताय तेच काम ती तितक्याच हौसेने, उमेदीने, ताजेपणाने करीत राहतात. पडद्यावर तीन मिनिटात सपणारे गाणे ध्वनिमुद्रित होताना कित्येकदा असे छळते.

गाणे सपल्याबरोबर सगळीकडून समाधानाचे, कौतुकाचे उद्‌गार उसळतात. 'बहोत अच्छा!' 'गाई फर्स्ट क्लास' 'वाहवा' 'क्या बात है' एकच गर्दी उडते.

आतला वाद्यमेळ आता थांबला आहे. इतका वेळ ताणून राहिलेले वादक आता अग मोकळे, सैल करतात. मुक्तेचा नि श्वास टाकतात. आणि मग मुक्तेच ध्वनिमुद्रित झालेले गाणे लगेच मोठ्या दालनात वाजवले जाते. ताजे गरमागरम गाणे. प्रत्येक वादक उत्सुकतेने ऐकत राहतो. आपापल्या वाद्याने कसा सूर दिला आहे त्याचा अदाज घेतो. येथे फक्त दृश्य नाही. बाकी गाणे थिएटरमध्ये जसे ऐकू येईल तसेच ते येथे ऐकायला मिळते ऐकणाराची अगदी गर्दी झाली आहे. आणि लता—ती कोठे तरी एका बाजूला उभी आहे तिची लहानशी सडसडीत मूर्ती आणि सबध दालन भरून राहिलेला खणखणीत आवाज याची सगती लावणे कठीण वाटते. हिने हे गाणे म्हटले असेल यावर क्षणभर विश्वासही बसत नाही

गाणे ऐकून झाल्यावर काही वेळ हावाचा, हसण्याचा, बोलण्याचा एकच कल्लोळ उसळतो सारा सच आता विस्कटला आहे. इतका वेळ गाण्यात हरवून गेलेले आपापले अस्तित्व आता जो तो वेगळे करतो आहे, शोधतो आहे.

पण लता कुठे आहे? गाणे संपताच ती त्यातून अलिप्त झाली आहे घटकेपूर्वी गाइलेल्या गाण्याचे शब्द आता तिला विचाराल तर ते तिला सांगता येतीलच असे नाही.

ती गर्दीतून वाट काढीत तेथून बाहेर पडते रस्त्यावर उभ्या असलेल्या आपल्या गाडीत जाऊन बसते माणसांच्या घोळक्यातून गाडी भुर्रकन निघून जाते. त्याच्या दृष्टीने या सर्व घटनेचा अर्थ इतकाच आहे आजचे तिचे काम संपले आहे.

—आणि अशा रीतीने आणखी एक गाणे ध्वनिमुद्रित होते. लताचे गाणे एका सोनेरा कलामथाचे आणखी एक पान लिहिले जाते.

# कानन मेहरू

## ती

आज किती आठवण्याचा प्रयत्न केला तरी, तिच्या विश्वव्यापी मोहक स्वराशी पहिल्यांदा माझी केव्हा ओळख झाली ते काही केल्या आठवतच नाही मला. आमच्या घराण्याचे संगीतप्रेम आम्हा सर्वांच भावडात उतरले आहे. पण माझ्या छोट्या भैय्यात हे संगीताचे वेड जरा जास्तच आहे. भैय्याचा आम्हाला सक्त हुकुम असे की सकाळी डोळे उघडताक्षणी रेडिओवरून पहिला स्वर कानी पडला पाहिजे तो हिचाच. तो स्वर ऐकला तरच सारा दिवस 'सुरेल' जातो अशी त्याची श्रद्धा. त्याच्या हुकुमाप्रमाणे रोज सकाळी मी आपली रेडिओला कान लावून बसायची आणि तिचे गाणे सुरू होण्यापूर्वी तिच्या नावाचा पुकार झाला की रेडिओ मोठा करून भैय्याला ते गाणे ऐकवायची. एके दिवशी माझ्या दुर्दैवाने मी चुकून भलत्याच गाण्याला रेडिओ मोठा केला. तो बेसूर आवाज ऐकल्याबरोबर भैय्या असा भडकला म्हणता. त्यावेळी त्याच्या हातून मी जी थप्पड खाल्ली तिचे अद्यापही मला चांगले स्मरण आहे.

काही वर्षे लोटली आणि भैय्याचा तिच्याशी परिचय होण्याचा योग आला. त्यावेळी त्याच्या पेक्षाही आनंदाने अधिक फुलून गेले होते ती मी! नंतर काही दिवस मी तिचे नुसचे नावच ऐकत होते. पण एके दिवशी तिची प्रत्यक्ष ओळख करून घेण्याची सुवर्णसंधीही लाभली मला. स्थळ : दिल्लीचा पालम विमानतळ. काळ जानेवारी महिन्यातली कुडकुडती रात्र. अशी वेळी विमानातून एखादी छोटीशी बाहुली उतरावी तशी ती उतरली. धक धक धक—माझ्या छातीचे ठोके मलाच ऐकू येत होते. कॉलेजात पहिले लेक्चर देतानाही इतकी घाबरले नसेन मी. माझे सर्वांग थरथर कापत होते. काहीसे धर्डीने नि काहीसे भीतीने. तेवढ्यात अचानक ती माझ्यासमोर येऊन उभी राहिली. मी पुढे पाऊल टाकण्या आधीच बासरीचे कोमल सूर उमटले, "तुम्हीच कानन ना!" आणि एकदम तिने माझा हात हाती घेऊन जोराने दाबला. त्या प्रेमळ स्पर्शाच्या उबेमुळे माझ्या मनातल्या अनिश्चिततेचा उरलासुरला अंशही पार विरघळून गेला. त्यानंतर 'अशोक' हॉटेलमध्ये आम्ही पोहोचेतोपर्यंत तिने मला बाहुलीसारखे आपल्याजवळ राखले होते. त्या काही घटकांच्या सहवासात तिच्या व्यक्तित्वाच्या ज्या एका विशेषाने मला विलक्षण मोहून टाकले तो विशेष म्हणजे तिचे अत्यंत

निर्मळ मुक्त हसे ते खळखळते रुणझुणते हसू. कानी पडले की तिच्या सानिध्यात आलेल्या कोणत्याही व्यक्तीला तिच्यापासून आपले परकेपण फार काळ रासताच येत नाही मुळी!

दुसरा दिवस उजाडला 'अशोक' हॉटेलमधल्या एका भव्य रानेशाही दिवाणखान्यात तिचे एक वेगळेच रूप माझ्या निदर्शनाला आले तेथे चित्रपटाच्या दुनियेमधले अनेक चादतारे गोळा झाले होते त्याच्या झगमगाटात ही किती वेगळी दिसत होती. त्या मडळींचा सारखा आग्रह चालला होता, "तुम्ही बाहेर जायचे नाही ह, इथेच आमच्यानरोबर राहायचे मग आपण बरोबर ट्रिप, एकत्र खाऊपिऊ, मजा करू." आणि ही मान पुन्हा पुन्हा माझा हात पकडीत म्हणत होती, "मी हिच्या घराच जेवायला जाणार आज!" या गोष्टीची तर मी स्वप्नातही अपेक्षा केली नव्हती. तिचा तो हट्ट पाहून मला मोठा प्रश्न पडला, आता काय करावे बाई? आमचे एवढेसे साधे गरिबाऊ घर. त्या घरात हिचे कसे स्वागत करू? हिला कुठे बसवू? कुठे जेवण देऊ? काय पक्वान्न बनवू हिच्यासाठी? मन विलक्षण गाधळून गेले होते. वरवर मात्र, मी खोटे हसत होते. तोंडातून उलट सुलट उत्तरे बाहेर पडत होती. अखेर तो प्रसग तर मोठ्या शिताफीने टाळला मी, आणि तिला 'गलार्ड' मध्ये जेवू घातले. ती तेथे जेवली खरा. पण तिथून निघताना माझ्याकडे बघून अशा मिष्किलपणाने हसली म्हणता कोवळ्या उन्हासारख्या त्या प्रसन्न हास्यात अशी तक्रार होती, "मला माहीत आहे, या खेपेला आपल घर मला दाखवायच मोठ्या शिताफीन टाळल आहेस त नाही का? पण पुढल्या खेपेला मात्र हे चालायच नाही ह तेव्हा इथ येईन ती सरळ तुझ्या घरीच येऊन उतरेन मी!"

नतर ती दिल्लीहून मुबईला परत गेली पण त्या पहिल्या भेटीतच तिने माझे मन असे जिंकून टाकले की दुसऱ्या दिवशी वर्गात मैथिलीशरण गुप्ताचे 'पचवटी' काव्य शिकवीत असता मला एक सारखे भय वाटत होते 'लक्ष्मणा' ऐवजी मी चुकून 'लता' तर नाही ना म्हणून जाणार?

दुसऱ्या खेपेला आमची भेट झाली तोवर मनाने आम्ही अधिक निकट आलो होतो. दर म्यानच्या काळात झालेल्या पत्रव्यवहाराने आमच्यातले स्नेहबधन दृढतर केले होते यावेळी ती दिल्लीला आली तेव्हा मी तिला माझ्या घरीच जेवायला घेऊन गले. तिच्यासाठी बाहेरची खोली आम्ही सजवून ठेवली होती आणि तिथला सारा पसारा आतल्या खोलीत लपवला होता पण हिला बाहेरच्या खोलीत कुठून चैन पडायला? ती जी आली ती थेट आमच्या स्वैपाकघरातच येऊन थडकली आणि तिथे माझ्या आईशी मोकळेपणाने गप्पा मारीत बसली झाले आम्ही केलेली सारी वरवरची सफाइ, सब दिखाऊ सजावट कुठच्याकुठेच गेली मी तिच्यावर फार फार रागावले. पण ती गोड हसून मला म्हणाली, "त्यात काय येवढे बिघडले? तुला ठाऊक नाही कानन, तुमच्या जागेपेक्षाही छोट्या जागत दिवस काढले आहेत मी आणि असे बघ, मी भेटायला आले ती फर्निचरला नव्हे की वड्या आलीशान मकानाला नव्हे मी भेटायला आले आहे तुला, तुझ्या घरच्या माणसाना तुम्ही निश्चयात ती जागा माझ्या दृष्टीने सुदरच नाही का?" माझे हृदय भरून आले एवढे थोर व्यक्तिमत्व आहे ह किती सरळ अन् अकृत्रिम स्वभाव!

उन्हाळ्यामध्ये मला आपल्याबरोबर काश्मीरला घेऊन जावे अशी तिची फार इच्छा. तिने मग त्याप्रमाणे खूप आग्रहही केला तथापि, कामाच्या अडचणीमुळे मला काही तिच्याबरोबर जाता आले नाही फार वाईट वाटले पण मनात विचार करीत होते, ही तरी तेथे फार मजेत, आनदात दिवस काढीत असेल. त्यातच मला समाधान होते पण काश्मीरहून तिचे पत्र मग आले ते काही वेगळेच सागत होते. त्यावेळी मला जाणीव झाली की, वरवर अत्यत उत्फुल्ल, चचल आणि लहरी वाटणाऱ्या या व्यक्तिमत्वाच्या अतर्यामी गहन सहानुभूती आणि गभीर विवेक याचा अनुपम सगम झालेला आहे! काश्मीरच्या विलक्षण सुन्दर निसर्गापेक्षाही काश्मीरवासी जनतेच्या निपट निर्धन अवस्थेचा तिच्या मनावर अधिक ठसा उमटला होता आपल्या पत्रात तिने मला लिहिले होते,

"इथे जागोजागी वाहणारे खळखळते निर्झर पाहिले की त्याच्या जागी मला इथल्या गरीब लोकांचे अश्रु वाहताना दिसतात कानन; आणि इथे उमलणारी सुंदर रंगीबेरंगी फुले पाहिली की इथल्या दरिद्री जनतेकडे पाहून निसर्गदेवता निष्ठुर उपहासाने खदखदा हसत आहे असा मला भास होतो! इथे काश्मीरमध्ये भारी भारी कपडे घालून हिंडायची शरम वाटते मला. आपल्या सुखविलासांसाठी गरिबांच्या तोंडावर चार चांदीचे तुकडे फेकून त्यांना कष्ट करायला लावणं निदान मला तरी सर्वस्वी अशक्य आहे. कधी कधी मनात येते, इथे येणाऱ्या अनेक प्रवाशांप्रमाणे माझेही हृदय पाषाणाचे असते तर फार बरे झाले असते. मग मी त्यांच्याप्रमाणेच येथे चैनीत आणि मजेत दिवस काढत राहिले असते!" असे किती लोक असतील बरे की जे, सुखाची सर्व साधने आपल्यासमोर हात जोडून उभी असताना इतराच्या दुःखाने दुःखी होण्याइतके मनाचे हळवे असतील? पण तो हळवेपणा, ती संवेदनाशील वृत्ती इतक्या ऐश्वर्यातही हिने जपलेली आहे. मला आठवते, बडे गुलाम अली खांसाहेबांच्या दीर्घकालीन आजारानंतर त्यांचा दुबळा झालेला स्वर जेव्हा हिने रेडिओवरून ऐकला होता तेव्हा ही अशीच कासावीस होऊन खूप रडली होती. किती प्रयास पडले होते तेव्हा तिला पूर्ववत शांत करायला!

उत्तर भारताचा प्रवास करता करता ती पुन्हा एकदा दिल्लीला आली होती. यावेळी मात्र मोठ्या प्रयासाने रजा मिळवून मीही तिच्याबरोबर भटकायला बाहेर पडले होते. हृषिकेश, हरिद्वार येथील रम्य निसर्गशोभा बघताना तिला झालेला आनंद पाहणे हा देखील एक अविस्मरणीय अनुभव होता! मी तोच अनुभव घेण्यात साठवण्यात मग्न होते. त्या प्रवासातच तिच्या अभिरुचीची आणि विपुल वाचनाची मला साक्ष पटली. मराठी साहित्याचे तर तिने वाचन केले असलेच पाहिजे. पण हिंदी, बंगाली आणि उर्दू साहित्यांतले जे संदर्भ तिला झटाझट आठवत होते ते पाहून मला खरोखरच विस्मय वाटत होता. आणि तरीही मधूनमधून तक्रारीच्या सुरात ती मला म्हणत होती, "कानन, माझ्या पाठीमागे सतत असलेल्या कामाच्या तगाद्यामुळे व्हावे तेवढं वाचन होत नाही ग माझ्या हातून."

वृंदावन आणि मथुरा येथे भगवान् श्रीकृष्णाचे दर्शन घ्यावे हीही तिची मनीषा होती. बिहारीजींची परमसुंदर मूर्ती बघून ती अशी गहिवरली की तिच्या त्या भावावेशाने आम्हीही चकित होऊन गेलो. आजच्या बुद्धिवादी आणि अश्रद्ध युगात असे एखादे श्रद्धाशील हृदय दिसून आले की मनात खोल कुठे तरी खूप बरे वाटते.

मुंबईला जाऊन तिची गाणी कशी ध्वनिमुद्रित होतात ते एकदा बघावे अशी फार दिवसाची इच्छा होती. शेवटी तोही योग आला. मी मुंबईला आल्यानंतर मला दुहेरी आनंदाचा लाभ झाला. एक म्हणजे तिच्या अकृत्रिम आतिथ्यशीलतेचा प्रत्यय आणि दुसरे म्हणजे तिच्या गाण्याच्या अपूर्व गोडव्याचा अनुभव. मी त्या आनंदात अशी काही संपूर्ण बुडून गेले. ध्वनिमुद्रणाच्या वेळी तिचे गाणे ऐकताना वाटे, हिच्या मुखातून सूर उमटताना ही त्या शब्दांना गीताचा आत्मा पुरेपूर गवसला आहे. ध्वनिमुद्रणाचे कार्य म्हणजे खरोखरी एक यांत्रिक करामत. पण ही गाऊ लागली की त्या यंत्रालाही चैतन्याचा स्पर्श होतो आणि म्हणूनच मग ते गाणे ऐकताना रसिकांची हृदये रसमग्न होतात!

तिच्या स्वराची अनुपम जादू एकदा ताजमहालाच्या सान्निध्यातच माझ्या प्रत्ययाला आली होती. तो मार्च महिना होता. आम्ही सर्वजण आग्र्याला गेलो होतो. चांदणी रात्र होती. संगमरवरी ताजमहाल चांदण्यात न्हात स्तब्ध उभा होता. सर्वत्र विलक्षण शांतता पसरली होती. झाडाचे पान देखील हलत नव्हते. आणि एकाएकी उत्स्फूर्तपणे ही गाऊ लागली. सारे वातावरण स्वरांनी भरून गेले. आम्ही सारेजण स्वरसागरात बुडून आमची तंद्रा लागली. ताजची देखभाल करण्यासाठी ठेव-

ऐन तरुणपणीही ओढवली गेल्या होत्या. समोर मृत्यूचे थैमान. आणि इकडे हिचे निरागस चैतन्यमय सूर. विरोधाने ते दृश्य मनावर अधिकच ठसत होते. सारेजण तिच्या गाण्याच्या प्रभावाने मंत्रमुग्ध होऊन गेले होते. गाणे संपले आणि रोग्यांपैकी एकजण पुढे येऊन आदराने तिला म्हणाला, "बाईसाहेब, इथं गाणं म्हणायला खरं मनाई आहे." पण त्याच्या त्या वाक्यात देखील हिच्या स्वरमाधुर्याचे कौतुकच ओतप्रोत भरून राहिले होते.

तिच्याबरोबर मुंबईला गेले तेव्हा आपल्या कुटुंबियांबद्दलचे तिचे प्रेम आणि स्नेह्यांबद्दलचा जिव्हाळा याचे दर्शन घेण्याची मला संधी मिळाली. आपल्या कुटुंबाची तर ती प्रमुखच आहे. सान्या संसाराचा भार ती स्वतः वाहते आहे. घरच्या लोकांची आशा निराशा, त्यांची सुखदुःखे सारे हिने आपले मानले आहे. घरातल्या एखाद्या व्यक्तीच्या मुखावरून चिंतेची किंवा दुःखाची पुसटशी रेषा जरा उमटलेली दिसली तरी हिने आकाशपाताळ एक केलेच म्हणून समजावे. त्याच्या अगदर उमटलेला एक लहानसा ओरखडा पाहिला तर स्वतःवरच्या जबरदस्त घावाचाही तिला विसर पडतो.

गेल्या डिसेंबरातली गोष्ट. रेकॉर्डिंगच्या वेळी भूक लागल्यामुळे तिने सँडविचेस मागवली. काय होते त्या सँडविचेसमध्ये देव जाणे, पण सगळ्यांना सोडून त्यांनी आपली हिलाच अन्नविषबाधा केली. तिच्याबरोबर मीहि ती सँडविचेस खाल्ली होती. माझ्यावर त्याचा इतका परिणाम झाला नाही. ती मात्र भयंकर आजारी झाली. तीन दिवस ती पुरी बेहोष होती. मग ती शुद्धीवर आली. मी तिला भेटायला गेले. मला पाहताच पहिला प्रश्न तिने विचारला तो हा, "कशी आहे तुझी प्रकृती आता?"

पुढे ती बरी झाली. आई, भाऊ, बहिणी, परिवार सगळ्यांचे प्राणच परत आले!

तिच्याइतकी कार्यमग्न, उद्योगात गढलेली व्यक्ती दुसरी दाखवणे कठिण जाईल. पण आपल्या या सगळ्या कामातून देखील दुसऱ्याच्या आवडीनावडींवर तिचे बारीक लक्ष असते. तिला अनेक सुंदर सुंदर वस्तू जमवण्याचा षोक आहे. त्यातल्या एखाद्या गोष्टीकडे आपण चुकून कौतुकाच्या नजरेने पाहिले किंवा प्रशंसेचे दोन शब्द उच्चारले की झालेच. दुसरे दिवशी ती वस्तू ती आपल्यासमोर आणून हजर करील. ती घ्यायचा आग्रह करील. आणि आपण संकोचाने नकार दिला तर प्रेमळ पणाने धमकावून म्हणेल, "नाही ना घेत तू? ठीक आहे. फेकून देते मी आता ती रस्त्यावर!" यामुळे होते काय, तिच्याजवळ असलेल्या एखाद्या वस्तूची निव्वळ रसिकपणे प्रशंसा करणेही अवघड होऊन बसते. कशाला सहज चांगले म्हणायचीही भय वाटते. कधी कधी मनात येते, हिला म्हणावे, "तूच मला फार आवडतेस बघ." पण माझी खात्री आहे की असे उद्गार मी काढले की आपल्या प्रेमळ दृष्टीतून स्नेहाचा वर्षाव करीत हसून ती म्हणेल, "मी आवडते ना तुला? मग चल ना मलाच घेऊन आपल्याबरोबर!"

एकीकडे स्नेहवृत्तीची ही पराकाष्ठा, तर दुसरीकडे या सधारी जीवनातही कटाक्षाने जोपासलेली एक विलक्षण निःस्पृहता, निर्लिप्तता, अनासक्ती. तिच्या या विरक्त वृत्तीचे प्रत्यंतर अनेक बारीकसारीक गोष्टींतून सारखे येत असते. मोठ्या मोठ्या प्रदर्शनांबद्दल भीती, शब्दजाळ अभिनंदनाबद्दल अनावड, स्तुतिपाठकांपासून स्वतःला दूर ठेवण्याचा कटाक्ष, आणि एकंदरच गर्दीबद्दल आणि गजबजाटाबद्दल अरुची तिच्या या असल्या स्वभावामुळे कित्येकदा तिच्याबद्दलचे गैरसमजही फैलावत जातात. लोक तिला अहंकारी समजतात. तिच्यावर गर्विष्ठपणाचा आरोप करतात. नाना वदंता पसरतात. असले काही कानी पडले की मग मात्र एरव्ही शांत असणारी ही एकदम रागाने भडकून उठते. 'आशुतोषिनी' आहे ती 'आशुरोषिनी' बनते. तिला जवळून बघण्यापूर्वी मी देखील तिच्या संतापी स्वभावाच्या अशा काही गोष्टी ऐकलेल्या होत्या आणि त्यामुळे मनातून मी थोडीशी भिऊनच होते. वाटे, काय सांगावे, हिचा संताप कशाने भडकून उठेल ते! पण जेव्हा मी तिच्या संगतीत काही काळ घालवला तेव्हा तिच्या वर्तनात असा काहीच विक्षिप्तपणा या विषयी मला आढळून

भाळी नाही एक मात्र मला जाणवले, ती अत्यंत स्वाभिमानी आहे मर्मी झालेली जखम सांभाळावी तशी ती आपला स्वाभिमान जपते आणि त्यावर झालेले आघात मात्र ती कधीही सहन करीत नाही

त्यामुळेच फिल्मी दुनियेतल्या अतिरथीमहारथींना, इथल्या महान दिग्गजांना तिच्यापुढे मूग गिळून बसावे लागते ते तिच्या तोंडावर तोंडापुरती तिची स्तुती करतात, आणि तिची पाठ वळताच तिच्याबद्दल वाईटसाईट बोलतात, अशा तोंडपुज्या लोकांचा तिला संताप येत असल्यास त्यात न समजण्याजोगे, आश्चर्य वाटण्याजोगे काय आहे बरे! अशा खोट्या लोकांची तिला विलक्षण घृणा आहे आणि ती स्वत निखळ प्रामाणिकपणे वागणारी असल्यामुळे आपला त्रोध स्नेहाच्या, अभिनयाच्या कृत्रिम आवरणाखाली लपवून ठेवणे तिला कधीच जमले नाही जमणारही नाही यामुळेच मुंबईसारख्या महानगरात इतकी वर्षे आयुष्य घालवूनही येथील कृत्रिम सभ्यतेचे भडक फसवे रंग तिच्या व्यक्तिमत्वावर अजूनही चढले नाहीत यामुळेच इथल्या घराच्या चिखलातून जीवनरस ग्रहण करतानाही तिने आपले व्यक्तित्व कमळासारखे अलिप्त, स्वच्छ आणि सत्त्वशील ठेवले आहे फिल्मी जग हे अविश्वासाचे जग आहे इथं जीवनाची मूल्ये प्रत्यही बदलतात सामाजिकता, आत्मीयता, गार्हस्थ्य या सुंदर भावनांची येथे क्वचितच कदर केली जाते इथले एकदा रस्ते फुटले, भग्न झाले की कोणी कोणाचा नव्हे हे असे निघृण विश्व आहे की खाली पडलेल्याला तुडवून त्याच्या अंगावरूनच मागल्याला पुढे जावं लागते आणि त्यालाच इथे प्रगती, उन्नती असे म्हणतात मनामध्ये घृणा, ईर्ष्या, द्वेष, यांचे विष खदखदत असताना इथे चेहऱ्यावर कृत्रिम हास्याचा खोटा मुखवटा चढवला जातो आणि फसवणूक हा इथला नियमाचा परवलीचा शब्द होऊन बसला आहे

अशा या दुनियेत हिच्यासारखी निखळ पारदर्शी मनाची माणसे, आधुनिक सभ्यतेचे दडपण मनावर घेऊन जगण्याचा इन्कार करणारा माणस किती असतील बरे? म्हणूनच हिला वागता बोलताना पाहिले म्हणजे क्षणभर थांबून मनाला विसावा घ्यावासा वाटतो आणि या दुनियेला गेलेले अविश्वासाचे, खोटेपणाचे, दंभाचे तडेही आज ना उद्या भरून निघतील अशी आशा मनात निर्माण होते



हेमंतकुमार

# सफल जन्म हा

लता मंगेशकर हे आता एका व्यक्तीचे नाव राहिलेले नाही. चित्रपटसंगीताच्या इतिहासातील एका कालखंडाचेच ते नाव होऊन बसले आहे. सम्राज्ञीप्रमाणे राज्य भोगलेल्या सुराचे ते नाव आहे. या वैभवाच्या मुळाशी यशासाठी करावी लागणारी कष्टमय साधना आहे. तसेच निर्भर आनंदाचे, सुखासमाधानाचे क्षणही आहेत.

पचरा वर्षांपूर्वी हिंदी चित्रपटाच्या जगात माझे बस्तान बसवण्यासाठी मी जेव्हा धडपडत होतो तेव्हा 'फिल्मिस्तान' च्या एका ऐतिहासिक चित्रपटासाठी संगीत देण्याची संधी मला मिळाली. त्याच चित्रपटात 'वंदे मातरम्' हे सुप्रसिद्ध गीत ध्वनिमुद्रित करावयाचे होते. माझी इच्छा लतानेच ते गीत गावे अशी होती. फिल्मिस्तानच्या व्यवस्थापकांनी मात्र त्यांच्या व लताच्या संबंधामध्ये निर्माण झालेल्या दुराव्याची आधीच मला स्पष्ट कल्पना दिली. ते काही तिला गाण्यासाठी बोलावू शकत नव्हते. मग मी स्वत गरच सर्व जबाबदारी घेऊन तिला भेटलो. तिने तावडतोब मला होकार दिला. ध्वनिमुद्रणाच्या वेळी तिची प्रकृती ठीक नव्हती. पण ती स्टुडिओत आली आणि मला म्हणाली, "तुमच्या-सारख्या नव्या कलावंताबरोबर काम करायचे नसते तर आजचे ध्वनिमुद्रण मी रद्द केले असते."

तिने ते गाणे म्हटले. त्यावेळी मला माझा जो गौरव झाल्यासारखा वाटत होता त्याचे शब्दांतून वर्णन करणे खरोखर कठीण आहे. मला मुखोद्गत असलेले 'वंदेमातरम्' हे गीत. पण त्या गीताच्या परिचित चरणांचाही मला त्या दिवशी जणू प्रथमच अर्थ कळत होता.

त्या चित्रपटाशी संबंधित असलेल्या एका 'ग्रुप' ने त्या गीताचे पस्तीस प्रदीर्घ 'टेक्स' घ्यायला लावले. त्यांच्या त्या कृतीमागे असलेले गैरसमज मला माहीत होते. त्यावेळी माझी मनःस्थिती मोठी विष्मण झाली होती. क्षणाक्षणाला मी पराभूत होतो आहे असे मला वाटत होते. परंतु लता क्षणभरही डगमगली नाही. ती माझ्याशेजारी हसतमुखाने, समजूतदारपणाने आणि धीटपणाने उभी राहिली होती. न दमता गात होती.

दुसऱ्याचा प्रथम विचार करण्याचा हा तिचा स्वभाव या सर्व वर्षांतून मी सतत पाहत आलो आहे. चार पैशांचे चलनी नाणे असलेल्या एखाद्या लोकप्रिय संगीतदिग्दर्शकापेक्षा एखाद्या नवख्या

हवा

कलावंतानी, नवनवीन उमेदी बाळगून असलेल्या एखाद्या होतकरू गीतकाराची ती प्रथम निवड करते त्याला आवर्जून संधी देते.

कलाकार म्हणून लता जशी अतुलनीय आहे तशी एक व्यक्ती म्हणूनही ती अजोड आहे. केवळ हाडामासाने युक्त असलेल्या माणसाच्या या जगात क्वचितच आढळणारे संवेदनाशील अंतःकरण आणि उत्कट चैतन्य तिच्या ठिकाणी आहे. एखाद्या चांगल्या बातमीने, गाण्यातल्या एखाद्या सुंदर सुरावटीने वीणेच्या तारेखारखी झंकारताना ती मला दिसली आहे. तशीच एखाद्या तात्त्विक प्रश्नासाठी पर्वतासारखी ताठ, अचल उभी राहिलेलीही मी तिला पाहिली आहे.

तिच्यासारखी कलावती शतकाशतकातून एखादीच जन्माला येत असते.

मी रूक्ष, वैराण शतकात जन्मलो नाही याचा मला मोठा आनंद वाटत आहे



श्रीपाद जोशींबरोबर ल्हानगी लता स्टुडिओन आली. मला वाटले होते नायिका चांगली मोठी असेल. त्या एवढ्याशा मूर्तीची आणि माझी ओळख मात्र झाली नाही. चित्रित झालेली फिल्म घेऊन मुबईला मी जातच होतो. एक दिवस फिल्म डेव्हलप झाली आणि सर्वांच्या आधी पहिल्या प्रथम मी लताला पडद्यावर पाहिले. माझ्या आयुष्यातील तो एक भाग्याचा योग होता असे आज मला वाटते.

विनायकरावांनी 'नवयुग' सोडून 'प्रफुल्ल' कंपनी काढली तेव्हा मीही पुण्याहून कोल्हापूरला त्यांच्याकडे आलो. 'प्रफुल्ल'च्या प्रत्येक चित्रात लताबाईंना भूमिका आणि गाणी असायचीच. संस्थेच्या वाढदिवसादिवशी मोठा समारंभ व्हायचा. त्यात लताबाई आणि मीनाक्षी यांची गाणी, वसंत एरिक यांच्या नकला असा मोठा भरगच्च कार्यक्रम असे. कधीकधी लतालाही नक्कल करायची लहर यायची. लोकांचे मनोरंजन ती सहजपणे करायची. एकोणीसशे पंचेचाळीसच्या सुमारास विनायकरावांनी कोल्हापूरही सोडले आणि आम्हा सर्वांसह ते मुबईला आले. प्रफुल्लचे सर्व 'युनिट' 'विष्णुबाग गिरगाव' इथे ठेवण्यात आले. मीही तेथे राहू लागलो.

मा. विनायक इंपिरियल सिनेमासमोर राहात असत. तिथेच लताचीही व्यवस्था केली होती. त्यावेळी लताला एक खांसाहेब गाणेही शिकवू लागले होते. ती. माई, मीना, आशा, लता, हृदयनाथ हे सर्व नानाचौकात राहत असत. त्यांच्याच घरातल्या एका खोलीत एडिटिंग रूम करण्यात आली होती. त्यामुळे मी नाना चौकात नेहमीच जाऊ लागलो. संध्याकाळी लताबाई आपल्या आई भावंडांना भेटण्यासाठी त्या घरी यावयाच्या. परंतु इतक्या सर्व घडामोडी चालू असूनही आमचा परिचय मात्र वाढला नव्हता. आम्ही एकमेकांना फक्त ओळखत होतो. एके दिवशी ही सर्व भावंडे 'दिवाळी' नावाचा चित्रपट पाहायला निघाली—पण सगळीच इतकी ल्हान होती की त्यांच्याबरोबर सोबतीला कोणीतरी जावयास हवे होते. ती. माईंनी मला त्यांच्याबरोबर पाठवले आणि त्या दिवसापासून आमची ओळख वाढत गेली. काही काळातच मी त्यांच्या घरातीलच एक झालो. ती. माईंच्या मायेचे पांघरूण त्यांच्या पाच मुलांच्या बरोबरीने माझ्याही अंगावर घातले गेले. मी पुढे पत्नीसह मुबईत स्थायिक व्हायचे ठरविले पण राहायला जागा नव्हती तेव्हा ती. माईंनीच आपल्या घरातील एक खोली मला रिकामी करून दिली. आमचा जिव्हाळा दिवसेंदिवस दृढ झाला. आता सगळ्याचे सगळे ठीक चालू झाले आहे असे वाटायला लागले. एवढ्यात ज्यांच्या जिवावर आम्ही मुबईत आलो होतो त्या विनायकरावांचेच देहावसान झाले. सर्वांचीच स्थिती बिकट झाली. मी लताला विचारले "लता, आता तुमचे कसे होणार?" मला वाटत होते, मी पुरुषमाणूस. माझे कसेही निभावेल या छोट्या मुलीचे कसे होईल? पण लताने नशीब उघडण्यासाठी आपल्या प्रयत्नांची शिकस्त सुरू केली. कोणीही सांगितले की अमुक तमुक दिग्दर्शकाला जाऊन भेट की लता तेथे गेलीच. कित्येक वेळा मीही तिच्याबरोबर जाई आणि तिच्याइतकीच निराशा पदरी घेऊन परत येई. ही सर्व पायपीट चालू असताना ती. माईंनी गोव्यातील त्यांच्या मालकीचा डोंगर कोणाला न सांगताच विकला. त्यांच्यावर गुजराण चालू झाली. अखेर श्रीमंगेशावरील माईंची भक्ती एक दिवस फळाला आली. बॉंबे टॉकीजच्या 'मजबूर' चित्रपटासाठी गुलाम हैदर यांनी लताला प्लेबॅकसाठी बोलावले. लता ग्रँटरोडहून मालाडपर्यंत लोकलने जायची आणि त्यापुढे भर उन्हात चालत बॉंबे टॉकीजच्या स्टुडिओत जायची. केव्हा केव्हा मी तिला या प्रवासात सोबतही करीत असे. या कष्टातूनच लताच्या आयुष्यात भाग्याचे दिवस उजाडले. 'आये गा आये गा'च्या सुराने आसमंत भारून गेले.

खरे म्हणजे खडतर दिवसांत अगर वैभवाच्या प्रारंभीही लता इतकी ल्हान होती की कसे बोलावे, कसे वागावे हे तिला कळणे अवघडच होते. पण मी पाहिले आहे की तिच्यावरील जबाबदारीची जाणीव जशी तिला झाली तशी सगळी समज तिला आपोआपच प्राप्त झाली—ती अगदी

उज्ज्वल शहाणपणाने योग्य ती पावले टाकीत चालली. 'मजबूर' नंतर लताचे यश दुमदुमले आणि अखिल भारतातील संगीत दिग्दर्शकांची येजा तिच्याकडे सुरू झाली. एकेकदा ज्यांनी 'बोळवण' केली होती तेही येऊ लागले. लता पूर्वीचे अनुभव मनात तळाशी ठेवून सर्वांकडेच गाइली, आणि 'हिल्मन' गाडीच्या रूपाने एक दिवस ते छोटेसे वैभव दाराशी उभे राहिले. त्या मोटारीची पूजा नारळ फोडून झाली त्यावेळच्या आम्हा सर्वांच्या आनंदाचे वर्णन करणेही अशक्य आहे. पुढील वृत्तांत, अगदी सिनेमाच्या शब्दात सांगायचा म्हणजे, 'हिलमन 'कार मिक्स होऊन 'शेवरोलेट कार' आली आणि ती. माईंनी अगदी यथोचित असे 'शुभलक्ष्मी' हे नाव तिला ठेवले. यापुढील काळात लताच्या कामाचा वेग अगदी तुफान होता. यातून सवड होईल तेव्हा स्टेडियमजवळील 'पर्शियन डेरी'त एकत्र जमून आम्ही सर्वजण मनसोक्त मजा करीत असू.

लताची ही वाटचाल चालू असताना आम्ही 'उदयकला चित्र' या संस्थेची जुळणी करीत होतो. तिच्यातर्फे 'राम राम पाव्हणं' चित्र काढायचे ठरले. दिनकर पाटलांनी आणि मी मिळून कथानक तयार केले. कै. डी. ए. पाटील यांच्या साहाय्याने पैशांची जुळवाजुळव चालू होतीच. संगीत देण्याचे काम लताला द्यायचे हेही निश्चित करून तिला मोठ्या आत्मविश्वासाने विचारायला गेलो. त्यावर "एम्. आर. तुम्ही भागीदार आहात तेव्हा मी संगीत जरूर देईन" असा विश्वासाचा निर्वाळा तिने उत्तरातून दिला. आमचे चित्रपटाच्या यशाच्या दृष्टीने पंचाहत्तर टक्के काम झाले. या काळात लता इतकी तिच्या उद्योगात बुडालेली होती की मोटारीतून जाता येताच तिने 'राम राम पाव्हणं'च्या गीतांना चाली लावल्या. या चित्राचे संगीत खूप गाजले. पण लताने आमच्याकडून मुळीच मोबदला घेतला नाही. कालांतराने 'उदय कला' बंद झाली. मी पुन्हा काय करावे ह्या विवंचनेत पडलो. एक दिवस लताबाईंना हे समजले तेव्हा त्या म्हणाल्या "एम्. आर. तुम्ही एखादी चित्रसंस्था का सुरू करीत नाही? मी भागीदार होईन तुमच्या संस्थेची." मग क्षणाचाही वेळ न दवडता लताबाई, दिनकरराव पाटील आणि मी अशा तिघांनी 'सुरेल' चित्र काढले. या संस्थेच्या पहिल्या 'वादळ' या चित्रपटाला 'मॅजेस्टिक 'मध्ये पहिल्या शोला इतकी तुफान गर्दी झाली की पोलीस बोलावून रस्त्यावरील वाहतूक सुरू करून घ्यावी लागली. कोणत्याही मराठी चित्रपटाला एवढ्या गर्दीला कधीं तोंड द्यावे लागले नसेल. या गर्दीचे कारण एकच होते. या चित्रपटाच्या निर्मात्या लता मंगेशकर होत्या!

'वादळ' नंतर त्याच जोषात आम्ही 'कांचनगंगा' काढले. त्या चित्राचे चांगले स्वागत झाले. पण नंतरचे 'भैरवी' हे हिंदी चित्र मात्र मुहूर्तावरीच थांबून राहिले. लताबाईंना कामाच्या व्यापातून 'सुरेल चित्र 'कडे लक्ष देणेही जमेना. तेव्हा त्यांनी आपली भागीदारी काढून घेण्याचे ठरविले. पण त्या वेळीही सर्व व्यावहारिक बाजू मोकळी करून देऊन मोठ्या मनाने 'सुरेल चित्र' त्यांनी माझ्या नावावर करून दिले. निर्माता होण्याचे भाग्य केवळ त्यांच्यामुळेच मला मिळू शकले. आजपर्यंतच्या माझ्या चित्रपटांची गाणी सर्व मंगेशकर भावंडांनी विनामूल्य गायलेली आहेत. पण त्यांचे औदार्य आणि प्रेम एवढ्यावरच थांबलेले नाही. 'गृहदेवता' या आमच्या चित्रपटाला राष्ट्रपती-पदक मिळून त्याचा सन्मान झाला आणि आशियाच्या फिल्म-फेस्टिवलसाठी त्या चित्राची निवड झाली. त्या निमित्ताने, निर्माता आणि दिग्दर्शक या नात्याने मला ताश्कंदला जाण्याची संधी चालून आली. परंतु धंद्यात आलेली आर्थिक खोट इतकी की जबरदस्त होती की मी ताश्कंदला जाऊ शकत नव्हतो. हे लताबाईंना कळताच "माणसाला अशी संधी क्वचितच लाभते तेव्हा जाण्याची तयारी करा" असा त्यांचा निरोप आला आणि पैशाची सोयही त्यांनी स्वतःच केली. अशा रीतीने केवळ त्यांच्यामुळेच मी परदेशची यात्रा करू शकलो.

ताश्कंदला पोहोचताच मी प्रथम लताला ट्रंक कॉल केला. मी बोलत होतो तेव्हा माझ्या शेजारी सुप्रसिद्ध गायिका नूरजहां बसलेली होती. मी फोन खाली ठेवताच तिने विचारले, "तुम्ही भारतीय

आहात?" मी "होय" म्हणताच तिने लताबद्दल विचारायला सुरुवात केली. आता तिच्याबरोबरच मी बोलणे असे निश्चित सांगताच "अहो, मला तिच्याबरोबर बोलायचे होते हो" असे म्हणून ती किती तरी वेळ हळहळली. त्या सर्व पर्यटनात जेव्हा जेव्हा वेळ मिळाला तेव्हा नूरजहां लताची गाणी आणि तिचा आवाज यासेरीज दुसऱ्या वेगळ्या विषयावर माझ्याशी बोल्लीच नाही.

लताबाईंना फोटोग्राफीचा फार नाद आहे. त्यांच्या या छंदात कॅमेरा घेण्यापासून सर्व गोष्टीत मी त्यांना मदत केली आहे. त्यांनी घेतलेले फोटो कलादृष्ट्या इतके चांगल्या दर्जाचे आहेत की एकदा ते पाहिलेली व्यक्ती ते विसरू शकणार नाही.

सिनेमात काम करण्याच्या वेडाने लावलावून अनेक तरुणी मुंबईत येतात. त्यांना काम तर मिळत नाहीच पण जवळचे पैसे मात्र संपून जातात. मग आधाराला त्या लताबाईंकडे जातात. लताबाईंनी असे किती लोकांना उपकृत केले आहे ते त्यांचे त्यांनाच ठाऊक! गर्व ही गोष्ट त्यांना माहीतच नाही. शिवाय वेळ अगदी सहज प्रेमाने त्या आपल्या भावंडांना इतक्या चांगल्या रीतीने वागवतात की त्यांच्या परस्परांवरील प्रेमाने माझे मन भरून येते. रेकॉर्डिंगला जाण्यापूर्वीची त्यांची सकाळची देवपूजा आणि ती. माईंना नमस्कार करणे अद्यापही कधी चुकले नाही.

लताबाईंच्या व त्यांच्या भावंडांच्या सहवासात मी जे दिवस घालवले आहेत ते केवळ अमोल असे आहेत. त्यांचा सर्वांचा विश्वास होता आणि त्यांचे प्रेम होते म्हणूनच माझे जीवन उभे राहू शकले आहे. अशा कित्येक गोष्टी आहेत की ज्या केवळ त्यांच्यामुळेच मला लाभल्या आहेत. आत्मविश्वास म्हणजे काय असतो हे लताबाईंपासूनच शिकावे असे त्यांचे जीवन आहे.

अशा मंगेशकर कुटुंबातील मी एक आहे या भावनेने लोक माझ्याकडे पाहतात यामध्ये केवढे अलौकिक भाग्य सामावलेले आहे!





माधव शिंदे

कल्याणजी

# लता मंगेशकर-एक अद्भुतकथा

तो निर्माता अतिशय अस्वस्थ झाला होता. कारण त्या दिवशी लता मंगेशकर त्याचे एक गाणे ध्वनिमुद्रित करणार होत्या. पण त्यांची प्रकृति बरी नसल्यामुळे त्या गाण्याचे ध्वनिमुद्रण तात्पुरते लांबणीवर पडले होते.

पण निर्मातेमहाशय मोठे वस्ताद होते. आणि पैशाची त्यांना मुळीच फिकीर नव्हती. ते मला म्हणाले,

"लताबाईंना काय हवे तेवढे पैसे द्या ना! पण कसेही करून आज त्यांच्याकडूनच हे माझे गाणे रेकॉर्ड करून घ्या."

मी माझे हसू प्रयत्नपूर्वक आवरले. लताजींची प्रकृती बरी असल्याखेरीज आणि त्यांना मनापासून गाणे गावेसे वाटल्याखेरीज त्या कधीच गाणार नाहीत, जगातल्या केवढ्याही मोठ्या रकमेचे प्रलोभन त्यांना त्यांच्या इच्छेविरुद्ध गाणे गावयास लावू शकणार नाही हे सारे मी त्या निर्मात्याला समजावून सांगितले. आणि शेवटी मी त्याला म्हणालो,

"आता एकच पर्याय आहे. तो म्हणजे तुम्ही दुसरी कोणती तरी पार्श्वगायिका घेऊन तुमच्या गाण्याचे आज ध्वनिमुद्रण करून टाका."

माझ्या स्वरातला निश्चयीपणा त्या निर्मात्याला जाणवला असावा. कारण क्षणभर तो स्तब्ध राहिला. पण मग माझे बंधू आनंदजी यांच्याकडे वळून तो काकुळतीला येऊन म्हणाला,

"छे छे! दुसरी कोणतीही पार्श्वगायिका मला चालणारच नाही. मी म्हणतो, असेना का लताबाईंचा घसा सर्दीमुळे थोडासा बिघडलेला! मला चालेल तो. पण माझे गाणे त्यांनीच म्हटले पाहिजे. माझे रेकॉर्डिंग आज झालेच पाहिजे."

माझ्या आठवणीतला हा एक प्रसंग. लता मंगेशकर यांच्या कलेला आणि त्यांच्या वेळाला आज किती अफाट मागणी आहे याची या एका प्रसंगावरून साक्ष पटेल. लताजींचा एक संगीत दिग्दर्शक आणि त्यांचा एक स्नेही या नात्याने मी असे निश्चित सांगू शकतो की चित्रपटाची जास्तीत जास्त गाणी ध्वनिमुद्रित करता येतील तेवढी करण्यासाठी त्या आपल्याकडून प्रयत्नांची

पराकाष्ठा करीत असतात. पण त्या बरोबर मला हेही ठाऊक आहे की निव्वळ पैशासाठी त्या कधीही, कोणासाठीही गाणार नाहीत. कारण त्यांचे प्रेम पैशावर नाही. गाण्यावर आहे. जेव्हा त्या एखादे गाणे गातात तेव्हा त्या गाण्यात आपले कलासर्वस्व ओतावे ही त्यांची मनापासून इच्छा असते. आणि म्हणूनच लताजींनी माझे गाणे आज गायलेच पाहिजे असे कोणी म्हटलेलेही त्यांना आवडत नाही, की अशी कुणाची सक्ती त्या मानणारही नाहीत.

पण याचा अर्थ लताजी अहंकारी आहेत काय? त्यांच्या मुद्रेवरील गंभीरपणाच्या आवरणा खाली कधी कधी इतरांना जो गर्विष्ठपणाचा आभास होतो तो खरा आहे काय?

निदान मी तरी असे कधीच म्हणणार नाही. कारण मला माहीत असलेल्या लताजी वेगळ्या आहेत. त्या नम्र आहेत आणि भावनोत्कट आहेत.

एकदा त्यांनी माझ्याजवळ म्हटले होते,

"ते फार थोर गायक होते. त्यांच्या मालकीची असलेली एक अंगठी योगायोगाने मला मिळाली आहे. ती माझ्याजवळ असल्याखेरीज मी कधीही नव्या गाण्याचे रेकॉर्डिंग करीत नाही."

हे उद्गार त्यांनी कोणाबद्दल काढले होते बरे? त्या बोलत होत्या स्वर्गवासी के. एल. सैगल बद्दल. लताजींसारख्या स्वरसम्राज्ञीने त्या दिवंगत कलासम्राटाबद्दल व्यक्त केलेली ही भावना लताजींचा सैगलबद्दलचा आदर जसा व्यक्त करत तसाच त्यांचा विनयशील स्वभाव ती व्यक्त करीत नाही काय?

लताजींचा आवाज म्हणजे परिपूर्णतेने धारण केलेले साकार स्वरूप आहे. या लोकविलक्षण आवाजाने लता मंगेशकर ही एक चालती बोलती दंतकथा बनली आहे. आमच्या काळात ही दंतकथा प्रत्यक्ष वावरत आहे हे आपले केवढे भाग्य! या आवाजाने लताजींच्या भोवती एक वेगळी दुनिया निर्माण केली आहे. या विश्वात किती विविध प्रकारचे लोक आहेत. त्यात संगीत दिग्दर्शक आहेत. गायकवादक आहेत. राजकरणी लोक आहेत. कामगार आहेत. संसारी गृहिणी आहेत. आणि आमच्या तरुण मुलामुलींची तर एक सबंध पिढीच्या पिढी आहे. या स्वराने लताजींना अनेक थोर संगीतदिग्दर्शकांची एकमेव लाडकी गायिका बनवले आहे. आणि त्यानेच भारतीय चित्रपटसृष्टीतल्या पार्श्वगायनाच्या क्षेत्रात गेली पंचवीस वर्षे त्यांचे सर्वश्रेष्ठ सम्राज्ञीचे पद सातत्याने टिकून धरले आहे.

लताजींच्या विलक्षण सुरेल आवाजाइतकेच त्यांचे दुसरे मोठे वैशिष्ट्य म्हणजे त्यांची अष्टपैलू प्रतिमा. ही प्रतिमा सर्वगामी आहे. आणि या एका गुणामुळे करमणुकीच्या जगात लताजींना एक अगदी वेगळे, स्वतंत्र स्थान प्राप्त झाले आहे. त्या आतापर्यंत सहस्त्रावधी गाणी गाइल्या असतील. आणि तरीही त्यांच्या गाण्याची एकच एक अशी टराविक पद्धती म्हणून सांगता येणार नाही. तो ठोकळेबाज साचेबंदपणा त्यांच्या कलेला कधीही आला नाही शेकडो संगीतदिग्दर्शकांनी आतापर्यंत लताजींसाठी चाली बांधल्या. पण ती ती चाल लताजी अशा काही जिवंतपणाने गाऊन जातात की ते गाणे त्यांच्या तोंडून ऐकल्यावरच जणू संगीत दिग्दर्शकालाही आपण काय केले ते नव्याने उमगते. आपणच बांधलेल्या चालीच्या सौंदर्याचा त्याला सुखद साक्षात्कार घडतो.

लताजींचा श्रोतृवर्ग अफाट आहे. आणि त्या सर्वांना त्या पहिल्या दर्जाची पार्श्वगायिका म्हणूनच सतत भावत आहेत. त्यांनी गाइलेल्या असंख्य गाण्यातली कितीतरी गाणी लोकप्रियतेचा उच्चांक गाठून गेली आहेत. भारतातल्या बहुतेक सर्व प्रमुख भाषांतून लताजींनी गाणी गाइली आहेत. आणि त्या साऱ्या गाण्यांना त्यांच्या कलेच्या लोकविलक्षण जादूचा चैतन्यमय स्पर्श झालेला आहे. कोणत्याही संगीतदिग्दर्शकाने चाल दिलेले कोणतेही गाणे वाद्यमेळाच्या साथीने लताजी जेव्हा गातात तेव्हा त्या केवळ आपले गोड स्वर वापरीत असतात असे नव्हे. अर्थाचे सूक्ष्म बारकावे जाणणारे आपले भाषाज्ञान, आपले संवेदनाशील कविमन आणि आपला अभिनयाचा अचूक समज हेही सारे त्या

गाण्यात त्या पुरेपूर ओनतात. त्यामुळे त्यानी गाइलेले कोणतेही गाणे आपली सारी मानसपनता, सर्व अर्थवैभव परिपूर्णतेने प्रकट करीत असते.

चित्रपटसंगीत हे कोणत्याही अर्थाने सोपे किंवा एकजातीय नाही. भावनांचे आणि गयतेचे विविध आकार घेऊन ते प्रकट होते. चित्रपटातल्या गीतांची बहुविधता मन थक्क करून सोडणारा आहे हे चित्रपटसंगीत कथा, लोककथा, दंतकथा आणि विनोदी कथा निवेदन करते. कधी ते उपदेश करते. कधी अंगाईगीत गाऊन डोळ्यावर गोड पेंग आणते. कधी युद्धासाठी आवाहन देते कधी प्रेमिकांच्या मीलनाचा निर्भर आनंद व्यक्त करते तर कधी प्रेमभंगाच्या पिळवटलेल्या यातनांना सशब्द करते जन्मसोहळा, बारशाचा समारंभ, विवाहाचा उत्सवी भाव या साऱ्याची ग्वाही ते फिरवते व्यथितांना, रुग्णांना आणि वृद्ध जीवांना ते दिलासा देते. आणि हे जग कायमचे सोडून गेलेल्या साठी ते आक्रंदन करते!

असे हे चित्रपटसंगीत. अनेकसुरी, अनेकपदरी, अनेक भावनांचे सूक्ष्मातिसूक्ष्म पैलू दाखविणारे. या बहुविधतेत चित्रपटसंगीताचे मोठेपण साठवलेले आहे आणि यातच लता मंगेशकर या गायिकेचीही थोरवी सामावलेली आहे, कारण चित्रपटसंगीताची विविध भावपूर्णता जर कोणी पुरेपूर आमच्या प्रत्ययाला आणून दिली असेल तर ती याच एका पार्श्वगायिकेने. लताजी जे गाणे गातात त्यातला विशिष्ट भाव त्या परिपूर्णतेने साकार करतात ते गाणे जर कष्टाचे गीत असेल तर लताजी ते त्याच रांगड्या अवजड सशक्तपणाने गातात. ते गाणे तर विरोधाचा, प्रतिकाराचा सूर उठवणारे असेल तर लता जींच्या गाण्यातून कडव्या प्रतिकाराचा ध्वज जणू फडफडताना जाणवतो. जर ते गाणे निर्भर आनंदाचे असेल तर लताजींच्या गाण्यातून मिष्किल अवखळ हसू निनादत आहे असे वाटू लागते आणि ते गाणे जर शोकगीत असेल तर लताजी मूर्तिमंत शोकभावना बनतात आणि ते गाणे हुंदक्यांनी दाटून येते त्यातून अश्रू ठिबकू लागतात. लताजींच्या गाण्याची जर व्याख्या करायची असेल तर ती याच शब्दात करता येईल कोणतेही गाणे लताजी नुसत्या गात नाहीत. त्या त्या वेळेपुरत्या त्या स्वत च मूर्तिमंत ते गीत बनतात.

## मदनमोहन

# उंच आभाळ

लताजींना मी प्रथम पाहिले ते 'महल' मधील त्यांच्या खूप गाजलेल्या 'आयेगा आनेवाला' या गाण्याच्या तालमीच्या वेळी मी तेव्हा चित्रपटाच्या व्यवसायात अगदीच नवीन होतो त्या सुरावटीने भारावून मी मनात ठरवून टाकले, "आपण जेव्हा पहिला चित्रपट काढू तेव्हा पार्श्वगायिका म्हणून लताजींना गाणी म्हणायला बोलवायचे" आणि त्याप्रमाणे 'आंखे' या माझ्या संगीत दिग्दर्शनाखाली निघणाऱ्या पहिल्या चित्रपटासाठी मी त्यांनाच निमंत्रण केले पण त्यावेळी माझ्यासंबंधी लताजींना स्वत ला काहीच माहिती नव्हती आणि दुसऱ्या कोणीतरी माझ्यासंबंधी त्यांचा काही गैरसमजही करून दिला होता लताजींनी माझ्याकडे गाणी म्हणायला नकार दिला

मला अयत वाईट वाटले पण थांबता तर येणे शक्यच नव्हते इतर पार्श्वगायिकांच्या साह्याने मी गाणी ध्वनिमुद्रित करून टाकली सुदैवाने माझ्या त्या चित्रपटाचे संगीत चांगलेच लोकप्रिय झाले नंतर मी माझ्या 'मदहोश' या दुसऱ्या चित्रपटाचे संगीतदिग्दर्शन जेव्हा हाती घेतले तेव्हाही चिकाटीने मी पुन्हा लताजींनाच बोलावले या खेपेला त्यांनी तात्काळ होकार दिला वढेवर त्या ध्वनिमुद्रणासाठी उपस्थितही झाल्या रेकॉर्डिंगच्या वेळी त्यांनी मोकळेपणाने मला सांगून टाकले, "तुमच्याविषयी इतरांनी माझा गैरसमज करून दिल्यामुळे पहिल्या वेळेला मी तुमच्याकडे गाणी म्हणायला नकार दिला, मला आता त्याबद्दल खेद वाटतो तुमच्याविषयी माझे मन कलुषित करून देणाऱ्यावर मी विश्वास ठेवायला नको होता!"

लताजींच्या त्या उमद्या, दिलखुलास बोलण्याने मी चकित झालो तसाच त्यांचा दिलदारपणा पाहून आनंदलोही उभयतांच्या मनातले किल्मिष नाहीसे झाले माझ्या गाण्याचे रेकॉर्डिंगही उत्तम झाले त्यानंतर आजपर्यंत माझ्या पन्नासाहून अधिक चित्रपटातली दोन अडीचशेहून अधिक गाणी त्यांनी गाइली आहेत या निमित्ताने गेल्या सतरा वर्षांचा आमचा दृढ परिचय घडून आला आहे. इतकेच नव्हे तर उभयतामध्ये जिव्हाळ्याचे नातेही जडले आहे. मी त्यांचा 'मदनभय्या' आहे

ओमप्रकाश कहोल

# न पाहिलेली बहीण

'रेडिओ सिलोन' आणि 'आकाशवाणी' यांची गोष्टच सोडा, पण पाकिस्तान, काबूल, आझाद काश्मीर, इराण, बगदाद, ताश्कंद किंवा व्हॉइस ऑफ अमेरिका यांपैकी कोणतेही स्टेशन लावा, लताचा स्वर तुमच्या कानावर येईल. भाषा कळणारे आणि न कळणारे तिचे देशधर्मातीत असलेले असंख्य चाहते साऱ्या जगभर पसरलेले आहेत. खऱ्या अर्थाने ती 'विश्वमानव' आहे.

आजच्या जगातला 'लता' हा एक अद्भुत चमत्कारच आहे. या शतकात तीन जगज्जेते झाले आहेत असे मी मानतो. एक हिटलर, दुसरा आईन्स्टाईन आणि तिसरी लता मंगेशकर!

मी लताला अद्याप भेटलो नाही. तिला पाहिलेलेही नाही. पण माझी तिच्यासंबंधीची ही गौरवाची भावना माझ्या एका आदरणीय मित्राकडून मी तिला कळवली. नेहमीच वाट्याला येणाऱ्या स्तुतीपेक्षा माझी भावना काही वेगळी आहे हे ओळखून तिने सर्व संभाषण ऐकले. मी तिचा करीत असलेला गौरव तिला अतिशयोक्त वाटला आणि ती म्हणाली, माझ्याबद्दल सर्वांत अतिशयोक्तीने बोलण्याचा मान एका पाकिस्तानी मुत्सद्याने ह्यापूर्वीच मिळवलेला असल्याने या गृहस्थाच्या उद्गारांना मी दुसरा क्रमांक देईन!" तो पाकिस्तानी मुत्सद्दी म्हणे असे म्हणाला होता, "मला जर माझ्या मताप्रमाणे कृती करण्याची मुभा मिळाली तर काश्मीरच्या संबंध खोऱ्यावरचा भारताचा हक्क मी एकाच गोष्टीच्या बदल्यात मान्य करीन. लता पाकिस्तानला दिली गेली तर! आणि हा व्यवहार पाकिस्तानच्या दृष्टीने अतिशय फायद्याचाच झाला असे मला वाटेल"

एक कलावंत म्हणून मी लताचे आजपर्यंत गुणगान करीत होतो. पण आता मला कळले आहे की ती त्याहूनही अधिक काही आहे. लता खरी धर्मशील आणि खऱ्या अर्थाने हिंदू आहे हे अनेकांना माहीत नसेल. मी माझे आयुष्य हिंदूंच्या संघटनाची वाढ व्हावी या हेतूने वेचतो आहे. आणि इतका या क्षेत्रातील असूनही मला जे सुचले नव्हते असे कितीतरी हिंदुधर्मविषयक उत्तम विचार लताने मला कळवलेले आहेत. मला हे सांगताना फार अभिमान वाटतो. तिची पत्रे हा माझ्याजवळील एक अमोल ठेवा आहे आणि योग्य वेळी ती जेव्हा प्रकाशित केली जातील तेव्हा

ही कमलदलस्थित लक्ष्मी भोवतालच्या कोणत्या कर्दमात आपले शुचित्व टिकवून महान गौरव मिळवीत गेली आहे हे सर्वांना कळेल. हिंदुत्वाच्या अभिमानाचे लता म्हणजे एक मूर्त चित्र आहे.

माझ्या कुटुंबातील मंडळी लताची अतिशय भक्ती करतात. आमच्या अनेक घरगुती सभाषणात लता हा एक विषय असतो. स्वाक्षरी करून दिलेले तिचे एक छायाचित्र आमच्या रेडिओवर आहे. कामाच्या निमित्ताने सब मंडळी घरी येतात तेव्हा लताचा विषय निघतो आणि समकालीन कलावंता मधील तिचे मोठेपण सर्वजण निर्विवाद मान्य करतात.

रक्षाबंधनाचा पवित्र दिवस येतो तेव्हा 'भय्या मेरे राखीके बंधनको निभाना' या शब्दांनी सर्व वातावरण दुमदुमले आहे असे मला भासते. आम्ही दरवाजाकडे नजर लावून लताकडून येणाऱ्या राखीची वाट पाहात असतो.

लता ती पाठवायला कधीच विसरत नाही. आजपर्यंत लताने पाठविलेल्या सर्व राख्या मी एका कॅबिनेटमध्ये ठेवलेल्या आहेत. तिने माझ्यावर जो जिव्हाळ्याचा वर्षाव केला आहे त्याला मी निरंतर पात्र ठरावे एवढीच माझी ईश्वरापाशी प्रार्थना असते.

आम्ही लतावर खरोखरच प्रेम करतो.



ओमप्रकाश कोहोल

रायचंद बोराल

# मंत्रसिध्दा

सहा जानेवारी एकोणीसशे बावन ही तारीख मला अद्यापही चांगली आठवते. त्यादिवशी 'नीतिन बोस प्रॉडक्शन'चे प्रमुख सुलतान मझहरखान यांनी मुंबई येथील सेंट्रल स्टुडिओमध्ये प्रथम लताची आणि माझी भेट घडवून आणली. सकाळी नऊ वाजण्याचा सुमार असेल. तेव्हा ते लताला घेऊन माझ्याकडे आले आणि म्हणाले,

"ही पहा तुमची पार्श्वगायिका. आपल्या 'दर्दे दिल' चित्रपटासाठी ही गाणार आहे."

मी लताकडे पाहिले. एक अगदी साधीसुधी विनयशील मुलगी. तिच्या मुद्रेवर निर्मितिक्षम कलावंताचे काही चिन्ह दिसत न हते की डोळ्यामध्ये जिज्ञासेची तीव्र चमक, ती विलक्षण तहानही कोठे जाणवत नव्हती. आणि तरीही तिच्याबद्दल मी केवढे तरी ऐकले होते. भारतीय चित्रपटसृष्टीतल्या आपल्या कर्तृत्वाने तिने फार मोठे नाव मिळवले होते. कलेच्या क्षेत्रात आपले विलक्षण सामर्थ्य तिने प्रकट केले होते, लक्षावधी रुपये खर्चून निर्माण केले जाणारे प्रचंड चित्रपट आणि तिचे स्वत चे असंख्य चाहते या उभयतामध्ये वास्तववादी संबंध प्रस्थापित करण्यासही तिचेच प्रयत्न कारणीभूत झाले होते. या मुलीला चित्रपटाच्या भ्रामावमय सृष्टीत सहजासहजी प्रवेश मिळाला नव्हता. तेथील बंद दारावर तिला अनेकदा धक्का घेऊन तेथे स्वत चा प्रवेश करून घ्यावा लागला होता. पण एकदा तिथ तेथ प्रवेश मिळाल्यावर मात्र त्या व्यवसायाला तिची अधिकाधिक गरज भासू लागली होती. आणि आता तर तिच्या चाहत्यांनी 'सुराची सम्राज्ञी' म्हणून आपल्या हृदयात सर्वोच्च स्थानावर तिची प्रतिष्ठापना केली होती. अशी ही लता. पण तिचे हे कोणतेही गुणवैशिष्ट्य माझ्यासमोर झगझगीतपणे प्रकट झाले नव्हते. तसा काही आवही तिने आणल्याचे मला दिसले नाही. तथापि, एखाद्या व्यक्तीबद्दल प्रथमदर्शनी जी आपली प्रतिक्रिया होते ती पुढे खरी ठरतेच असे नाही. माणसाचे पहिले दर्शन कधी कधी फसवेही असते. मस्तुरीबाई आणि के. एल. सैगल ही कलावंत मंडळीही प्रथम मला इतकीच सामान्य, साधीसुधी भासली होती. माझ्या मनात आले, लता दिसते साधी. पण तिचे गाणे घेणे ही कदाचित अत्यंत अवघड आणि समस्या निर्माण करणारी घटना

एगा

असू शकेल—कुणी सांगावे. मी त्या मुलीच्या अंतर्गत कलागुणाचा शोध घेण्याचे ठरवले मला जणू ते एक आव्हानच वाटले.

आणि गाण्याची तालीम घेताना लताने माझ्यापुढे एक प्रश्नचिन्ह उभे केलेच. मला वाटली होती त्यापेक्षाही ही मुलगी सम्याळ आणि रहस्यमय निघाली! पहिल्याच दिवशी गाण्याची तालीम घ्यायची वेळी मी गाण्याच्या पहिल्या दोन ओळी तिला गाऊन दाखवल्या आणि तिला ते गाणे माझ्याबरोबर गायला सांगितले. गाण्याच्या प्रारंभीचे शब्द होते 'जादूगर भूल ना जाना'. लताला गायला सांगून मी अपेक्षापूर्ण नजरेने तिच्याकडे बघत राहिलो तो काय? मला फक्त तिचे ओठ हलताना दिसले. पण गाणे मुळीच ऐकायला आले नाही. मग मी माझे सहकारी अली हुसेन यांना त्या दोन ओळी म्हणायला सांगितल्या आणि स्वत लताच्या जवळ सरकून कान टवकारून बसलो तरी पुन्हा तेच. लताचा स्वर काही माझ्या कानावर पडला नाही.

मी काहीसा अस्वस्थ झालो. आणि लताला विचारू लागलो,

"तू मोठ्यान का गात नाहीस? तुझी प्रकृती बरी नाही काय?"

लता अगदी सावधपणाने म्हणाली,

"मी ठीक आहे दादा. आपण सांगितल ते सार मी लक्षपूर्वक ऐकल्य. गाण्याची चाल माझ्या बरोबर ध्यानात आलीय!"

"तर मग गा ना तू!" मी काहीसा चिडून म्हणालो, "मला ऐकू दे तरी कशी गातेस तू ते!"

तरी लता शांतच होती. पुन्हा तितक्याच सावधपणाने, नम्रतापूर्वक ती म्हणाली, "मी गायले आहे दादा आणि प्रत्यक्ष 'टेक'च्या वेळी सुद्धा मी याच सुरात गाते."

तिच्या या उत्तराने माझा पारा किती वर चढला असेल याची कल्पनाच करावी. पण मी स्वत चे मन ताब्यात ठेवले म्हटले, चिडून उपयोग नाही. या मुलीच्या कलानेच घ्यायला हवे शिवाय, पार्श्वगायनाच्या अनेक तऱ्हा असू शकतात. चित्रपटकलेत शेवटी महत्त्व असते ते दृश्याला. ते एक अत्यंत समर्थ आणि तेवढेच दूरगामी असे माध्यम आहे. आणि त्यात गायक, वादक, अभिनेते यांच्याबरोबर तनज्ञानाही सहकार्य करावेच लागते त्या साऱ्यांच्या सघनित प्रयत्नातूनच सरतेशेवटी या 'जिवंत कले'ची सारी प्रतिमासृष्टी आणि वैभव निर्माण होत असते या सर्व गोष्टी माझ्या मनात आल्यामुळेच मी स्वत ला आवर घातला आणि लतासारख्या संवेदनाशील कलाकाराशी जपून अन् काळजीपूर्वक वागावयाचे ठरवले. त्या दिवशीची तालीम अखेर संपली. मी मनातून असमाधानीच होतो. पण लताने मला आश्वासन दिले,

"आपण मुळीच चिंता करू नका दादा. मी तुमची चाल अगदी बिनचूक म्हणेन."

ती निघून गेली.

मी मात्र फार दुग्ध्यात पडलो होतो. काय करावे तेच मला कळेना. शेवटी मला साउंड एंजिनियर मुकुल बोस यांची आठवण झाली. त्यांनी आतापर्यंत लताची अनेक गाणी ध्वनिमुद्रित केली होती. मी त्यांना माझी अडचण समजावून सांगितली. पण त्यांनीही मला आश्वासन दिले की प्रत्यक्ष ध्वनिमुद्रण अगदी मला हवे होते तसेच होईल! ते मला म्हणाले,

"लता फार सराईत आर्टिस्ट आहे दादा. आपण 'साउंड ट्रॅक'वरून तिचे गाणे ऐका, म्हणजे आपल्याला कळेल ती किती बिनचूक गाते ते!"

मग मी लताचे गाणे 'साउंड ट्रॅक' वर ऐकले. आणि आश्चर्याचा सुखद धक्का मला बसला. लताने माझी चाल अगदी मला हवी होती तशी, सहीसही उचलली होती. मला तिच्या विलक्षण ग्रहणशक्तीचे फार कौतुक वाटले. मी दिलेल्या साऱ्या सूचना तिने आत्मसात केल्या होत्या. कोणत्याही तपशीलात अगदी रतिभरसुद्धा फरक पडला नव्हता. आणि मग या खट्याळ पोरीचा मला

सुधा करमरकर

# लतातार्ई

सात आठ वर्षांपूर्वी लता मंगेशकर हे नाव ऐकले की काही सुंदर भावपूर्ण स्वरलहरी माझ्या कानावरुन जात आणि त्या स्वराशी निगडित अशा काही अनुभूतींच्या आठवणी हृदयाला स्पर्शून जात. कोण्यवधी अंत करणांना मुग्ध करणारी ही पार्श्वगायिका प्रत्यक्षात कशी असेल असे कुतूहल मनात निर्माण होई. आज हेच नाव एकले की रेडिओवरून कानावर पडणाऱ्या स्वराच्या विरळ पडद्याआड एक आगळेच व्यक्तिमत्त्व दिसू लागते. माझ्या लतातार्ईचे. त्याच्या स्वराइतकेच विलोभनीय!

माझ्या आयुष्यात मला ज्या काही चांगल्या गोष्टी लाभल्या आहेत त्यापैकी एक विशेष गोष्ट म्हणजे लतातार्ईचा सहवास. केवळ लता मंगेशकर या स्वरसम्राज्ञीचा नव्हे तर लतातार्ई या व्यक्तीचा. त्यांच्या सहवासातल्या काही प्रसंगात तर ही बाई स्वरसम्राज्ञी म्हणून अधिक श्रेष्ठ की लतातार्ई म्हणून अधिक श्रेष्ठ असा मला संभ्रम पडलेला आहे—पण क्षणभरच. कारण माझ्या लतातार्ई त्या स्वरसम्राज्ञीवर केव्हाच मात करुन जातात.

आमची पहिली ओळख अजून आठवते. बालरंगभूमीला आर्थिक स्थैर्य आणण्याच्या उद्देशाने पुरुषोत्तम दारव्हेकराचे 'चंद्र नभीचा ढळला' हे नाटक सादर करण्याचे माझ्या मनाने घेतले. सच ठरला. इतरही जुळवाजुळव झाली. पण त्यातले 'चंद्र नभीचा ढळला' हे प्रमुख गीत कोणाकडून म्हणवून घ्यावे हे काही सुचत नव्हते. कारण त्या गाण्याला न्याय देईल अशी एकच गायिका होती पण तिचा विचार करणे हे त्या नाटकातल्या नायकाच्या चंद्रापर्यंत मनोरा बांधण्याच्या वेडाइतकेच वेडेपणाचे होते. तथापि योगायोग काही वेगळाच होता. माझी एक मैत्रीण नलिनी म्हात्रे तेव्हा अमेरिकेला गेली होती तिचा पत्ता विचारण्यासाठी मी तिच्या घरी गेले असता नाटकाच्या निर्मितीसंबंधी तिच्या वडिलांशी आणि भावाशी माझ्या गप्पा चालू होत्या. मुख्य गीत कोणी म्हणावे त्याबद्दल निश्चित ठरले नसल्याचे मी नारायणला (नलूच्या भावाला) सांगताच तो म्हणाला,—"दिदीच हे गाणं चांगलं म्हणू शकतील." मी विचारले —"दिदी कोण?" तेव्हा तो म्हणाला, "अहो लता मंगेशकर. त्यांना विचारू की आपण गाण्याबद्दल." नारायणचे हे उद्गार ऐकताच मी जरा

दचकलेच. कारण लताताईंची आणि नलूची खूप मैत्री असल्याचे आणि म्हात्रे कुटुंबाशी त्यांचा घरोबा असल्याचे मला माहीत होते. नलूकडे एकदा लताताईंची आणि माझी ओझरती भेट झाली होती. पण म्हणून काय झाले? लता मंगेशकर म्हणजे जागतिक कीर्तीची पार्श्वगायिका अगदी मोजक्याच चित्रपट निर्मात्याकरता गाणारी—तेही ते मोजत असलेल्या मोबदल्यासाठी नव्हे तर तिची मर्जी असेल तर. तेव्हा अशा या लता मंगेशकरला माझ्यासारख्या सामान्य बाईने आपल्या नाटकासाठी एक गाणे गाल का असे विचारण्याची कल्पनादेखील माझी मला धाडसाची वाटली. पण नारायणाचा आत्मविश्वास दांडगा. "त्यांना विचारायला काय जातं? फार तर नाही म्हणतील. आपण जाऊन पाहू." असे म्हणत त्याने लताताईंकडून भेटीची वेळ मागून घेतली.

दिनांक तीस जुलै एकोणिसशे एकसष्ठ रोजी लताताईंना भेटायला जायचे ठरले. त्या दिवशी पावसाने अगदी मनावर घेतल्यामुळे भरदुपारी देखील सगळीकडे अंधारले होते. जणू काही लताताईंकडून पुढे मिळणाऱ्या नकारासाठीच निसर्ग वातावरणनिर्मिती करीत होता. अशा त्या वातावरणात नारायण आणि मी दुपारी अडीच वाजता लताताईंकडे पोचलो. नोकराने आतल्या खोलीत त्यांना आम्ही आल्याचे कळवताच 'यांना, आत या" असा आतून गोड आवाज आला. मी खाली मान घालून घाबरत घाबरत आत प्रवेश केला. हळूच वर पाहाते तो माझ्याकडेच कुतूहलाने बघत हसत उभी असलेली एक साधी पोरसवदा बाई हातातल्या फणीने आपल्या धुतलेल्या लांबसडक केसांचा गुंता सोडवत उभी आहे. त्या सुंदर केशसंभाराकडे पहाता पहाता मी कशासाठी आले आहे याचा क्षणभर मला विसर पडला. तेवढ्यात "या सुधा करमरकर—" या नारायणच्या उद्गाराने मी भानावर आले आणि कसाबसा नमस्कार केला. "हो मी ओळखते ना यांना नलूने तुमच्याकडे झालेल्या सत्यनारायणाच्या पूजेच्या वेळेला यांची ओळख करून दिली की. मला चांगले आठवते " मनात जुन्या आठवणींचा पट उलगडला. नलूच्या घरी एकोणीसशे चौपन्न साली झालेल्या पूजेच्या वेळचा तो प्रसंग डोळ्यापुढे उभा राहिला. त्यावेळची ती ओझरती भेट त्यांच्या लक्षात राहिलेली पाहून मी अगदी अवाक होऊन त्यांच्याकडे पहातच राहिले

ज्याना ते गाणे ऐकायला मिळाले नाही ते श्रोते खरोखरच अभागी. ऐकणाऱ्याच्या काळजाला हात घालण्याचे सामर्थ्य लताबाईंच्या त्या गाण्यात आहे. अजूनही रात्रीच्या शांत वेळी कितीदा तरी आम्ही दोघे टेप लावून ते गाणे पुन्हा पुन्हा ऐकतो.

'चंद्र नभीचा ढळला' या गाण्याच्या रेकॉर्डिंगच्या वेळेस तर त्यांनी मला अगदी लाजवलेच. आम्हा सर्वांच्या आधी स्टुडिओत लताबाई हजर असल्याचे पाहून मी अगदी ओशाळले. माझ्याकडे कुणी मोठे वादक आणि संगीतदिग्दर्शक नव्हते. पण त्याबद्दल कुरकूर नाही की तक्रार नाही. नागपूरहून मुद्दाम आलेल्या गोपाळ कौशिकाकडून त्यांनी ते गाणे एकदा लक्षपूर्वक ऐकले आणि तिथे असलेल्या तुटपुंज्या वाद्यसनाला सांभाळून घेत एक रिहर्सल केली. आणि थोड्याच वेळात ते गाणे ध्वनिमुद्रित केले गेले. चांगली चाल दिल्याबद्दल कौशिकाचे कौतुक करून त्या माझ्याबरोबर निघाल्या. वाटेत घाबरतच मी त्यांना नाटकाच्या पहिल्या प्रयोगाचे निमंत्रण दिले. कारण त्या कुठल्याही नाट्यप्रयोगाना हजर रहात नाहीत असे मी एकले होते. पण लताबाई या नाटकाच्या पहिल्या प्रयोगाला उपस्थित राहिल्या. आपल्या भावंडासह आणि माईंसह आल्या. आणि गमत म्हणजे तिसऱ्या अंकाला मात्र आत विंगमध्ये येऊन बसल्या. कारण त्यांचे ध्वनिमुद्रित केलेले गाणे तिसऱ्या अंकाच्या शेवटी होते. कुणाला खरे वाटणार नाही पण स्वत:चेच गाणे प्रेक्षकात बसून ऐकण्याचा काही धीर झाला नाही बाईंना!

त्या गाण्यानंतर त्यांची माझी फक्त औपचारिक ओळख राहील असे वाटले होते मला. कारण कलाकार जेवढा मोठा तेवढे त्याच्याबद्दलचे गैरसमजही मोठे. ते कानावर असल्यामुळे फोनवर त्यांच्याशी औपचारिक संभाषण करण्यातच मी धन्यता मानत होते. पण त्यांना एकदा घरी जेवायला बोलवावे अशी इच्छा झाली. त्याप्रमाणे धीर करून मी त्यांना जेवणाचं निमंत्रण दिले आणि खरोखरच त्या जेवायला आल्या. त्यांच्या आवडीचे गोव्याच सारस्वती पद्धतीचे जेवण केले होते. सारे पदार्थ त्यांनी चवीनं आवडीने खाल्ले. मनमोकळेपणाने त्या माझ्या म्हाताऱ्या आजींशी बोलल्या आणि आमच्याशीही त्यांनी खूप गप्पा मारल्या. त्या दिवसापासून मी त्यांच्या प्रेमात पडले. खरेच प्रेमात पडले. माझे भाग्य म्हणजे या माझ्या प्रेमाच्या व्यक्तीला अगदी जवळून पाहण्याची, त्यांच्या सहवासात राहण्याची मला अनेकदा संधी मिळाली.

त्यांच्या सहवासात येऊन मला पाचसहा वर्षे झाली पण अजूनही वाटते लताबाई म्हणजे एक न सुटणारे कोडे आहे. एवढी मोठी कलाकार पण राहणी अगदी साधी पांढरे शुभ्र पातळ, कोपरापर्यंत बाह्यांचा पांढरा पोलका, दोन लांबलचक वेण्या, टसदशीत कुंकू, मोजकाच एखादा दागिना आणि अंगभर पदर—या साधेपणाला साजेसा चेहऱ्यावर सात्त्विक भाव आणि लोभस हास्य. स्वभाव तर इतका प्रेमळ आणि उदार की दुसऱ्यांना किती देऊ नि किती नको असे त्यांना होते. आणि हे देणेही औपचारिक भावनेने नसते तर त्या त्या माणसांची आवडनिवड जाणून घेऊन प्रत्येक वस्तू मोठ्या चोखंदळपणे आणि अभिरुचीने निवडून घेऊन दिलेली स्वत:च्या बाबतीत मात्र अगदी विरक्त. एकदा त्यांच्या एका वाढदिवसाला मी त्यांचे अभीष्टचिंतन करायला गेले होते अनेक उत्तमोत्तम मूल्यवान भेटी आणि सुंदर सुंदर साड्या मोठमोठ्या कलाकारांकडून त्यांना आल्या होत्या. त्या स्वत मात्र एक नवीन पण साधेसेच पातळ नेसून वावरत होत्या गमत म्हणजे त्या दिवशी त्यांनी मलाच दोन सुरेख साड्या आपली भेट म्हणून आग्रह करून घ्यायला लावल्या!

गेल्या पाचसहा वर्षात लताबाईंनी मला खूप काही दिले आहे. साड्या आणि वस्तूंबद्दल तर बोलायलाच नको, पण माझ्या संस्थेसाठीही मुद्दाम खटपट करून स्टीरिओफोनिक टेपरेकॉर्डरही त्यांनी मला मिळवून दिला. लिटल थिएटरच्या मुलांसाठी होणाऱ्या नाटकांना या हौसेने उपस्थित राहिल्या आणि लहान मुलासारख्याच निरागसपणे त्या त्यामध्ये रंगून गेल्या 'अल्लाउद्दीन'च्या पंचाहत्तराव्या

प्रयोगानंतर माझ्या कलाकारांच्या विनंतीला मान देऊन प्रकृती बरी नसताही चाळीस कलाकारांना आपल्या हस्ते स्मृतिचिन्हे देऊन अवर्णनीय असा आनंद दिला. माझ्या पत्नींना मानाने, अगदी भावाच्या नात्याने वागवले. आणि या साऱ्यांपेक्षाही मला त्यांनी दिला त्यांच्याजवळ जाण्याचा हक्क —जो फारच थोड्यांना मिळाला आहे.

लताबाईंना मी लहान पोरासारखे खोडकरपणा करताना पाहिले आहे तसेच एखाद्या जबाबदारीच्या प्रसंगी आजीबाईसारखा डोक्यावर काळजीचा भार घेऊन वावरतानाही पाहिले आहे. चिडलेल्या असताना सात्त्विक संतापाने तारस्वरात ताडताड बोलताना ऐकले आहे. पण त्या आवाजातला गोडवा इतका कायम की वाटावे एखादा जलद लयीतला दमदार तराणाच चालला. त्यांच्या हळव्या मनाला लागलेल्या एखाद्या गोष्टीसाठी डोके शिणवत बसलेलेही त्यांना पाहिले आहे. त्यांच्या विविध गाण्याप्रमाणेच ही वेगवेगळी रूपेही त्यांचा ठसा मनावर उमटवून गेली आहेत.

त्यांच्याजवळ गेले असता त्यांची जीवनाबद्दलची विरक्ती, दुसऱ्यांसाठी सतत कष्ट उपसण्याची वृत्ती, स्वतःबद्दलची बेफिकिरी हे सारे पाहून वाटते की त्यांना कुणीतरी जपले पाहिजे. पण त्या हट्टी आहेत. या बाबतीत कुणाचेच त्या ऐकणार नाहीत. गेली पंचवीस वर्षे असेच चालले आहे आणि आश्चर्य म्हणजे तरीही त्यांचे गाणे दिवसेंदिवस अधिकाधिक सुंदर होत चालले आहे. मला तर वाटते त्यांच्या पाठीशी एखादी दैवी शक्ती नक्की असली पाहिजे.

या दैवी शक्तीला प्रार्थना एवढीच की तू अशीच सदैव त्यांच्या पाठीशी राहा. त्यांच्या गळ्याइतकीच त्यांच्या प्रकृतीची जपणूक कर आणि कोट्यवधी लोकांच्या जीवनात आपल्या गाण्याने आनंद फुलवणाऱ्या माझ्या लताताईंना त्यांच्या जीवनात काही क्षण तरी आनंदाचे, मनःशांतीचे आणि सौख्याचे लाभू देत. वाटल्यास माझ्या वाट्याचे काही सुखाचे क्षण त्यांना दे पण त्यांना सुखी झालेले, खूप आनंदात राहिलेले मला पहायला मिळू दे.



जयकिशन

# काही क्षण

"जयभय्या, तुम्ही चित्रपटात काम का नाही करीत? हीरो म्हणून चांगले शोभून दिसाल—" लताजी एकदा गमतीने मला म्हणाल्या.

"हं, आता तेवढंच बाकी राहिलेलं आहे. हा संगीत दिग्दर्शनाचा धंदा चालेनासा झाला म्हणजे मग तो नट बनण्याचा धंदा सुरू करतो" मीही तितक्याच मिष्किलपणाने उद्गारलो आणि आम्ही दोघंही मनमोकळेपणाने हसलो. लताजी हसू लागल्या की अगदी खळखळून हसतात.

पण त्यांच्या या उद्गारांनी माझ्या जुन्या स्मृती चाळवल्या गेल्या. त्यांची आणि माझी पहिली भेट झाली तो प्रसंग आठवला "आठवतं तुम्हाला ते 'रानचे बरू' प्रकरण?" एवढे म्हणण्याचा अवकाश, आम्ही पुन्हा हसलो अठ्ठेचाळीस साल असावे ते. भारतीय चित्रपटसृष्टीत तेव्हा कोणीच नसलेले आम्ही महत्त्वाकांक्षा मात्र उरात बाळगून होतो. राज कपूर देखील त्यावेळी नुकतेच नावारूपाला येऊ लागले होते त्यांचा 'आग' हा चित्रपट प्रकाशित झाला होता, आणि काहीतरी वेगळे, भव्य करण्याची त्यांची झेप होती. रामानंद सागर यांच्या एका प्रणयकथेचे कथानक त्यांनी निश्चित केले होते. मग संगीत देण्यासाठी शंकर आणि मी यांना पाचारण करण्यात आले. राजसारख्या गुणग्राहक, स्नेहाळ, कल्पक निर्मात्याने आपल्याला बोलवावे आणि काही नवे द्या असे आवाहन करावे यानेच आमचे बाहू स्फुरण पावले! चांगली कंबर कसून, नव्या मिळालेल्या संधीचा चांगला उपयोग करून घ्यावा म्हणून आम्ही कामाला लागलो. चित्रपटसृष्टीत नेहमी ऐकू येणाऱ्या आवाजापेक्षा क्वचितच ऐकू येणाऱ्या एका आवाजाने त्यावेळी आम्हाला कमालीचे आकृष्ट केले होते. तो आवाज होता अत्यंत मुलायम, नाजूक, अतिशय सुरेल, भरपूर 'रेंज' असलेला, आणि मार्दवानी ओथंबलेला. लताजींचा आवाज! 'आये गा आनेवाला' या गीताने मी स्वतःच भारावून गेलो होतो आमच्या या पहिल्यावहिल्या संगीतकृतीला हा नवा आणि वेगळ्या घाटणीचा आवाज मिळेल तर आमच्यासारखे भाग्यवान आम्हीच ठरणार होतो! राज कपूर यांची या वेळेपर्यंत लतादीदींशी प्रत्यक्ष ओळख नव्हती. त्यांनी पण त्यांचा स्वर ऐकलेला होता आणि त्या गोड आवाज

वर तेही बेहद खूप होते. त्यांनी तावडतोब महालक्ष्मीच्या 'फेमस' मधील आपल्या ऑफिसात त्यांना तालमीसाठी बोलावण्याचे फर्मान सोडले. लताजी त्यावेळी नाना चौकातील शंकराच्या मंदिराजवळ राहात होत्या. मी दुसऱ्या दिवशी राज कपूर यांच्या नावाची चुणूक ओळखीसाठी घेऊन लताजींच्या घरात शिरलो त्यांना तालमीसाठी बोलावले आहे असा निरोप कळवला. पहिल्या भेटीत त्या मला विलक्षण तेजस्वी आणि तितक्याच मृदू वाटल्या. दुसऱ्या दिवशी ठरलेल्या वेळेला त्या 'आर. के.' च्या कचेरीत आल्या. पुढ्यात पेटी घेऊन मी बसलो होतो ते पाहून त्यांना जरा आश्चर्यच वाटले. "आपण संगीतदिग्दर्शक आहात तर? काल मला वाटलं आपण राजकपूर यांचे धाकटे बंधू असाल!" त्यांचे हे मनमोकळे उद्गार ऐकून सगळी मंडळी खळखळून हसली मग तालमींना उत्साहाने प्रारंभ झाला. मिनू कात्रक यांनी 'बरसात'मधील 'जिया बेकरार है' हे पहिले गाणे ध्वनिमुद्रित केले आणि आम्हाला आमच्या यशाची खात्रीच पटली. जो येईल तो आमचे कौतुक करू लागला. आम्हालाही लताजींशिवाय दुसरा कोणताच आवाज गोड लागेना. म्हणून मग नर्गिस आणि निम्मी या दोघींसाठीही आम्ही त्यांनाच गायला लावले.

'बरसात'च्या ध्वनिमुद्रिका आणि चित्रपट प्रकाशित होताच सर्वत्र लता मंगेशकर हे नाव ऐकू येऊ लागले. शंकर जयकिशन या नावालाही व्यक्तित्व प्राप्त झाले. आणि त्या चित्रपटापासून लताजींची आणि आमची जी जोडी जमली ती गेली वीस वर्षे कायम आहे. मतभेदाचे धुके कधी कधी निर्माण झाले, कधी गैरसमजुतीने काही काळपर्यंत आमच्यामध्ये अंतरायही निर्माण झाला पण लताजींच्या समंजसपणामुळे आणि खेळकर वृत्तीने तो फार काळ टिकू शकला नाही. प्रारंभी त्यांच्याशिवाय दुसऱ्या कोणाचाच आवाज आम्हाला गोड लागत नसल्याने आम्ही आमच्या चित्रपटातील सर्वच स्त्रीगीते त्यांना म्हणायला लावत असू. अशा वेळी संगीतकाराप्रमाणे गायकाचीही कसोटी लागते वेगवेगळ्या आवाजात गाण्याची लताबाईंची कला केवळ असामान्य आहे. तयार गायकी आणि नाना ढंग निर्माण करण्यात वाकबगार असलेला गळा त्यांच्याजवळ असल्याने आम्ही त्यांचा अनेक प्रकारे उपयोग करून घेतला. लताजींच्या असामान्य कुवतीवर मनापासून विश्वास ठेवूनच आम्ही अनेक प्रयोग करीत गेलो प्रत्येक चित्रपटात एखादे दुसरे तरी शास्त्रीय ढंगाचे गीत आम्ही त्यांच्याच जिवावर घालत होतो. त्यांच्या आवाजाचे आणि आमच्या सुरावटींचे गणित एवढे अचूक बसून गेले आहे की एखादे गाणे लताजींसाठी तयार केल्यानंतर अनेकदा ते दुसऱ्याकडून गावून घेणे अशक्य होऊन बसते बांधलेल्या चालीत दुसरा आवाज बसवताना क्लेशच होतात! हे माहीत होते म्हणूनच आजारात सुद्धा लताजी आमच्यासाठी गात राहिल्या आहेत गीतकाराचे शब्द आणि संगीतकाराचे सूर यांना न्याय द्यावा लताजींनीच! त्या पाठी असलेले श्रम, त्यांची कलापूर्ण मनोवृत्ती आणि सर्वस्व ओतून गाण्याचा त्यांचा स्वभाव हे सारेच एकत्र येते तेव्हा वाटते की गळ्याने गाणारे गायक अनेक असतील. आत्मा ओतून गाणाऱ्या फक्त लताजीच आहेत!

संगीतकाराच्या श्रमाचे सोने करणे किंवा माती करणे हे सर्वस्वी गायकावर अवलंबून असते. प्रत्येक स्वराला त्याने दिलेले चैतन्य त्याला स्वतःला कळते पण दाखवता येत नाही. आपले 'कॉम्पोझिशन' दुसऱ्याच्या गळ्यातून उमटवून घेणे ही किती अवघड गोष्ट आहे हे लताजींसारख्या गायिका भेटल्या म्हणून कळतच नाही! त्या आमच्या रचनेचे मोल वाढवतात आणि आश्चर्याचा गोड धक्का आम्ही अनुभवतो.

लताजींच्या आवाजाबद्दल खूप सांगता येण्यासारखे आहे आणि काही सांगता येण्यासारखे नाही भरपूर फिरत असलेला, 'रंज' असलेला, इतका लवचिक, मुलायम, मधुर आवाज चित्रपटसृष्टीत पूर्वी क्वचितच झाला असेल. स्वरसम्राट सैगलसारखेच त्यांचे स्थान अढळ आहे. सैगल जसे एकच, तसा लताजीही एकच दुसरी 'लता' होणे म्हणजे असंभव त्यांनी नुसती मेहनती वृत्ती

लता

पाहिली तरी अजोड वाटते. संगीतकाराचे पूर्ण समाधान होईपर्यंत त्या गात राहतात. कंटाळा, थकवा त्यांना माहीतच नाही. 'आसरा'मध्ये एक भव्य नाविन्यपूर्ण स्वप्नदृश्य टाकण्याचा निर्णय जेव्हा राज कपूर यांनी घेतला तेव्हा आम्ही 'आया मेरा परदेसी' हे गीत त्या दृश्यासाठी तयार करून घेतले. या गीताचे रेकॉर्डिंग सकाळी दहाला सुरू झाले ते पहाटेचे चार वाजले तरी चालूच होते! लताजी इतका सारा वेळ आमच्याबरोबर गात होत्या, धडपडत होत्या. त्यांच्या जबर दमाने त्या दिवशी आम्ही चकित झालो. 'पूनम' चित्रपटातील गीतांच्या वेळी 'हिज मास्टर्स व्हॉईस'मध्ये त्यांची एकतीन गाणी प्रथम ध्वनिमुद्रित झाली आणि तिसरे 'ओ भूले बालमा' हे करुणरसपूर्ण गाणे सुरू झाले. त्यांनी विलक्षण थकल्या होत्या. त्यात त्यांना त्या कारुण्याचा ताण असह्य होत होता. पण तरीही त्या गात होत्या. गाणे कसेबसे आटोपले मात्र, आणि त्या तेथेच कोसळल्या. बेशुद्ध झाल्या. घाबरून सर्वांची नुसती धावपळ उडाली!

लताजींच्या आवाजाच्या प्रभावाची एक हृद्य आठवण सांगून मी माझा हा लेख संपवतो. मरहूम मेहेबूबसाहेब यांना लताजींचे 'अनाडी' मधील 'रसिक बलमा' हे गीत विलक्षण आवडत असे. औषधोपचारासाठी ते लंडनच्या एका इस्पितळात असताना त्यांना त्या गीताचे स्मरण झाले. ते गाणे ऐकावेसे वाटले. तेव्हा लताजींनी मुंबईहून फोनवरून त्यांना ते गाणे म्हणून दाखविले! मेहेबूबसाहेब त्या गाण्याने आणि ते गाणाऱ्या स्त्रीच्या अलौकिक व्यक्तिमत्वाने केवळ तृप्त झाले.

वीस वर्षांच्या या परिचयातील आणखीही सूप्र आठवणी मला सांगता येतील अनेकदा एक मेकांच्या सुखदुःखात आम्ही सहभागी झालो आहेत. अत्यंत परोपकारी वृत्तीच्या, सहकाऱ्यांवर प्रेम करणाऱ्या, त्यांचा रास्त अभिमान बाळगणाऱ्या, निरागस, कोमल मनाच्या अशा त्या कलावती आहेत. त्या तशा कधी कधी चिडक्या आणि हट्टीही आहेत पण तो चिडकेपणा व हट्टीपणा म्हणजे काही त्यांचा स्थायीभाव नाही. ती लहर येते तशीच लवकर जातेही. त्यांनी दिलेली वेळ पाळली नाही की निर्माते दिग्दर्शक नाराज होऊन तक्रारी करू लागतात. पण लताजीही अखेर एक 'माणूस' आहेत हे लक्षात ठेवायला हवे.



जयकिशन

ध्येयासाठी झगडत राहतात तसेच लताजींच्या आणि माझ्या आयुष्याचेही आहे. चित्रपटविश्वात स्वतःचे वैशिष्ट्यपूर्ण स्थान असावे म्हणून सारे आयुष्य आम्ही दोघेही झगडलो आहोत. लताजी आपल्या कर्तृत्वाच्या अत्युच्च शिखरावर आहेत तर मी अगदी थोडीशीच कमाई केलेली आहे— पण ही धडपड हाच आम्हा दोघांना जोडणारा दुवा आहे.

आमच्यामधील जिव्हाळ्यामुळे 'रक्षाबंधना'च्या दिवसाला आमच्या आयुष्यात एक अगदी वेगळेच स्थान आहे. व्यावसायिक नात्यापलिकडचे व्यक्तिजीवनातील स्नेहसंबंधाचे स्वरूप आता दृढ झालेले आहे.

लताजींच्या आवाजातही एक घरगुतीपणाची ऊब आहे. त्या आवाजाने मनात अनेक स्मृती जाग्या होतात, आत्मशोध सुरू होतो, जिव्हाळ्याची ओढ वाटू लागते. असा ऐकणाऱ्या व्यक्तीच्या अंतरंगाचा त्या अगदी ठाव घेतात. ते गाणे म्हणजे रसिकाशी हितगुजच असते. माझ्या दृष्टीने हेच लताजींच्या गाण्याचे सर्वश्रेष्ठ वैशिष्ट्य आहे. त्यामुळेच ही गायिका श्रोत्यांना अगदी जवळची, घरातीलच वाटत आलेली आहे.

एक व्यक्ती म्हणून लताजी स्नेहशील आहेत, माणसाच्या लोभी आहेत, आपल्या रसिकांचीही कदर करणाऱ्या आहेत. त्यांच्या सहवासात अखंड प्रसन्नता आहे. माणसांचे चेहरे आणि नावे त्या फार पक्कन ध्यानात ठेवतात. विद्यार्थिनीची नम्रता त्यांच्या ठिकाणी आहे. शांततेच्या त्या नितांत चाहत्या आहेत. एखाद्या कार्याला आपला हातभार लावण्यासाठी त्या नेहमीच तयार असतात.

त्यांच्यासारख्या शुद्ध प्रवृत्तीच्या, कलासंपन्न आणि तरीही अतिशय साध्या व्यक्ती खरोखरच दुर्मिळ आहेत.



रामूभय्या दाते

# जिव्हाळा

कलाकार आणि त्याचा रसिक असे दोघे मिळूनच कला सिद्ध होत असते. ते दोन्ही परस्पराचे पूरक आणि अविभाज्य असे घटक आहेत. रसिक जर गायनाने 'वेडा' झाला नाही तर गायकाच्या गायनाला तरी महत्त्व कोठून प्राप्त होणार? एखाद्या थोर कलावंताच्या गाण्याने आम्ही भारावून जाऊन वेडे बनतो हेच त्याच्या जागतिक आकर्षणाचे रहस्य असते. आमचे 'वेड' त्याचा मोठेपणा सिद्ध करते. आपल्या अलौकिक स्वरपंक्तींनी तो जेव्हा आम्हाला रडवतो तेव्हा ते 'अश्रू' मात्र आमचे असतात. हेच रसिकाचे मोठेपण. तेच त्याचे भाग्य.

लताताईंना मी त्यांच्या बाळपणापासून ओळखतो. त्या आमच्या इंदूरच्या. त्यांच्या वडलांपासून इंदूरकरांचा आणि मंगेशकर मंडळींचा हा प्रेमाचा ऋणानुबंध जडलेला आहे. कुमार गंधर्वांचा एक अनन्य भक्त व चाहता म्हणून माझी जी 'शोहरत' झाली त्यामुळेच पुढील काळात आमचा व लताताईंचा अधिक जिव्हाळ्याचा स्नेह जडला. कुमार स्वतः लताताईंचे फार मोठे रसिक चाहते आहेत. हे दोघेही कलाकार एकदा माझ्याकडे जेवायला आले होते. कुमार त्यावेळी आजारीपणामुळे गात नसत. लताताई कुमारांना इतक्या मानतात की त्या दिवशी विनयाने त्याही गायल्या नाहीत.

लहान मुलांना पंडित नेहरूंचे जसे विलक्षण आकर्षण वाटते तसेच, किंबहुना थोडे अधिकच, प्रेम व जिव्हाळा त्यांना लताताईंविषयी वाटतो. उलट, लताताईंनाही लहान मुलांचे फार वेड आहे. माझा मुलगा रवी (तबला उस्ताद) हा अगदी लहान असताना त्याचे डोळ्याचे एक छोटेसे ऑपरेशन होणार होते. त्यावेळी रवीने आम्हाला अट घातली की लताताई चौकशीला येणार असतील तरच मी ऑपरेशन करून घेईन. आम्ही अट मान्य केली तेव्हा तोही आपल्या शब्दाला जागला. ऑपरेशन नंतर शुद्धीवर आल्यावर त्याने पहिला प्रश्न विचारला,

"ताई आली का?"

ताई आली होती. फुले आणि चॉकलेट घेऊन ती रवीच्या उशाशी हजर होती. मुलांचे असे अगत्य लताताईंना सतत वाटत आले आहे.

लताताईंनी एकदा आपल्या घरी मला शास्त्रीय संगीताच्या काही 'टेप्स' ऐकवल्या. ते संगीत त्यांनी स्वतः गायलेले होते. त्या 'टेप्स' ऐकून मी विस्मयचकित झालो. असे असामान्य कसब त्यात प्रकट झाले होते. माझ्या मनात आले, "लताताई 'शास्त्रीय' गान गात नाहीत हे शास्त्रीय गवयांवर त्यांचे परोपरीचे उपकारच आहेत. एरव्ही, त्या क्षेत्रातही त्यांनी आपला असा अधिकार प्रस्थापित केला असता की इतरांना त्यांची बरोबरी करणे जड गेले असते."

लताताईंनी आपली पहिली गाडी विकत घेतली त्यावेळी मी मुंबईला होतो. त्या मला म्हणाल्या,

"दातेसाहेब, या गाडीचे उद्घाटन तुम्हीच करा. तुम्ही इंदूरला गाडी घेऊन जा!"

मी इंदूरला काही गेलो नाही. पण शीवपर्यंत जाऊन परत आलो. गाडी बघताच माझ्या बहिणीची मुले 'लताची गाडी' 'लताची गाडी' म्हणून टाळ्या पिटीत ओरडत सुटली. गाडीचे उद्घाटनही त्यांनीच केले.

'भारतरत्न' ही सर्वांत मोठी राष्ट्रीय पदवी. राजकारण, शिक्षण, ज्ञानविज्ञान या क्षेत्रांतल्या थोरांना जर ती पदवी दिली जाते तर सांस्कृतिक क्षेत्रातील संगीताच्या दालनात अमोल कामगिरी बजावणाऱ्या प्रतिभावंतांना ती का दिली जाऊ नये? लताताई तर खरोखरी 'जगद्रत्न' आहेत. या 'जगद्रत्ना'ला निदान 'भारतरत्न' देखील न म्हणण्याइतकी कंजूषी आम्ही का दाखवावी बरे?



सलिल चौधरी

# स्वरमनस्क

ठराविक चाकोरीतून फिरणारे दैनंदिन जीवन जगताना एखादा कलावंत जसा दिसतो त्यापेक्षा आपल्या कलेचा प्रत्यक्ष आविष्कार करताना तो वेगळाच दिसतो—नव्हे तो अगदी वेगळा बनतो, त्याच्यामध्ये काही तरी विलक्षण पालट पडतो असे मला सतत जाणवत आले आहे. कलाविष्काराच्या क्षणी हा कलावंत इतका वेगळा बनतो की आपण चकित होऊन स्वतःलाच विचारू लागतो,

"अरे आपण ज्याला रोज पाहतो, ज्याला आपण अगदी जवळून ओळखतो, तो हाच काय!"

माझ्या सुदैवाने मला जागतिक कीर्तीच्या काही फार थोर कलावंतांना जवळून बघण्याची संधी मिळाली आहे. तसेच प्रत्यक्ष कलानिर्मितीच्या वेळीही मी त्यांना पाहिले आहे. 'पुडोवकिन' या दिग्दर्शकाला चित्रपटदिग्दर्शन करताना मी पाहिले आहे. 'चेर्काशॉव्ह' या अभिनेत्याला रंगभूमीवर अभिनय करताना मी पाहिले आहे. 'व्हाचारयान' या संगीतकाराला वाद्यमेळाचे संचलन करताना मी पाहिले आहे. अलि अकबर खाँ यांना सरोद वाजवताना आणि रविशंकर यांना सतार वाजवतानाही मी पाहिले आहे. मी पाहिलेल्या श्रेष्ठ कलाकारांपैकी हे फक्त काही जण होत. या सर्वांशी प्रत्यक्ष परिचय होण्याचे भाग्यही मला लाभले आहे. आणि एरव्हीच्या जीवनातला कलाकार नि कलानिर्मितीच्या वेळचा कलाकार या दोन अगदी वेगळ्या व्यक्ती असतात या माझ्या सिद्धांताला प्रत्येक वेळी बळकटीच येत गेली आहे. तथापि, या देशातल्या लक्षावधी जनतेची लाडकी गायिका आणि भारताची स्वरकोकिळा लता मंगेशकर हिच्या बाबतीत या सिद्धांताचा मला जेवढ्या तीव्रतेने प्रत्यय आला तेवढा पूर्वी तो क्वचितच कधी आला असेल!

दैनंदिन जीवनात अत्यंत साधी, निगर्वी असलेली अशी ही मुलगी. बांधा काहीसा कृश आणि ओठांवर एक मिश्किल हसू सतत खेळत असलेले. पण हीच मुलगी जेव्हा गाणे म्हणण्यासाठी मायक्रोफोनसमोर उभी राहते तेव्हा तिच्यात केवढे विलक्षण परिवर्तन घडून येते. तिच्याकडे बघताना भास होतो की तिची उंची अकस्मात खूप वाढली आहे, तिचे मस्तक आकाशालाही भेदून वर गेले आहे. तिच्या चमकदार डोळ्यांचे दोन पक्षी बनले आहेत आणि ते

पक्षी ढगातून भराऱ्या मारीत चालले आहेत. बघता बघता लता अशी प्रचंड आणि सर्वव्यापी बनते की आपण तिच्यापुढे अगदी उपेक्षणीय, केवळ अणुमात्र होतो आणि समोरच्या त्या गाणाऱ्या महान व्यक्तित्वाच्या पायावर डोके टेकावेसे वाटते. खरोखर सांगतो, गाणाऱ्या लताकडे बघताना कितीदा तरी हा अनुभव मला स्वतःला आला आहे!

लताच्या बाबतीत मला नेहमी असे वाटते की गाणे हे श्वासोच्छ्वासापेक्षाही तिला अधिक सहज आणि स्वाभाविक होऊन बसले आहे. आणि यातच कलाकार म्हणून तिचे मोठेपण सामावले आहे. कोणी म्हणतात, लताचे वैशिष्ट्य म्हणजे तिचा सोनेरी स्वर कोणी म्हणतात तिचे वैशिष्ट्य म्हणजे तिचे भावपूर्ण उच्चार. पण मला वाटते हे सत्य असले तरी संपूर्ण सत्य नव्हे. कोणतेही गाणे गाताना लता त्याच्याशी आपला आत्मा मिसळून ते गाते. गाण्याशी तिचे होणारे हे सायुज्य हेच तिच्या श्रेष्ठतेचे मुख्य लक्षण होय. प्रत्येक सुराचे आकलन करणारी तीव्र संवेदनाशीलता, संगीतातील नाट्याचा अचूक समज, स्वराचे आघात, हेलकावे, स्वर कोठे लांबवावा व कोठे कमी करावा या सर्व गोष्टींचे तारतम्य—यातले काहीही शिकवून येत नाही. शिकवून समजाविल्या जाणाऱ्या या गोष्टी नव्हेतच. लताला हे सारे जन्मजात लाभले आहे हे सर्व ज्ञान घेऊनच जणू ती या जगात आली आहे. संगीताच्या क्षेत्रात लता ही खरोखर एक अद्भुत घटना आहे. मूर्त चमत्कार आहे. संगीतदिग्दर्शक या नात्याने तिच्याबरोबर काम करताना मला हे पुन्हा पुन्हा जाणवलेले आहे. नवी चाल समजावून देत असता ती ज्या तन्मयतेने ती ऐकते, चालीतला अगदी सूक्ष्म बारकावादेखील ती ज्या अचूकपणे हेरते, आणि कोणत्याही भाषेतले गाणे ती ज्या निर्दोष शब्दोच्चारासह पुन्हा म्हणून दाखवते त्यामुळेच ती एक अव्वल दर्जाची कलावती झाली आहे. मी तर निःसंशय असे म्हणू शकतो की या जगात जे काही अत्यंत श्रेष्ठ दर्जाचे कलावंत झाले आहेत, त्यांपैकी लता ही एक होय लताच्या वरील गुणांचा निर्देश करताना एक गोष्ट सहज आठवली ती जाता जाता सांगावीशी वाटते. 'दो बिघा जमीन' या चित्रपटाच्या प्रारंभी श्रेयनामावलीच्या जोडीला जे पार्श्वसंगीत मी दिले होते ते केवळ एकदा ऐकून नंतर ते तिने जसेच्या तसे बिनचूक मला म्हणून दाखवले होते!

लताची आणि माझी ओळख चौदा वर्षांपूर्वी झाली. मी त्यावेळी 'दो बिघा जमीन' या चित्रपटाची पटकथा लिहिण्यासाठी आणि त्या चित्राचे संगीत देण्यासाठी प्रथमच मुंबईत आलो होतो. माझा आणि लताचाही एक जिव्हाळ्याचा स्नेही दिवंगत कवि शैलेंद्र याने लताची व माझी ओळख करून दिली. आमच्या त्या पहिल्या भेटीची स्मृती मी आमरण हृदयात जतन करून ठेवीन त्यापूर्वी लताबद्दल मी खूप ऐकले होते. 'आयेगा आनेवाला' हे तिचे गीत मला खूप आवडले होते वर्षानुवर्षे ते माझ्या कानात गुंजत होते. अशी ती लता त्या दिवशी मी प्रत्यक्षात प्रथमच पाहात होतो. तिला बघताच मला आश्चर्याचा धक्का बसला. तिचा आत्यंतिक साधेपणा मला अगदी अनपेक्षित होता. तिचे सारे व्यक्तिमत्त्व निगर्वी, ऋजू होते. तिच्या भेटीनंतर काही मिनिटांच्या अवधीतच आमची उभयताची गट्टी जमली. अंधेरी येथे हृषिकेश मुखर्जी यांच्या घरी आमची ती पहिली भेट घडून आली. माझ्या काही बंगाली संगीतरचनांसंबंधी शैलेन्द्रने लताजवळ बरेच स्तुतिपर बोलून ठेवले होते. त्यामुळे ओळख झाल्या बरोबर लताने ती गाणी माझ्या तोंडून ऐकण्याची इच्छा प्रकट केली. आधुनिक बंगाली संगीतरचनेच्या क्षेत्रात त्यावेळी मी काही नवे प्रयोग करू इच्छीत होतो. माझा एक सिद्धांत होता. तो असा की बोलणे आणि गाणे या दोन्ही गोष्टी मूलतः एकमेकांपासून फारशा वेगळ्या नाहीत. बोलण्यातून जे जे काही सांगता येते ते ते सारे, नितक्याच स्पष्टपणे, परिणामकारकपणे संगीतातून प्रकट करता आले पाहिजे. बोलण्यात जो ओबडधोबडपणा असतो, जी ग्राम्यता क्वचित जाणवते, ती संगीतातही असते. असणे अपरिहार्य असते. एखाद्या भावनोत्कट आणि प्रामाणिक भाषणातून जी तीव्रता, आनंद, गांभीर्य

गायिका म्हणून लताचे मोठेपण शब्दामधून वर्णन करणे व्यर्थ आहे. टागोरांच्या कवितांची चिकित्सा करण्यासारखेच ते वेडेपणाचे होईल. पण गेली अनेक वर्षे लताबरोबर काम करताना तिच्यातल्या कलावताचे विश्लेषण करण्याचा मान मी अनेकदा प्रयत्न केला आहे. तिच्यामध्ये खरोखरच काही असामान्य गुण आहेत. आणि त्यानीच तिला इतर गायकगायिकाहून कितीतरी वरचे स्थान मिळवून दिले आहे. गायिका म्हणून लताचे जे मोठेपण आहे त्याची व्याख्या करणे फार अवघड आहे. गुलाबाच्या सुगधाचे विश्लेषण करता येत नाही. कोकिळेच्या स्वरमाधुर्याची चिकित्सा करता येत नाही. तसेच काहीसे हे आहे. लता गाते उत्स्फूर्तपणे. तिच्या बाबतीत ते अत्यत नैसर्गिकच आहे. असे वाटते की गाणे हे तिच्या व्यक्तित्वातच रुजलेले आहे. असा कलाकार शतकानून एखादाच जन्माला येतो.

लतावर लहरीपणाचा आरोप अनेकदा अनेकानी केलेला आहे. ती अत्यत अविश्वसनीय आहे असेही कोणी म्हणतात. मध्यतरी तर तिच्यावर दोषारोप करण्याची एक पद्धतशीर मोहीमच उघडलेली होती. ध्वनिमुद्रणाला लता कधीच वेळेवर उपस्थित राहात नाही असा या मडळीचा दावा होता. ध्वनिमुद्रणाच्या जागी लता प्रत्यक्ष आल्याखेरीज ती येईल की नाही याबद्दल कोणत्याही संगीत दिग्दर्शकाला निश्चयाने हमी देता येत नाही अशी या आरोप करणाराची तक्रार होती व आहे. या आरोपात थोडेसे तथ्य आहे. आणि चित्रपट व्यावसायिकानी याबद्दल तक्रार केली तर त्याना दोषही देता येणार नाही. कारण चित्रपट व्यवसाय ही एक कला असली तरी त्याबरोबर तो एक धदाही आहे. आणि धदा म्हटला म्हणजे प्रत्येक गोष्ट तिथे अखेर रुपये-आणे पैतच मोजली जाणार. म्हणून लतावर आरोप करणाराना मी दोष देणार नाही. पण त्याबरोबरच मला हेही माहीत आहे की गेली काही वर्षे लताची प्रकृती बरी नसते. आणि कित्येक वेळा प्रकृतीच्या अस्वास्थ्यामुळे ध्वनि मुद्रणाला हजर राहणे तिला केवळ अशक्य असते.

पण ही गोष्ट सोडली तरी लता अत्यत 'मूडी' आहे, लहरी आहे हे मात्र अगदी खरे. तथापि याला लताचाही काही इलाज नाही. तिची आत्यतिक तीव्र सवेदनाशीलता हेच तिच्या लहरीपणाचे कारण आहे. सतारीची ताणलेली तार असावी तसे तिचे मन ताणलेले असते. आणि लताने असेच असायलाही हवे आहे. ती अशी सवेदनाशील, हळवी नसती तर ती एवढी मोठी कलाकारही झाली नसती!

लताला चित्रपटासाठी ठरीव पद्धतीची तीच ती गाणी पुन्हा पुन्हा गावी लागतात. याबद्दलची आपली नाराजी तिने कितीतरी वेळा मला बोलून दाखवली आहे अनेकदा ती मला म्हणाली आहे, "पैशासाठी मला गावे लागते. केवळ गाण्यासाठी गाण्याचे समाधान मला किती क्वचित मिळते. खरोखरच, कधी कधी मला इतका कटाळा येतो म्हणून सागू!" लतासारख्या गायिकेचे हे दु ख जाणून घेणे अवघड नाही. कलेतील उदात्तता आणि सौंदर्य याची तीव्र जाणीव असलेल्या, त्या उच्च पातळीचा सतत शोध घेऊ पाहणाऱ्या तिच्यासारख्या श्रेष्ठ कलावतीला अत्यत सामान्य, थिल्लर गाणी केवळ व्यावसायिक कारणास्तव गावी लागतात हे दुर्दैवच होय. मला तर वाटते, कधी कधी अकस्मात उद्भवणारा तिचा आजार ही अशा सामान्य गाण्याबद्दल तिच्या शरीरमनाची नकळत होणारी प्रतिक्रिया असावी! लता जर थोडी अधिक व्यवहारी असती, कमी लहरी असती तर आज मिळवला आहे त्याच्या पाचपट तरी पैसा तिने अगदी सहज मिळवला असता! मला एवढेच वाटते, तिची प्रकृती सुदृढ असावी, मन प्रसन्न, उल्हसित राहावे आणि या भारतीय सगीताच्या सम्राज्ञीची कारकीर्द आणखीही अनेक वर्षे अशीच गाजत राहावी.

एक कलावत या नात्याने लताचा जो गौरव व्हायला हवा होता, जो मानसन्मान तिला मिळा यला हवा होता, ते तिच्या बाबतीत घडलेले नाही याचे मला अत्यत दु ख होते. कोणत्याही सास्कृतिक प्रतिनिधिमडळात लताचा आजपर्यंत का समावेश करण्यात आला नाही? तिला परदेशी

 सलिल चौधरी

उजळून ठेरल्या संगीताच्या क्षेत्रात परंपरेचे स्थान मोठे मानले जाते. कलावंत मंडळी आपापल्या कुळाचा आणि गोत्राचा फार मोठा अभिमान बाळगत असतात किंत्येकदा तर काही जण त्या गोत्राच्याच मोठेपणावर नादू पाहातात पण सूर आणि लय यानाच ठाकूर पार्वती मानून गाणारे फार थोडे कलावंत मी पाहिले. 'शुरा मूळचाचि खरा' म्हणजे काय ते ह्या कलावंताचे गाणे ऐकताना कळते—मग ते "मम सुखाची ठेव देवा" असो, "म्हारो जी भूलो ना माने" असो, किंवा "आये गा आनेवाला" असो. चिमुकली लता 'शूरा मी वंदिले' म्हणून गेली त्याला पचवीस वर्षे झाली दीनानाथाचे सूर हवेतून विरले नव्हते. त्याची धैर्यधराच्या भूमिकेतली ती गाणी, चमत्कृतीनी नटलेल्या गळ्यातून आलेल्या त्या जागा लोकांच्या कानात होत्या त्यामुळे 'शूरा मी वंदिले' ऐकल्यावर लोक म्हणाले, "वा—दीनानाथाची आठवण झाली." त्यानंतर मात्र या त्यांच्या लाडक्या कन्येने वडलाचेच व्रत चालवले. वडलाची नक्कल करण्याचे नव्हे. ते त्या मानी गायकालाही रुचल नसते. त्याने तर मराठी रंगभूमीवर स्वत ची गायकी निर्माण केली होती दीनानाथराव दीनानाथ रामारखेच गात होते. त्याच्या मुलीने हेच व्रत पुढे चालवले त्यानंतर लता ही लतासारखीच गात आली ह्या काळात अनेक नवीन गायिका चित्रपटातली गाणी म्हणण्यासाठी आल्या. त्याची धडपड 'डिट्टो लता' व्हायची होती त्यातल्या कुणी 'लताची आठवण करून देतात' अशीही तारीफ झाली असेल. पण संगीताच्याच काय कुठल्याही कलेच्या क्षेत्रात अमक्या तमक्याची आठवण करून देणारा कलावंत सदैव दुय्यम दर्जाचा मानकरी होऊन राहतो. लताने गेल्या पचवीस वर्षांत गझल, ठुमऱ्या, दादरे आणि हजारो विविध चालींनी नटलेली गाणी म्हटली—पण त्यात तिने आठवण फक्त लताचीच करून दिली कलावंत 'या सम हा' होतो तो असा!

लयीच्या आणि सुराच्या सूक्ष्मातिसूक्ष्म कणानी जेव्हा चैतन्य धारण केलेले असते त्यावेळी त्या गाण्याची कोणी जातवारी पाहात नसतात. उगीचच भयंकर धीमा एकताल लावून दहा मात्रापर्यंत सुराच्या माशा हाकलीत जायचे आणि मग झोपेतून जाग आल्यासारखे शेवटच्या एकदोन मात्रावरून उडी मारून समेच्या नाक्यावरची जकात चुकवायची आणि ख्याल गायक म्हणून मोठेपणा मिरवायचा याला काही अर्थ नाही संगीतात लयीतला प्रत्येक क्षण हा सुराच्या मजुराने भरून काढावा लागतो—नव्हे, तिथल्या सुराचा अभाव असलेला विराम हा देखील बोलका असावा लागतो चित्रपटासाठी गाइलेल्या साडेतीन मिनिटाच्या गाण्याला देखील चांगल्या ख्याल गायकाइतकीच लयकारीची जाणीव असावी लागते. लताचा सूर सारेच मानतात पण निमळ मनाने सर्व तऱ्हेच्या संगीताचा आस्वाद घेणाराना जर मनमुग्ध करणारी कुठली गोष्ट असेल तर शब्दाची फेक करताना दिसणारी लताची विलक्षण मोठी अशी लयकारीची जाणीव! तिच्या सुराइतकीच सूक्ष्म ढोबळ लयकारी नव्हे एखाद्या कुरंगाच्या पावलानी लयीच्या एका कणावरून दुसऱ्या कणावर अलगद उडणारी कुमार, बालगंधर्व आणि लता ह्याना वरदान आहे ते लयकारीच्या ह्या अलौकिक जाणकारीचे! गाण्यात बोलत असते ती लय आणि म्हणूनच लयीच्या जाणिवेचे हे दुर्मिळ दान घेऊन आलेल्या या कलावंतानी गाइलेले गाणे दुसऱ्या कोणीही म्हटले की काहीतरी कमी आहे असे वाटते. लताची गाणी तर खूप चांगला आवाज असलेल्या कितीतरी मुली गातात आवाजाची टीप गाठतात पण मूळ चित्र आणि त्याचा प्रिंट यात असतो तसा फरक दिसतो याचे कारण लयीच्या सूक्ष्मतेच्या जाणिवेचा अभाव.

सुराच्या वर्तुळातला मध्यबिंदू पकडणारा आणि लयकारीत वाहत्या काळाला निमिषानिमिषातला स्वास पकडणारा हा लताचा गळा आहे आणि म्हणूनच तिच्या गीतातले शब्दच नव्हे तर व्यंजनमुक्त स्वरही आज किती आशयगर्भ वाटतात लता 'धीरेसे आजा' म्हणून लोरी गाते पण 'आजा' नंतरचा तो स्वराचा हलकासा शिडकावा लयीच्या अशा जागेवरून उठतो की त्याने कसल्या तरी पानरवाचा स्पर्श केल्यासारखा वाटतो. ह्या साऱ्या उठावणी कमालीच्या मुष्किल आहेत केवळ

स्वराच्या करामतींमुळे नव्हे, ठठायासाठी पकडलेल्या, साऱ्या नजरेला न दिसणाऱ्या स्थानामुळे. लताच्या गाण्यातले असामान्यत्व मला तरी भासते ते इथं. झोप उडविणाऱ्या त्या अगाई गीतातल्या स्वराच्या थिडकाव्याप्रमाणे कितीतरी शिडकावे आज तिने गाइलेल्या शेकडो तबकड्यांच्या रचाराघातून लपलेले आहेत. तबकडींच्या त्या रद्यात शिरून तिरा गानी करणाऱ्या त्या सुईने अग्र अधिक सूक्ष्म की त्या रेघातून उमटणारा लताचा सूर अधिक सूक्ष्म हे सागणे कठीण आहे. होनाजींच्या भूपाळीतल्या 'आनद कदा प्रभात झाली' मध्ये वरच्या पड्ड्यावर 'इ'कार लागला आहे. तो अगाच सुराची सुई टुसल्यासारखा. 'जा जा रे जा साजना' मध्ये असाच एक मूर्च्छनेसारखी जागा आहे. 'कैसे दिन बीते कैसे बीती रतिया' मध्ये 'हाये' वर असाच एक सुराची पसरण आहे. अशी किती म्हणून उदाहरणे दाखवायची? माडगूळकराच्या 'जोगिया' कवितेतल्या नायिकेच्या गळ्यातून सूर उमटल्याचे वर्णन त्यानी 'स्वरवेल थरथरे फूल उमलते ओठी' असे केले आहे. लताचे कुठलेही गीत ऐकताना मला ही ओळ आठवते. तिने गायलेले प्रत्येक गीत हे स्वरलतेवरचे फूलच आहे. अशी शेकडो फुले गेल्या पचवीस वर्षांत फुलली आणि किती सहज सहज फुलल्यासारखी फुलली. शब्द, सूर आणि लय याचे विलक्षण आकार, गध आणि रग घेऊन प्रकटलेल्या फुलांचे हे नदनवन आहे.

मला नेहमी वाटते की मुबईसारख्या शहरात एक सगीताचे टोलेजग म्युझियम असावे. चित्रकलेचे किंवा इतर वस्तूचे असते तसे. त्यात टेप्सवरून किंवा तबकड्यावरून देशोदेशीचे आणि सर्व प्रकारचे सगीत ध्वनिमुद्रित करून ज्याला जे ऐकावेसे वाटेल ते ऐकण्यासाठी छोटी छोटी दालने करावीत. हे सारे गायक व गायिका दिसत कसे होते, बोलत कसे होते, राहात कसे होते, हे दाखवि णारी चित्रे आणि डॉक्युमेंटरीज कराव्यात. देशोदेशीच्या संगीताच्या इतिहासाची, शास्त्राची, कलावताच्या चरित्राची तिथे मोठी लायब्ररी करावी. पुस्तकाची लायब्ररी, तबकड्याची लायब्ररी, टेप्सची-डॉक्युमेंटरीजची लायब्ररी. सुरल्यीच्या तृषार्तांनी यावे आणि तृप्त होऊन जावे. त्या लायब्ररीत एक पडवी फक्त लताच्या गीताची होईल. इतक्या विविध प्रकारची गाणी गाइलेली दुसरी गायिका माझ्या तरी माहितीत नाही. आज पचवीस वर्षे अहोरात्र या अलौकिक सुराची उधळण चालू आहे. आमची पहाट लताच्या सुरावरोवर उमलते, माध्यान्ह, साज, रात्र, मध्यरात्र हाच सुराची साथ घेऊन येतात. वातावरणात कुठे ना कुठे तरी लताचा स्वर मावळत्या किंवा उगवत्या सूर्यचद्राच्या साक्षीने विहरत असतो. रेडियोतल्या एका इजिनियरने मला सागितले होते की साऱ्या जगात दुसऱ्या कुठल्याही गायकगायिकेच्या स्वराला वायुमडलातल्या ध्वनिलहरींवरून इतका अयाहत सचार करायचे भाग्य लाभलेले नाही. मला त्या विधानात मुळीच अतिशयोक्ती वाटत नाही. लताच्या सुराची कधी, कुठे आणि कशी गाठ पडेल कुणी सागावे? अनिलांच्या कवितेतली एक ओळ आहे :

'आज अचानक गाठ पडे—
भलत्या वेळीं भलत्या मेळीं
असता मन भलतीच कडे—'

कितीतरी प्रसग आठवतात. भारतापासून शेकडो मैल दूर अशा इडोनेशियातून प्रवास करीत होतो. दडकारण्यातल्या जनस्थानासारख्या वस्तीत, ज्याना आमच्या भाषेचा आणि आमच्या सगीताचा कुठलाही सस्कार नाही अशा इडोनेशियन ग्रामवासीयाचा छोटासा मेळावा फोनो लावून लताची गाणी ऐकत बसला होता. चिनी आक्रमणाच्या काळात हिमालयाच्या शिखरावर एका छावणीतल्या तबूतली गोष्ट. लडाखच्या यात्रेत असताना आम्ही तिथे जाऊन पोहोचलो होतो. आठदहा सैनिकांच्या चिमुकल्या तुकडीला त्या जीवघेण्या थडीत आणि त्या थडीहून अधिक गारठून टाकणाऱ्या विजन

वाळवंटात भयाण एकान्तात सोबत होती ट्रॅन्झिस्टरवरच्या लताच्या गीताची. सैनिकाच्या कुरबानीची याद करा अशी लताच्या आवाजातली ती आर्त हाक लक्षलक्ष डोळ्यांच्या कडा भिजवून गेली. पण हिमशिखरावर लताचा आवाज ऐकताना तन्मय झालेल्या त्या जवानांच्या तुकडीकडे पाहून वाटले की जवानांच्या कुरबानीइतकीच ह्या अलौकिक आवाजाची जगावर केवढी मोठी मेहरबानी आहे. इंडोनेशियातले ते ग्रामवासी किंवा हिमालयावरचे आमचे जवान ही तर साधी माणसे. गायनशास्त्रातले कोणी पंडित नव्हेत. पण अल्लादिया खाँसाहेबांचे चिरंजीव भूर्जीखाँ म्हणजे शास्त्रीय संगीतातले केवढे मोठे विद्वान गृहस्थ. मी त्यांना भेटायला गेलो होतो, त्यावेळी लताच्या गाण्याची तबकडी ऐकण्यात रंगले होते. 'आयेगा आनेवाला' ऐकून कुमार गंधर्व म्हणाले, "तबोऱ्यातून निघणारा गंधार ऐकायचा असेल तर लताच्या गळ्यातून ऐका." आडगावच्या गावढ्या मंडळींच्या अड्ड्यापासून तो मलबार हिलवरच्या बंगल्यात राहणारापर्यंत आणि शाळकरी पोरापासून तो जख्ख म्हाताऱ्यापर्यंत साऱ्यांनाच आपल्या स्वराच्या जादूने भारून टाकणारी ही लता—लता कसली, चित्रपटसृष्टीला लाभलेली ही कल्पलताच आहे. सुराच्या याचकाने जे मागावे ते देणारी. गझल, ठुमरी, दादरा, कव्वाली, भजन, पाळणे, लोकगीते, भावगीते, बालगीते, खानदानी संगीताच्या वळणाची गाणी ...मागणाराने मागत जावे. असली विविधता आणि तीमुद्धा असल्या दर्जाने दिसणारी, भारतीय संगीतात यापूर्वी कुणाच्याही गळ्यातून आली नसेल. हल्ली इलेक्ट्रॉनिक्सच्या साहाय्याने कॉम्प्यूटर्स म्हणतात त्या यंत्रावर वैज्ञानिकांनी अनेक चमत्कार करून दाखवायला सुरवात केली आहे. मानवी मेंदूला न साधणारे अनेक बौद्धिक पराक्रम ही यंत्रे करतात. उदाहरणार्थ, जे हिशेब करायला पंचवीस कारकुनांना एक महिना लागेल ते ही यंत्रे काही सेकंदात करतात. लता हा संगीतातला देवाच्या दुनियेतून आलेला कॉम्प्यूटरच आहे. गळ्यातून एक जागा निघावी म्हणून एकेका गायक-गायिकेने जिथे मेहनतीचे पहाड फोडले त्या बिकट जागा, त्या ताना, त्या मुरक्या, लयकारींचे ते सूक्ष्म भेद ती सहज करून जाते. शास्त्रीय संगीतातली जातकुळी असलेले एखादे सिनेमातले गाणे असते. लताची त्या गीतातली तान ऐशी गेलेली असते की मी मी म्हणणाऱ्या उस्तादांनी आणि पंडितांनी मनाचा तितका प्रांजळपणा असला तर स्वतःचे कान पकडावे. मला खात्री आहे की उद्या एखाद्या पाश्चात्य संगीतदिग्दर्शकाने लताला जर इंग्लिश गाणे गायला बोलावले तर ह्या बाई तिकडल्या तमाम गाणाऱ्या मडमांना संकटात टाकतील. लताच्या सुराला 'अटक मटके जेथे तु सहा' अशीच जिद्द आहे.

देवटाक्याच्या पाण्यासारखा हा गळा. रंग टाकणाराने आपल्या रंगाच्या निवडीची कमाल करावी. हा गळा त्या त्या रंगाची स्वरपुष्पे क्षणात फुलवून दाखवतो. हा स्वरच मुळी परिसाचा धर्म घेऊन आलेला स्पर्श झाला की कशाचेही सोनेच व्हायचे. नुसता स्वरच काय अभिनयाची जाणकारी फार मोठी. चित्रपटातले गाणे हे संवादासारखे अभिनीत करायचे असते. मला तर लताला प्लेबॅक आर्टिस्ट का म्हणतात तेच कळत नाही. तिच्या गाण्यांना त्या नटीच्या अभिनयाचा प्लेबॅक असतो. बहुधा तो तिच्या शब्दस्वरांतून उमटलेल्या भावनांच्या उंचीला पोहोचत नाही. 'धूल का फूल' नावाच्या बोलपटातले 'तू मेरे प्यारका फूल है—' गाणे लताने म्हटले आहे. एका बेवारशी गणल्या जाणाऱ्या अर्भकाची आई हे गीत गाते आहे. अभिनय आणि संगीत ह्या दोन्ही दृष्टींनी ह्या गीताचा अभ्यास करावा. लताने त्या गीतातला एक एक शब्द लयीच्या प्रवाहावर फुलाची एक एक पाकळी सोडावी तसा सोडला आहे. तिने म्हटलेल्या गीतांना कित्येकदा पडद्यावरच्या नटीच्या ओठाची, स्वतःच्या चेहऱ्याची घडी विस्कटू न देता सुरू झालेली निर्जीव हालचाल पाहिली की वाटते लताच्या गाण्याच्या वेळी या पडद्यावरच्या नटींना पडद्याआडच ठेवावे आणि कॅमेरा केवळ चंद्र, सूर्य, तारे, पाने फुले, पाणी, नद्या, डोंगर असल्या दृश्याच्या दिशेला फिरवावा. आपल्या स्वरांनी आणि स्वराइतक्याच रेखीव अभिनयाने फुललेल्या गीतांनी लता अशी जादूनगरी उभी करते. त्यात

कित्येकदा त्या नदीच्या ओठाची निष्प्राण हालचाल लताच्या सुराना दिलेल्या वरवरच्या लिपसिंपथी-
फारशी खोटी वाटते. म्हणून मला वाटते की लता कसली पार्श्वगायिका–तिच्या गीताच्या अभि
व्यक्तीतून होणाऱ्या भावनांच्या पातळीला न पोहोचणाऱ्या नटी या पार्श्वनायिका आहेत.

हिंदी चित्रपट हा काही माझ्या फारशा सलोख्याचा विषय नाही. पण अनेक वारे आणि
तारकांनी चमचमणाऱ्या या अंगणातून उद्या लता आणि आशा ह्या भगिनींनी आम्हाला वगळा म्हटले
तर ही तारागणे एका क्षणात हतप्रभ होतील. सिलोन रेडिओचा व्यापार विभाग ढळमळायला लागेल
आणि आमची आकाशवाणी चेंदिल्वाणी होऊन जाइल. हिंदी चित्रपटाची दुनिया तर तिथल्या
संगीतदिग्दर्शकांनी आणि मुख्यत लताच्या आवाजाने तगून धरली आहे हे म्हणजे मिलिट्रीच्या
बँडवाल्यानी एखाद्या राष्ट्राचे सरक्षण केल्यापैकीच आहे. संगीत दिग्दर्शकाच्या भाग्याने लता
नावाचा एक चमत्कार पचवीस वर्षांपूर्वी हिंदी चित्रपटसृष्टीत आला. या सृष्टीची ती आज गले पाव
शतक सम्राज्ञी आहे चपापडीच्या योगासारखा तिच्या सार्वजनिक दर्शनाचा योग असतो कुठले
प्रीमियर, कुठली ज्युबिली असल्या प्रसिद्धीच्या नाना आकर्षणापासून ती दूर असते आणि राणीला
मिरवावे कुठे लागते! मिरवतात दासी गल्या पचवीस वर्षांत तिच्या स्वराचे हजारो-लाखो अत
करणावर अधिराज्य चालू आहे संगीतदिग्दर्शक नवा असो, जुना असो, एकदा मायक्रोफोनपुढे
आली की सुराना प्राणाचा स्पर्श झाल्याचा साक्षात्कार घडवते आणि त्या बाजारातून नाहीशी होते
पचवीस वर्ष हा गळा गातो आहे. तिच्या तीर्थरूपानी मराठी रंगभूमीवर आपल्या गाण्याने मी
मी म्हणणाराना बुचकळ्यात पाडले होते माझ्या आयुष्याच्या ताळेबंदीत जमेच्या बाजूला जे महान
क्षण आहेत त्यातले कितीतरी दीनानाथरावाच्या गाण्यानी उजळलेले आहेत सावरकरासारख्या
उत्तुंग प्रतिभावताने केलेल्या गाण्याची दीनानाथरावाच्या अश्वमेधाच्या घोड्यासारख्या विजिगीषु
गळ्यातून निघालेली फेक आजही माझ्या मनात साठलेली आहे त्याची ती विजेच्या चपळाईने
आणि विलक्षणच बेगुमानपणे जाणारी तान आठवली की आजही जीव अस्वस्थ होतो जिवाला
बेचैन करणारे ते गाणे! अस्वस्थ करणारे, गुंगी आणणारे नव्हे. दीनानाथाच्या कलेचे राज्य त्या
काळातल्या आणि व्यवसायाच्या परिस्थितीमुळे मर्यादित राहिले त्यांच्या ह्या लाडक्या लेकीने त्या
राज्याच्या सीमा अमर्याद वाढवल्या गुणी गायकवादकाच्या सुराचे हे ऋण कसे फेडायचे! लताच्या
शेकडो स्वराची ही सुराची ठेव कुठे ठेवायची? ती स्मृतिवरी लिहावी आणि ते ऋण इथेच ठेवून
जायचे! पाव शतकभर साठत आलेले हे ऋण ऋणकोने धनकोबद्दल एकच भावना ठेवावी, ती म्हणजे
धनको सदैव अधिकाधिक धनवान होत जावा हीच आमच्या सुराच्या मागण्याला अत नाही आम्ही
ह्या बाबतीत सदाचेच भिकारी सदैव मागतच राहणार चोखोबाने विठ्ठलाशी मागणे मागताना 'पोटापुरते
देई विठ्ठला—मागणे ल्यी नाही ल्यी नाही' म्हणून मागितले पोटापुरते देणाऱ्या विठ्ठलाला
देताना कळले असेल की चोखामेळ्याच्या पोटाची भूक कधीच भागणारी नव्हती लताने कोण्यावधी
अत करणाच्या सुराची भूक भागवता भागवता वाढवली आहे हे स्वरभांडार तिच्या शिवाय कोणी
मोकळे करून ठेवले, काय सांगावे! मी वाडवडलाचे आशीर्वाद मानणारातला आहे. मला वाटते,
दीनानाथानीच ही मर्मबंधातली ठेव आपल्या मुलामुलींना सभाळायला दिली आळंदीच्या विठ्ठलपताची
लेकरे जशी दुधाचे दात पडण्यापूर्वीच विश्वात्मक देवाच्या वाग्यज्ञाची समुधी गोळा करायला लागली
तशी मगशीच्या दीनानाथाची ही मुले हातभर उचीची असल्यापासूनच स्वरयज्ञाच्या तयारीला
लागली लताकडे निदीपण आले तिने हे वाण आपल्या हाती घेतले आणि अहद्दिशाना दूर पसरला
चित्रपटाच्या मयसृष्टीत काचेचे हिरे आज दगडाच्या मालाने दुर्लक्षिले जातात तिथे आज लता
पचवीस वर्षे आपले स्थान टिकवून आहे त्या सृष्टीत राहूनही ती एका विलक्षण अलिप्तपणाने जगत
असते आपल्या स्वराने सर्वांच्यात आहे आणि आपण मात्र कुणाच्यातही नाही दिवसातून किती
लता

पुरुषोत्तम लक्ष्मण देशपांडे

# मुली, औक्षवंत हो

"राज्य सुखी या साधुमुळे—शूरा मी वंदिले—" 'राज्य सुखी या साधुमुळे' नंतरच्या 'शूरा' मधल्या 'रा' ह्या अक्षरावर सभागृहातून विजेच्या वेगाने आणि विजेच्या लखलखाटाने एखादा तीर सू सू करीत जावा तशी त्या चिमुकल्या गळ्यातून तान गेली आणि सभेचा लक्ष्यवेध झाला. त्या सात-आठ वर्षांच्या चिमण्या जीवाला आपण काय केले याची कल्पना तरी होती की नाही देव जाणे. सगळ्या पॅलेस थिएटरचे भान त्या सुरांबरोबर हरपले. एक एवढीशी हडकुळी, पण अतर्बाह्य आत्मविश्वासाने फुललेली मुलगी रंगभूमीवर येते काय आणि फार फार तर 'घेउनि ये पंखा' म्हणायच्या वयात एकदम 'शूरा मी वंदिले' सुरू करते काय. बाबालाल तबल्जी एखाद्या अनुभवी गायकाबरोबर धरावा तसला ठेका काय धरतात आणि पदाची अस्ताई संपवून पहिल्या समेला येताना ही पोरगी पुरे दिमाखाचा ठेका धरतात आणि पदाची अस्ताई संपवून पहिल्या समेला येताना ही पोरगी पुरे सप्तक भेदून त्यांचा तो निकट बोजा सांभाळून समेवर येते काय! कोल्हापूरच्या त्या पॅलेस थिएटरात, संगीतातल्या दिग्गजांनी ज्या रंगमंचावरून सुरांच्या बरसातीचे साक्षात्कार घडवले आहेत त्याच स्थानावरून एका परक्या पोरीने हे नवल वर्तवले होते. आश्चर्य, आनंद आणि त्या पोरीच्या कर्तबगार पित्याची आठवण असल्या नानाविध भावनांनी त्या मंदिरातल्या श्रोत्यांच्या अंगावर रोमांच फुलले. कडकडून टाळी झाली नुसती पहिल्या समेला! मी मी म्हणणारांनी स्वतःला चिमटा घेऊन पाहिले असेल की आपण हे ऐकतो आहो ते खरेच आहे की हे स्वप्न आहे. त्या तानेचा दाणान् दाणा स्वच्छ होता, सुरात भिजलेला होता, लयीच्या कणकणाचा अंदाज बिनचूक होता, समेवरची झडप तर कशी धारीधारदार होती. समोरचे ते एवढेसे परकरपोलक्यातले दर्शन नसते तर एखाद्याला वाटले असते की कुणी तपा तपाची मेहनत झालेली बुजुर्ग बाई केवळ चूष म्हणून बाल आवाजीत पल्ला घेऊन गेली. यापूर्वी फक्त बालगंधर्वांनी असला धक्का दिला होता. बालगंधर्वांनी कुमार गंधर्वांनी वयाच्या नवव्या वर्षी मुंबईच्या जिना हॉलमध्ये असला धक्का दिला होता. बालगंधर्वांनी आणखी काही वर्षांपूर्वी असाच बालवयात रंगभूमीवर येऊन असंख्य अंतःकरणे आपल्या सुरांनी झेलली होती. आणि आता हा एक नवा चमत्कार घडत होता. बालगंधर्व, कुमार गंधर्व आणि लता मंगेशकर! तिघांनी संगीतातल्या तीन निरनिराळ्या वाटा धरल्या आणि आपापल्या असामान्यत्वाने



लता

अशा आमच्या दिदी. त्यांच्या गाण्याचा, त्यांच्या अफाट प्रसिद्धीचा, जनतेच्या त्यांच्यावरील प्रेमाचा मला फार अभिमान वाटतो. परवा त्यांचा मोठा आजार होऊन गेला. त्यावेळी देशाच्या सर्व कोनाकोपऱ्यातून, तसाच परदेशातूनही असंख्य तारा व पत्रे केवळ त्यांच्या प्रकृतीची चौकशी करण्यासाठी व त्यांना शुभेच्छा देण्यासाठी येत होती. कोणी त्यांच्यासाठी नवस केले होते. कोणी देव पाण्यात ठेवले होते. इतका साऱ्यांचा त्यांच्यावर जीव आहे.

दिदी एवढ्या मोठ्या कलावंत पण आमच्या सरकारला काही अजून त्यांना पदवी द्यायचे सुचत नाही. न सुचो. मला तर असे वाटते की दिदींचे नाव हीच त्यांची मोठी पदवी आहे. 'लता मंगेशकर' या नावापेक्षा मोठे नाव, मोठा किताब काय असू शकेल? माझी खात्री आहे की पुढच्या पिढीत उत्तम गायिकांना 'लता मंगेशकर' हीच पदवी दिली जाईल.



जयसिंग खावदार

चढलेला आवाज कानी आला की आम्ही नोकर लोक जागच्या जागी बर्फासारखे थड होतो. त्य' आसपास दिसल्या की काम करीत नसलो तरी कामात गढून गेल्याचे 'अॅक्टिंग' आम्ही त्याना करून दाखवतो. कामात एवढेसे काही बिघडले तर उपाताई सारे घर डोक्यावर घेतात. अशा वेळी त्यांचा आवाज सातव्या मजल्यापर्यंत पोहोचतो पण एक गोष्ट मात्र अगदी खरी आहे ही एक मुल्गी घरात आहे म्हणून ठीक आहे. नाहीतर आम्ही बदमाषानी मगशकराचे घर कदाचित केव्हाच लुटून नेले असते.

मीनाताई आणि बाळासाहेब ही या घरातली शांत व सोशिक माणसे आहेत. मीनाताईंना तर मी बहीणच मानले आहे. आणि त्यानीही पण मनाच्या मोठेपणाने माझे गरीबाचे भावाचे नाते गोड करून घेतल आहे. त्याच्या मुलाचा मला खूप लळा आहे. बाळासाहेबाचे थोडक्यात वर्णन करणे मला जमणारच नाही. मी तर त्याना सत गाडगेमहाराजाचीच उपमा देत असतो. हिंदुधर्म, देव, देश याचे ते खरे भक्त आहेत. वाचनाची आवड इतकी की सारा वेळ ते ग्रथाच्या सगतीत घालवतात. त्या खालोखाल वेड गाण्याचे. या मुलाची राहणी अत्यत साधी आहे हा आपला एकुलता एक मुलगा म्हणून माई त्याचे खूप लाड करतात त्यानी बाळासाहेबाना भारी किंमतीचे अनेक सूट शिवले आहेत. पण त्यानी कधी ते अगालाही लावले नाहीत. एक साधी विजार सुदता असला की बाळासाहेब खूष

दिदींचा स्वभाव अत्यत प्रेमळ आहे पण पुष्कळदा घरात त्याचे काही बिनसले असले किंवा प्रकृती बरी नसली किंवा रेकॉर्डिंगला जाताना न्याहारी मिळालेली नसली की झाले मग सारा राग, सताप बिचाऱ्या ड्रायव्हरवर म्हणजे माझ्यावर निघतो पण तो राग जातोही तेवढ्याच झटकन. दिदींना फोटोग्राफीचा मोठा छद आहे. त्यासाठी कॅमेऱ्याचे रोल्स खरेदी करणे, निगेटिव्हज डेव्हल पिंग्ल व प्रिंटिंगला देणे, फोटोचा 'साइझ' सागणे व तसे फोटो करवून आणणे ही सर्व कामे मला करावी लागतात तो तपशील नेमका कधी माझ्या ध्यानात राहत नाही मी त्यात अनेक चुका व गोंधळ करतो. की दिदी चिडल्याच. मग एक रोल कोपऱ्यात फेकला जातो दुसरे प्रिंट सरळ खिडकीतून रस्त्यावर भिरकावले जाते. मी जीव मुठीत धरून थरथरत बाजूला उभा असतो

पण याच रागीट दिदी कधी कधी एकदम भावनावश होऊन मला म्हणतात, "जयसिंग, मी जोवर लता मगशकर आहे, तोवरच तुला काय हवे ते माझ्याकडून मागून घ अरे, माझ्यातून 'लता' निघून गेली तर तुला काही मिळणार नाही. तू माझ्याकडे फार कष्ट केले आहेस. मी तुला दहा हजार रुपये देते. ते घे. कोल्हापूरला घर बाध. मुलाबाळाना आसरा निर्माण करून ठेव. पुढे त्याना सुख लाभेल "

पण मी असा आळशी की हे काहीही मी अजून केलेले नाही. मनात येते, अशी दिलदार धनीण आहे हेच मोठे भाग्य. आणखी मला काय हवे!

दिदींबरोबर मी हजारो मैलाचा प्रवास आजवर केला आहे. जी त्याची गाणी पुढे खूप गाजतात ती अगदी पहिल्याप्रथम रेकॉर्डिंगच्या वेळी ऐकण्याची दुर्मिळ सधी मला मिळाली आहे त्याच्या बरोबर मी जेथे जेथे जातो तेथे तेथे त्यांच्यामुळे मलाही मोठेपणा मिळतो. मेजवान्या मिळतात. पण पचपनाच्या मेजवान्याप्रमाणे इतर 'मेजवान्या' ही कधीकधी खाव्या लागतात एकदा रॉक्सी थिएटरसमोर दिदींची गाडी मी थांबवली होती. त्यावेळी एकदम काही गुडांनी गाडी घेरली आणि ते ओरडू लागले, "ऐ लता, गाणा गावो. नागिण का गाणा सुनाओ." ते शब्द ऐकले आणि माझे सतापाने डोकेच भडकले मी गाडीतून खाली उतरलो आणि त्या गुडाना भरपूर चोप दिला. पण मी एकटा. ते अनेक. त्यामुळे मला अर्थातच जास्त मार खावा लागला. आजही तो प्रसग आठवला की मोठी मौज वाटते.

दिवस होता सकाळी सूर्याला ग्रहण लागले होते. 'दे दान सुटे गिराण' ओरडत रस्त्यावरून भिकारी
धावत होते तेवढ्यात सीझर माझी नजर चुकवून बाहेर गेला. वाटेत त्याला रबर रिंग मिळाली. ती
दातात धरून तो बाजूच्या बिल्डिंगमध्ये जाऊन बसला. ते कोणाच्याच ध्यानी आले नाही पण
सीझर एकाएकी दिसेनासा झाला. त्यामुळे रस्त्यावरच्या भिकाऱ्यानी त्याला चोरून नेला की काय
अशी सर्वांना भीती वाटली आणि सीझरच्या शोधासाठी एकच धावाधाव सुरू झाली. माई एकीकडे
टॅक्सी करून गेल्या उषाताई आणखी कोणाला तरी बरोबर घेऊन दुसरीकडे गेल्या मीही त्याला
शोध शोध शोधले पण कुठेच सीझरचा पत्ता नाही. मी रडू होऊन घरी परत आलो. दिदींकडून
मला एकदम निरोप आला, "गाडीच्या किल्ल्या वरती आणून दे." मी भीत भीत दिदींसमोर
जाऊन दाखल झालो

"सीझर कुठे आहे?" त्यानी मला शांतपणे विचारले. त्या शांतपणामागे केवढा संताप
भरलेला होता हे अनुभवाने मला चांगले ठाऊक होते. मी काहीच बोललो नाही

"गाडीच्या किल्ल्या आणून दे अन् तू कुठेही चालता हो." त्याच स्वरात दिदी म्हणाल्या
आणि त्या बाजूला वळल्या.

मला ब्रह्मांड आठवले थोडा वेळ जातो न जातो तो आमच्या सखारामने सीझरला शोधून
आणला. त्याला पाहून साऱ्यांचा जीव भांड्यात पडला. त्या दिवशी घरातली सर्व मंडळी 'सैबर'मध्ये
जेवायला जाणार होती. पण सीझर हरवल्यामुळे जेवण लांबणीवर पडले होते सीझर सापडला त्या
आनंदात सारी माणसे जेवायला निघाली दिदींनी मला गाडी काढायला सांगितली. आम्ही 'सैबर'
जवळ येऊन पोहोचलो 'सैबर'च्या अलिकडेच 'न्हिदम हाऊस' आहे. तेथून गाडी जात असता
दिदींना एकदम मी मागे कव्हा तरी त्यांच्याजवळ रेडिओ मागितला होता त्या गोष्टीचे स्मरण झाले
त्यांनी तात्काळ मला प्रेमाने फर्मावले,

"जयसिंग, तू दुकानात जा आणि तुला आवडेल ते रेडिओचे मॉडेल तू आपल्यासाठी
घेऊन ये"

सीझर हरवल्यामुळे थोड्यापूर्वी दिदी माझ्यावर केवढ्या तरी संतापल्या होत्या. पण त्या
प्रकरणाचे पर्यवसान शेवटी मला एक उत्तम रेडिओ मिळण्यात झाले.

आज कित्येक वर्षे या मंगेशकर कुटुंबात मी वावरतो आहे. आता तर मी या कुटुंबातलाच
एक बनलो आहे दिदींची मी प्रत्यक्ष चाकरीच बजावतो आहे. पण घरातल्या इतर मंडळींशीही
तेवढेच ऋणानुबंध, तेवढेच जवळचे नाते जडले आहे हे कलावंताचे घर आहे. प्रत्येकाची तऱ्हा
वेगळी प्रत्येकाची लहर निराळी प्रत्येकाची रागलोभाची रीत निराळी पण सारी माणसे मनाने
प्रेमळ आहेत हे घर उदार आहे आल्यागेल्याची चौकशी करणारे आहे माणसाचे याना अगत्य
आहे नोकराचाकराना बोलणी बसतील पण त्यांच्या खाण्यापिण्यात, कपड्यालत्त्यात औषधपाण्यात
कधी कसूर होणार नाही सणासुदीला बक्षिसे भरपूर घातली जातील आणि अडीअडचणीला आपुलकीने
धसघशीत मदत केली जाईल त्यामुळे जो एकदा कामाच्या निमित्ताने इथे आला त्याला सतत याच
घराची, याच माणसांची सेवा करावीशी वाटते. माझा अनुभव हाच आहे

घरातले वडीलधारे माणूस म्हणजे आमच्या माई त्या आमचे अनेक अपराध सहन करतात.
दिदींपर्यंत त्या गोष्टी सहसा जाऊ देत नाहीत कारण केस एकदा 'त्या' कोर्टात गेली की तिचा
कायमचाच निकाल लागतो तेथे अपील नाही आमच्या आशाताई या फार प्रेमळ. केवळ दयेचा
सागर. पण या सागराची भरतीओहोटी सतत चालू असते आणि त्यात कधी तुफान उठना कधी
वादळ झाले तर मग नावाडयाच नव्हे मोठमोठी जहाजेही त्यात गडप होतात आणि भलेथोरले
डोंगरही वाहून पडतात उषाताई ही या घरातली अत्यंत कडक व शिस्तशीर मुलगी आहे त्यांचा



जयसिंग आगनगार

मी जेवलो नव्हतो. माझ्या जेवणाच्या आधीच सारे अन्न संपून गेले होते. मी उपाशी आहे हे पाहून दिदींचे मन कळवळले. त्यांनी मला लगेच वीस रुपये काढून दिले आणि कोठे तरी हॉटेलात जाऊन मला पोटभर जेवून यायला सांगितले.

दिदींकडच्या अवघ्या सोळा वर्षांच्या नोकरीतला हा एक आठवणीत राहिलेला प्रसंग. त्यांच्या रागाचा आणि त्यांच्या लोभाचा.

आणखी एक असाच प्रसंग आठवतो. त्यावेळी 'मेहबूब' स्टुडिओमध्ये 'गाईड' चित्रपटातल्या गाण्याचे रेकॉर्डिंग चालू होते. मरहूम मेहबूबखान यांचा सीझर नावाचा मलाथोरला अल्सेशियन कुत्रा त्यावेळी अगदी दीनवाणा होऊन स्टूडिओत हिंडत असे. तो रेकॉर्डिंग थिएटरकडे तोंड वर करून दिदींना बघत होता. दिदींना त्या कुत्र्याबद्दल कुतूहल वाटले आणि रेकॉर्डिस्ट कौशिक यांजकडे त्यांनी चौकशी केली.

"हा प्राणी कोण ! कुणाचा ?"

तो कुत्रा मेहबूबखान यांचा असून त्यांच्या मृत्यूमुळे तो अगदी पोरका झाला असल्याचे कौशिक यांनी दिदींना सांगितले. दिदींना त्या कुत्र्याची दया आली. आणि त्यांनी मेहबूबखान यांचे चिरंजीव आयूब यांजकडे मला पाठवून सीझरची त्यांच्याजवळ मागणी केली. त्यांनी सीझरला घेऊन जाण्याची आम्हाला परवानगी दिली. मी दिदींना रेकॉर्डिंगनंतर घरी नेऊन सोडले. आणि पुन्हा गाडी घेऊन मेहबूब स्टुडिओत गेलो नंतर सीझरला गाडीत घालून घरी घेऊन आलो. त्या दिवसापासून सीझरचा दिदींच्या परिवारात समावेश झाला. सीझर हा मला थोरला जगी कुत्रा. त्याचे खाद्य रोज दोन किलो मटण आणि एक शेर दूध एवढे असे. मेहबूबखान गेल्यानंतर त्याची खाण्याची आबाळ होत होती. सीझर आमच्या घरी आल्यानंतर दिदींनी त्याची सर्व देखभाल माझ्यावर सोपवली. रोज सकाळी अच्छेर दूध, टोस्ट, दुपारी एक वाजता अर्धा किलो मटण, संध्याकाळी चार वाजता अच्छेर दूध, टोस्ट, रात्री नऊ वाजता पुन्हा अर्धा किलो मटण असा सीझरच्या आहाराचा भरगच्च कार्यक्रम दिदींनी मला नेमून दिला. एके दिवशी दुपारी आमच्या घरातल्या सखाराम या नोकराने नेहमीप्रमाणे अर्धा किलो मटण सीझरला दिले होते. आणि ते खाऊन तो समोरचे भांडे खडखड खडखड वाजवीत होता. योगायोगाने त्याच वेळी दिदी तेथे आल्या. भांडे वाजवणारा सीझर पाहून त्यांच्या मनात आले, त्याची भूक बहुधा भागलेली नसावी. आणि म्हणूनच भांडे वाजवून तो इतरांचे लक्ष आपल्याकडे वेधून घेत असावा. झाले. दिदींच्या रागाचा पारा एकदम चढला. तेवढ्यात गॅरेजमधून माझा आवाज त्यांच्या कानी पडला. सखारामनेही मला हाक मारली. मी धावतच वर आलो. मला बघताच दिदींनी एकदम माझ्या अंगावर ओरडून मला विचारले,

"याच्या जेवणाचे प्रमाण काय ?"

"वेळी अर्धा किलो." मी म्हणालो.

"एवढे मोठे जनावर. अर्ध्या किलोने त्याला काय होणार ?" दिदींचा राग ओसरला नव्हता. त्या पुन्हा ओरडल्या, "मटण माझ्या पैशाने येते. त्यात तुझे काय जाते ! दुष्ट कुठला ! उद्यापासून सीझरला दररोज दोन किलो मटण आणि दोन शेर दूध मिळाले पाहिजे. यात काही कमी झाले तर याद राखून ठेव."

असा हा सीझर दिदींचा फार आवडता आहे. आणि सीझरचीही पण दिदींवर तशीच भक्ती आहे. मध्यंतरी दिदींचा फार मोठा आजार होऊन गेला त्या वेळी सारा वेळ तो त्यांच्या खोलीत बिछान्याच्या पायथ्याशी बसून असे. दिदी बऱ्या होऊन हिंडू फिरू लागल्या तेव्हाच सीझरने त्यांची खोली सोडली.

याच सीझरमुळे आणखी एक चमत्कारिक प्रसंग एकदा माझ्यावर ओढवला होता. सूर्यग्रहणाचा

तरी वेळा आकाशवाणीवरून तिच्या नावाचा पुकारा होतो. आपल्या सान्या जीविताचे स्वरमय अलगुज करणारी ही कलावती. तिच्या गाण्याला कुठलीही फूटपट्टी लावून ते मोजता येत नाही त्या साडेतीन मिनिटांच्या कालावधीत तिच्या गळ्यातून निघालेल्या प्रत्येक सुराला अंतिमत्व आहे. ताज महालाच्या स्थापत्यात जशी सुधारणा सुचवता येत नाही किंवा चांदण्याची शोभा वाढवायला त्या चांदण्यात आणखी काही दुरुस्ती घडवावी असे वाटत नाही तसे त्या स्वराला 'तत् त्वम् असि' असे म्हणावे लागते. सुराचा मर्मबंध गवसलेला हा गळा आहे. सूक्ष्म लयतत्त्व पाहणारी ही नजर आहे. लताची पंचवीस वर्षापूर्वीची तबकडी काय आणि आजची काय, त्याच चैतन्याने उजळलेला तो सूर. कोमेजणे ठाऊक नाही. आणि त्याची नक्कलही होऊ शकत नाही.

असली ही गुणी मुलगी आणि तिची गुणी भावंडे. कोल्हापूरच्या पॅलेस थिएटरजवळ चिमुकल्या घरच्यात राहात होती तेव्हापासून आजतागायत आपल्या गात्या गळ्याने सुराचे जग जिंकत चाललेली पाहात आलो आहे. या गळ्यांना कधीही थकवा न येवो आणखी खूप वर्षे हे गळे असेच गात राहोत. ज्ञानदेवाच्या दारी सोन्याचा पिंपळ होता. ह्या भावंडाच्या दारी सुराचा पिंपळ आहे. आज त्या पिंपळाच्या पानापानाइतकी गीते गाऊन ह्या भावंडानी शेकडो अंत करणे तृप्त केली आहेत.

संगीतातले धुरंधराचार्य सिनेमासंगीताला नाक मुरडीत असतात त्याचे मुख्य कारण म्हणजे ही मंडळी आपले कान चारा दिशातून येणाऱ्या सुरासाठी उघडेच ठेवीत नाहीत. वास्तविक सिनेमा संगीत हे आजचे लोकसंगीत आहे. लता मंगेशकर ही आमची खरी 'नॅशनल आर्टिस्ट' आहे—राष्ट्रगायिका आहे. नॅशनल प्रोग्राममध्ये गायले म्हणजे नॅशनल आर्टिस्ट होत नसतो. त्याला आकाश वाणीच्या स्टुडियोत घर करून चालत नाही देशातल्या लोकांच्या अंत करणात घर करावे लागते ते भाग्य लताइतके दुसऱ्या कुठल्याही गायकाला किंवा गायिकेला लाभलेले नाही आज पंजाब–सिंध–गुजरात–मराठा–द्राविड–उत्कल–वंग जर कोणी एकत्र बांधून ठेवला असेल तर लताच्या सुरानी निसर्गदत्त किंवा संकुचित मनाने त्यांना बहिरेपणा आलेला आहे असे जर काही अभागी वगळले तर या सुरानी आकृष्ट न होणारा या देशात कुणी असेल असे मला तरी वाटत नाही लताने अपरंपार यश मिळविले आहे. तिचा स्वर ऐकला की वाटते देवाचं देणे मिळावे तर असे! आणि या देवदत्त प्रतिभेला या गायिकेने डोळस परिष्करणाची जोड दिली आहे. केवळ देवाची देणगी नाही. त्यामागे चांगली जाणकारी आहे ह्या अद्वितीय यशावर राष्ट्रीय पदवीची तीन किंवा पाच अक्षरे कसला चांद चढवणार? पण कृतज्ञतेची जाणीव आपल्या आधीच्या पिढ्यांना नव्हतीच का, हा प्रश्न पुढल्या पिढ्यांनी करू नये म्हणून त्या अक्षराचा तुरा तिच्या मस्तकी खोवला पाहिजे सिनेमातले गाणे अल्पजीवी म्हणून हेटाळू नये ते गाणारांची आणि ती गीते लिहिणाऱ्या प्रतिभावान गीतकाराची उपेक्षा होता कामा नये. तसे करायचे असेल तर ,वेलीवर फुलणाऱ्या जाई जुईलाही तुच्छ मानावे लागेल चित्रपटसंगीतात तबकडीवरची ही तीन साडेतीन मिनिटे सुराच्या खाणीतून नवी नवी रत्ने काढून साजरी करणे हे काम सोपे नाही त्या कालावधीतली प्रत्येक सेकंदाची पोकळी फार फार चतुराईने भरावी लागते. बहुधा गाणे न कळणारे उपभ्रू रसिक आपण शास्त्रीय संगीताखेरीज दुसरे काही ऐकत नाही वगैरे सांगत असतात. हे म्हणजे स्वत ला फुलाचा शौकीन म्हणवणाराने आपण फक्त भारतीय संस्कृतीचे प्रतीक असलेले कमल तेवढे मानतो, इतर जाईजुई वगैरे हलकी फुले मानत नाही म्हणण्यापैकी आहे ही माणसे चुकून सुराच्या राज्यात शिरली आहेत. वास्तविक पक्षपाताने विकल झालेल्या राजकारणातच शिरायची. डोळ्यांना झापडे आणि कानावरून टापशी बांधलेली ही हट्टाग्रही माणसे. सिनेमा, नाटक, तमाशे, कीर्तने, भारुडे निरनिराळे सण यातून सुराची काय सुंदर सुंदर फुले फुललेली आहेत. त्याचा आस्वाद का म्हणून घ्यायचा नाही? खानगानी

पु ल देशपांडे

स्वरूपाच्या निर्गुण स्वरूपाकडे जाताना सुराची ही मोहक सगुण रूपडी पाहायची सुद्धा नाहीत हा कसला दळभद्रेपणा ! आम्ही नाही त्या अहंकाराने आपण होऊन आपली मने गहाळ करून ठेवतो. डोळे, कान, मन हे चारी दिशाना मोकळे असावे. आज रेडिओने केवढी मोठी सोय केली आहे. देशोदेशीचे गाणे उशाशी आले आहे. अज्ञानपणाने लोक रेडिओ फार मोठ्याने लावतात हा चित्रपट-संगीताचा दोष नव्हे. भारतीय चित्रपटात संगीतदिग्दर्शकांनी स्वररचनेचे फार कौतुकास्पद चातुर्य दाखविले आहे. गीतकारांनी मोठी टपोरी गीते लिहिली आहेत. भारतीय संगीताच्या प्राथमिक शिक्षणाला ह्या गीतांचा केवढा उपयोग करून घेता येईल. आणि सच्चा सूर दाखवायला तिथे लताचा आवाज आहे. सुराचा आणखी सुंदर संस्कार कुठला हवा ?

लताच्या सुरांनी जिंकलेले हे केवढे मोठे साम्राज्य आहे ! ह्या साम्राज्यावर सूर्य मावळत नाही. सकाळ उजाडते. घरोघरीचे रेडिओ लागतात. एखाद्या रेडिओवरून बातम्या ऐकू येत असतात. दुष्काळाच्या, दंगलीच्या, जाळपोळीच्या, सत्तेच्या उलथापालथीच्या. मन खिन्न करणाऱ्या—जगणे म्हणजे हेच का शेवटी ? हा प्रश्न उभा करणाऱ्या—आणि अंधारातून प्रकाशरेखा जावी तसा एकदम लताचा सूर तीरासारखा घुसतो आणि मनाची काळोखी नष्ट करतो. काही नसले तरी हे सूर ऐकायला तरी जगले पाहिजे असे वाटायला लागते. अतिपरिचयाने देखील अवज्ञा झाली नाही अशी एकच गोष्ट म्हणजे लताचे सूर !

ते सूर कानी पडले की मनावर शिलाखासारखा कोरलेला तो प्रसंग डोळ्यापुढे उभा राहतो. 'धरा मी वंदिले' म्हणणारे परकरपोलक्यातले लताचे चिमुकले ध्यान दिसायला लागते. मनात म्हणतो—ह्या मुलीला कल्पनाही नसेल की ते 'धरा मी वंदिले' ऐकताना त्या पॅलेस थिएटरातल्या अनेकांनी मनात म्हटले असेल की या असल्या अलौकिक 'धरा मी वंदिले' . आज पंचवीस वर्षे अनेक ध्वनिमुद्रिका ऐकताना असंख्य अंत करणांतून "वाहवा. ह्या सुराना सलाम आहे." अशी दाद घेण्याचे भाग्य लताला लाभले आहे याहीपेक्षा ती दाद देण्याचे भाग्य आम्हाला लाभले आहे.

सुरांची चैतन्यफुले फुलविणाऱ्या लतेला वयापेक्षा कुठलीही वडीलकी नसणाऱ्या माझ्यासारख्याने अंत करणापासून एकच आशीर्वाद द्यायचा की "मुली, अशी ही दाद तुला अखंड मिळो—औक्षवंत हो."





# पंचवीस वर्षे

*गेली पंचवीस वर्षे लता सतत गात आहे. चित्रपटातून ती गाइली आणि ध्वनिमुद्रिकासाठीही ती गाइली. भारतातील बहुतेक प्रमुख भाषातून तिने गीते म्हटली. गाण्याचे सर्व प्रकार तिने आळवले अभिजात कवींपासून तो नवोदित गीतरचनाकारापर्यंत अनेकांच्या रचना तिच्या गळ्यातून उमटल्या. अनेक संगीत दिग्दर्शकांनी तिच्या गीतांना चाली दिल्या. आणि अनेक चित्रपट तिच्या गाण्यामुळे गाजून गेले. या सर्वांची संपूर्ण यादी देणे कठीण आहे. पंचवीस वर्षांच्या त्या परिश्रमशील, आनंददायक, रोमांचकारक, बहुविध, संपन्न, समृद्ध, अखंड कार्यप्रवण कारकीर्दीचा हा एक ओझरता आलेख.*

## काही संगीतदिग्दर्शक

गुलाम हैदर, खेमचंद प्रकाश, श्यामसुंदर, अनिल विश्वास, नौशाद, सी. रामचंद्र, सचिन देव बर्मन, सज्जाद, हरिश्चंद्र बाली, हेमंत केदार (शिंदे), हंसराज बेहेल, नौशाद, धनीराम, पं. गोविंदराम, श्यामबाबू पाठक, अमरनाथ, हुस्नलाल–भगतराम, पय्याम, मन्ना डे, सुरेश, रोशन, रवि, एस. एन त्रिपाठी, चित्रगुप्त, दिलीप धोलकिया, सरस्वतीबाई, आर. सी. बोराल, शंकर–जयकिशन, कल्याणजी–आनंदजी, लक्ष्मीकांत–प्यारेलाल, लाला–सत्तार, ओमी–सोनिक, जग्गी–सप्पन, एन. दत्ता, राहुल देव बर्मन, गणेश, गुलाम महमद, महमद शफी, सुमनराज, वसंत देसाई, रामलाल, पं. शिवराम, अलि अकबर खाँ, रविशंकर, जयदेव, हेमंतकुमार, उषा खन्ना, दक्षिणाबाबू, मदनमोहन, महेंद्रसिंग, शार्दूल पात्रा, सरदार मलिक, वसंतप्रकाश, मानू घोष, सलिल चौधरी, बी. एन. बाली, बुल्ो सी. रानी, मोला भेंग्रा, अविनाश व्यास, जमालसिंग, जी. एस कोहली, ब्रजभूषण, मनोहर, सी. अर्जुन, परदेसी, पुरुषोत्तम सोळकुरकर, दादा चांदेकर, मा. कृष्णा, दत्तराव

कुलकर्णी, सुधीर फडके, दत्ता डावजेकर, वसंत प्रभू, वसंत पवार, राम कदम, जितेंद्र अभिषेकी, स्नेहल भाटकर, बाळ पार्टे, मीना मंगेशकर, हृदयनाथ मंगेशकर, आनंदघन, नंदीबाबू, फय्याज अहमद, नचिकेता, सतीनाथ, पुरुषोत्तम उपाध्ये, नागेश मसुदे, विश्वनाथ राममूर्ती, सी. सुब्रह्मण्य व्यंकटराघवन, कला, आदिनारायणराव, लक्ष्मण बेरळेकर, बालधारा, रमेश नायडू, सुधीन, दौले मुकर्जी, बिपिन बाबुल, प्रेम धवन, किशोरकुमार, गजानन कर्नाड, डी. पी. कोरगावकर.

## लताने गाइलेले काही गीतप्रकार

गझल, कव्वाली, ठुमरी, दादरा, टप्पा, ख्याल, कजरी, होरी, तरन्नुम लोरी (अंगाईगीत), भावगीत, भजन, बालगीत, श्लोक, अभंग, ओवी, लावणी, लोकगीत, भांगडा, गरबा, रवासरा, चाचाचा, जापानी, ध्रुपद, आरती, रवींद्रसंगीत, धमार.

## लताने ज्यांतील गीते गाइली अशा भाषा व बोली

संस्कृत, मराठी, पंजाबी, बंगाली, आसामी, हिंदी, ब्रज, अवधी, भोजपुरी, गुजराती, मैथिली, उडिया, नेपाळी, कानडी, तेलगु, सिंहली, उर्दू, मारवाडी (राजस्थानी), तमीळ, कोंकणी.

## ज्यांची गीते लताने गाइली ते हे काही कवी

कबीर, सूरदास, मीरा, गालिब, रवीन्द्रनाथ ठाकूर, सुमित्रानंदन पंत, मैथिलीशरण गुप्त, साहिर लुधियानवी, पं. भरत व्यास, प्रदीप, शैलेंद्र, मधोक, कमाल अमरोही, राजा मेहेंदी अलीखान, नेपाळ-नरेश महेंद्रसिंग, नरेंद्र शर्मा, ललितादेवी शास्त्री, शकील बदायुनी, कैफी आझमी, मारावर्नी, असद भोपाली, राजेंद्र कृष्ण, प्रेम धवन, मजरूह सुलतानपुरी, हसरत जयपुरी, प. गिरीश, प. इंद्र, इंदीवर, नीरज, पं. सुदर्शन, सुलतान बावरा, कमर जलालाबादी, गुलजार, डॉ. इकबाल, अविनाश व्यास, नक्ष ल्यालपुरी, केदार शर्मा, आनंद बक्षी, शकील चौधरी, वर्मा, मलिक.